






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

वर्ष. १५ अंक ६१ जाने. १९४२

" " ६२ एप्रि. १९४२

" " ६३ जुलै १९४२ (फाटका)

" " " ६४ आक्टो. १९४२

पृ - २९९-३०४

म. सा. प.

संपादक - के. नारायण काळे

वर्ष १५ वे जाने. १९४२ अंक १ ला जानेवारी

" " एप्रिल १९४२ अंक २ रा

" " जुलै १९४२ अंक ३ रा

" " ऑक्टोबर १९४२ अंक ४ था

महाराष्ट्र-साहित्य-परिषद्

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

[त्रैमासिक]

## ६२

संपादक—के. नारायण काळे
बी.अे., अेल्अेल्.बी.

चैत्र १८६४

वर्ष १५ वें] अेप्रिल १९४२ [अंक २१

अनुक्रमणिका

# अनिष्टलेखन समालोचन समितीच्या कार्याचा वृत्तान्त



अनिष्टलेखन समालोचन समितीची चवथी सभा बुधवार दिनांक २२-४-४२ रोजीं सायंकाळीं ६। वाजतां महाराष्ट्र साहित्यपरिषदेच्या अिमारतींत भरली होती. सभेस सर्व सभासद हजर होते. प्रथमतः मागील दिनांक २३-९-४१ रोजीं भरलेल्या सभेचा अहवाल वाचून मंजूर करण्यांत आला. नंतर पुढील ठराव स्वीकृत करण्यांत आलेः—

ठराव १ ला—"'झंकार'मध्ये प्रसिद्ध होणाऱ्या 'मूर्खांच्या नंदनवनांत' या लेखमालेच्या लेखनपद्धतींत कांही ठिकाणीं विडंबनाच्या बुरख्याखाली आचरटपणाची व खोडसाळ टीका करण्यांत येते ती प्रस्तुत समितीस अनिष्ट वाटते."

ठराव २ रा— "'झंकार' दिनांक १९-४-४२ च्या अंकांतील 'सह्याद्रीच्या माथ्यावरची दुर्गंधी' या मथळ्याखाली आलेल्या मजकुराची भाषा शिवराळपणाची आहे. व ही लेखनपद्धति या समितीस असंमत आहे."

ठराव ३ रा— "जीवन, सवाअी जीवन व यौवन या तीन मासिकांत येणारा बराचसा मजकूर शास्त्रीय दृष्टीने लिहिलेला नसून, विकृत लैंगिक जिज्ञासेला चाळवणारा असतो, यामुळे या मासिकांचें धोरण या समितीस अनिष्ट वाटतें, व समाजास अपायकारक आहे असें वाटतें."

ठराव ४ था— "'सकाळ'मधील 'सुधामावशी' संबंधींच्या कात्रणांचा समितीने विचार केला व ठरविलें की सदर कात्रणांत प्रदर्शित केलेल्या विचारसरणीमध्ये प्रामाणिक मतप्रकटीकरण व सदभिरुचीचें परिपालन यांच्या मर्यादा निश्चितपणें अुल्लंघिल्या गेल्या असा अभिप्राय या समितीस देववत नाही."

ठराव ५ वा— "'सख्याहरी' या नांवाने प्रसिद्ध होणारे बरेचसे लेख आणि त्याच वर्गांत मोडतील अशा प्रकारचे 'सखेसगुणे' वगैरे लिखाण नियतकालिकांत वाचून, त्यांचीं कात्रणें अधूनमधून समितीकडे आलेलीं आहेत. यासंबंधी साकल्याने आपला अभिप्राय नमूद करणें या समितीस सोअीचें वाटतें. तो अभिप्राय असाः—

"या वर्गांतील बरेंचसें लिखाण सदभिरुचीला विघातक आहे,"

ठराव ६ वा– "मौज" ता.२१-२-४२ च्या अंकांतील 'द्रौपदीची घटस्फोटाची फिर्याद' या मथळ्याखाली आलेल्या लेखाची रचना सदभिरुचीला विघातक आहे असें या समितीचें मत आहे.

**कृ. गो. मराठे**

आमंत्रक– अनिष्टलेखन समालोचन समिति. पुणें

## नियामक मंडळाच्या सभासदांस सूचना

या अंकासोबत नियामक मंडळाच्या सभेची सूचना व संमेलनाध्यक्षांच्या निवडणुकीविषयक मतपत्रिका नियामक मंडळाच्या सभासदांकडे पाठविण्यांत येत आहे.

— चिटणीस

## वर्गणीविषयक माहिती

म. सा. पत्रिकेची वार्षिक वर्गणी — रु. ४॥ (ट.ख.सह).

परिषदेचे सभासद व संलग्नसंस्था — वा. व. रु. ३ (म. सा. पत्रिका विनामूल्य पाठविली जाते)

पत्रव्यवहाराचा पत्ता— महाराष्ट्र साहित्य परिषद्, टिळक रस्ता, पुणें २.





अनुक्रमणिका

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका



वर्ष १५ वें ] **अनुक्रमणिका** [ अंक २ रा

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका



## रात्रीं पहारा करतांना—



रात्रींच्या सहलींत आज नुरली पूर्वीपरी माधुरी
जेव्हा हासत हासवीत फिरतां दाटे न भीती उरीं.
तेव्हा 'सावध' हा न शब्द अमुच्या कोशामधें सापडे
ज्याचा ये पडसाद भीषण अता सृष्टींत चोहीकडे.

तेव्हा हें मृगशीर्ष झुंबर जणू व्योमांतलें वाटलें
आता व्याध परंतु हाच उठवी चित्तीं महा वादळें !
जी शांतिप्रगतीस आज करिते हैराण सत्तान्धता—
तीचें काय दिसे प्रतीक वरि हें ?— कल्पान्त ये तत्त्वता !

होते वृत्ति सकंप गूढ बघुनी निःस्तब्धता भोवती
येतां चाहुलही भयानक किती शंकाच डोकावती !
श्रद्धा, संस्कृति, बंधुभाव सगळीं घायाळ झालीं मनीं
वाटे शेष शिरावरून महिला देणार कीं फेकुनी !

कर्तव्याचरणें प्रसन्न अमुच्या होतां तमिस्रेंतुनी—
केव्हा तो समता-प्रभाकर वरी येणार संतोषुनी ?

— गोपीनाथ

अनुक्रमणिका






# उपसंहार*



(लेखक– श्री. वा. सी. मर्ढेकर)

आतापर्यंत प्रसिद्ध झालेल्या चार निबंधांत मीं जीं मतें मांडलीं आहेत तीं कसकशीं परिणत झालीं हें येथे सांगितलें तर तें वाचकांना कदाचित् अुद्बोधक वाटेल. या निबंधांतून मीं काव्यशास्त्र आणि सौंदर्यशास्त्र यांचे परस्परसंबंध विशद करण्याचा प्रयत्न केला आहे. आणि या विशदीकरणाच्या अनुरोधानें काव्यविषयक आणि सौंदर्यविषयक प्रश्नांकडे पाहण्याची आवश्यकता प्रतिपादली आहे. या अशा प्रयत्नाला यश येणें किंवा न येणें हें यांत स्वीकारलेल्या विचारसरणीच्या तर्कशुद्धतेवर आणि आधारासाठीं घेतलेल्या अनुभवांच्या प्रामाण्यावर अवलंबून राहील. ज्या प्रक्रियेने हीं माझीं मतें सिद्ध झालीं तिच्या निवेदनामुळे या माझ्या प्रतिपादनाचें महत्त्व अधिकअुणें होअील असें नाही, परंतु अशा प्रकारचें आत्मनिवेदन प्रथमदर्शनीं जितकें अप्रस्तुत वाटतें तितकें अप्रस्तुत कदाचित् ठरणार नाही. शिवाय जे खरोखर जिज्ञासु आहेत त्यांना आपले स्वतःचे विचार आणि अनुभव माझ्या विचारांशीं आणि अनुभवांशीं ताडून पाहतां येतील.

सुंदर वस्तूंच्या दर्शनानें माझ्या मनावर होत आलेल्या परिणामांचा अितिहास सांगावयाचा म्हटला तर तो माअुबंदकीनें ग्रासलेल्या अेखाद्या कुटुंबाच्या अितिहासासारखा होअील. माझ्या मनोभूमीवरील झुंज तीव्र होती; पण मी कधी डगमगलों असें मला वाटत नाही. माझ्या लहानपणच्या अगदी पहिल्या आठवणी पाहूं लागलों तरी मला असें दिसतें की कांहीहि पाहिलें की त्यांचा आकार, त्यांतल्या निरनिराळ्या रेषा, त्याचा रंग, त्याची घन-विरल, जड-तरल अंगोपांगें अित्यादि दृग्विषयांनी माझ्या मनावर जी मोहिनी पडत आली आहे, तिला माझ्या अनुभवांत दुसरी तोड नाही. दृश्य सृष्टीच्या दर्शनानंदानें भारून जाअून मीं जे बेभान क्षण अनुभवले ते केवळ अनिर्वचनीय आहेत ! दृश्य सृष्टीच्या ठिकाणीं माझ्या अनुभवाला येणारें सौंदर्य आणि विस्मयजनकता आणि त्यांपासून मला मिळणारा शब्दातीत आनंद वयाबरोबर वाढत जाअून त्यांचें पर्यवसान मला चित्रें काढण्याचा छंद लागण्यांत झालें, आणि येथून माझ्या मनांतले कलह, गोंधळ आणि संशय यांना सुरुवात झाली. सुंदर वस्तूच्या दर्शनामुळे माझ्या मनांत जी रसग्राहक वृत्ति उत्पन्न होत असे ती, आणि, कलामंदिरांतून (Arts schools) कलानिर्मिति आणि रसग्रहण यांसंबंधी शिक्षण घेतलेल्या आणि त्यांचाच अनुवाद करणाऱ्या लोकांच्या मनांत उत्पन्न होत असे ती, यांत मला फार अंतर दिसून येअूं लागलें. ज्या चित्रांत मला कांहीच गौरवास्पद दिसत नसे, त्याची ते तारीफ करीत आणि ज्या चित्रामुळे मी अक्षरशः भारून जात असें, त्याचा त्यांच्या मनावर कांहीहि परिणाम होत नसे. आणि जर अेखाद्या वेळीं आम्हांला अेकच चित्र सुंदर वाटलें तर त्याबद्दलचीं त्यांचीं माझीं कारणें बहुधा

---

* "ARTS AND MAN" या ग्रंथांतील Introduction चा श्री. रा.भि.जोशी, एम्.ए. कृत अनुवाद.

निरनिराळीं असत. यामुळे मी पहिल्याने गोंधळून जात असें. पुढे माझी मलाच लाज वाटूं लागली, आणि शेवटीं मीं माझीं मतें लपवून ठेवून, सत्याशीं प्रतारणा करून, लोकांनी मला अरसिक म्हणूं नये म्हणून लोकसंमत मतेंच बोलूं लागलों.

मी अिंग्लडला गेलों. तेथल्या निरनिराळ्या चित्रसंग्रहांतून हिंडलों. अिटलींतील चित्र-संग्रह पाहिले. चित्रकलेची बूज राखणाऱ्या रसिकांशीं चर्चा-संभाषणें केलीं. तरी माझी मनः-स्थिति होती तशीच राहिली. कलाकृतींच्या दर्शनापासून मला मनापासून होणारा विशिष्ट आनंद केवळ शिष्टाचारासाठी आणि लोकांनीं आपल्याकडे एक 'चक्रम' म्हणून बोट दाखवूं नये म्हणून बुद्ध्या दाबून टाकण्यांत मला आरंभींआरंभीं तीव्र मनोयातना होत; परंतु लवकरच ती गोष्ट माझ्या अंगवळणीं पडली; आणि हा क्रम असाच चालला असता तर हळूहळू माझ्या अंगची रसिकता मीं मारूनहि टाकली असती. या आपत्तीपासून मला सेझान (Cezanne) आणि व्हॅन् गॉफ (Van Gogh) यांनी वांचवलें. आणि मी जेव्हा आंरी मातिस (Henri Matisse) यांचीं चित्रें पाहिलीं तेव्हा तर मला माझ्या कलाविषयक दृष्टीच्या तात्त्विक सत्यते-विषयी शंकाच राहिली नाही. माझीं खरीं मतें अुघडपणें बोलून दाखवण्याचें मला आता धैर्य आल्यामुळे सौंदर्याच्या आस्वादापासून मला मिळणारा आनंद द्विगुणित झाला; आणि मी ज़ेव्हा यांच्या कलाकृति पाहून माझ्या मनांत अुत्पन्न होणाऱ्या भावना आणि प्राचीन अिटा-लियन चित्रकारांच्या कृति पाहून अुत्पन्न झालेल्या भावना यांची तुलना करूं लागलों, तेव्हा माझी माझ्या मतांवरील श्रद्धा दृढमूल झाली. सौंदर्यदर्शनाने माझ्या मनावर होणाऱ्या परि-णामांची परस्परसंगति लावण्याचा, तुलना करण्याचा अविरत उद्योग मी करूं लागलों. आणि सौंदर्याच्या आस्वादाची माझी आंतरिक तळमळ इतकी अनिवार झाली की मला वारंवार चित्र-संग्रहालयांत जाऊन तिचें समाधान करून घेतल्याशिवाय चैनच पडत नसे.

या सगळ्या गोष्टी घडत असतांनाच त्यांना दुसऱ्या अेका अनुभवाची साथ मिळत होती. मीं माझ्या जीवनाचीं पहिलीं पाअुलें दृश्य सौंदर्याच्या आनंदांत गुंगत टाकलीं. तसेंच दहा वर्षांचा होण्यापूर्वीच मीं आपली पहिली अर्थहीन कविताहि रचली. कविता जुळवणें ही माणसाच्या अंगची अेक हट्टी खोड असावी असें मला वाटतें. आणि माझी ही खोड अजूनहि केव्हा केव्हा डोकें वर काढते. पण मी जों जों काव्याचें परिशीलन करतों आणि कविता रच-ण्याचा प्रयत्न करतों तों तों माझी खात्री होत चालली आहे की काव्यापासून संपूर्ण समाधान मिळणें शक्य नाही. मानवी व्यवहाराच्या संसर्गामुळे काव्य कलंकित झालें असें मला वाटतें. मानवी व्यवहाराच्या भंगुर भूमीमध्ये त्याचीं मुळें अशीं गुरफटलीं आहेत की या व्यवहाराच्या बाहेर काव्याला कांहीं अर्थ आहे कीं नाही याचीच शंका आल्यालेरीज राहत नाही. काव्या-स्वादाच्या बाबतींत अनेक कारणांमुळे मी अनेक अवस्थांतून गेलों आहें, पण माझा चित्र-कलेच्या आस्वादाचा आनंद मात्र नेहमी सर्व अवस्थांमध्ये अुत्साहाच्या त्याच पातळीवर राहत आला आहे. आणि जरी कांही कालपर्यंत मला न पटणाऱ्या मतांचा अुच्चार करावा लागला तरी रंगांची अुज्ज्वलता आणि रेखारचनेची लयबद्धता यांपासून मला मिळणाऱ्या गूढ आनंदोर्मींना मी केव्हाहि फार काल आंचवलों नाहीं. अनेक वर्षांपूर्वी मला यांपासून बेहोप आनंद होत होता तसाच आजहि होत असतो. माझें म्हणणें कोणाला कदाचित् पटावयाचें नाही, पण माझा अनुभव मात्र असा आहे की केवळ दृष्टिगम्य विषयांच्या दर्शनाने माझ्या मनावर अुमटणाऱ्या ठशां-मध्ये अेक प्रकारची स्वाभाविक-प्रकृतिगत-अेकवाक्यता असते, तशी काव्यास्वादापासून अुमट-णाऱ्या ठशांमध्ये नसते. दृग्विषयापासून मिळणाऱ्या प्रत्ययामध्ये मला जो अढळ, अेकरूप

आनंद मिळतो त्याच्या पासंगालासुद्धा मला सर्वोत्कृष्ट काव्याच्या आस्वादापासून मिळणारा आनंद बसवता येत नाही. मग असें म्हणतां येणार नाही का की दर्शनानंदामुळे येणारा शाश्वत सत्याचा प्रत्यय, काव्यानंदामुळे येणाऱ्या प्रत्ययापेक्षा अधिक, निदान सापेक्षतेने, वास्तवरूप असतो ? आणि ज्या अर्थी मी या अुपसंहारांत माझ्या मतांचें क्रमवार प्रतिपादन करीत नसून अेक आत्मनिवेदनच करीत आहें त्या अर्थी मला येथेच हेंहि सांगून टाकावयाला हरकत नाही की ज्याला जगाच्या सौंदर्याचें निव्वळ अिंद्रियांच्या द्वारा हेतुनिरपेक्ष सेवन करणें शक्य झालें, त्याला आनंदोर्मींचा अखंड अक्षय निर्झरच लाभला. त्या आनंदापुढे काव्यजन्य आनंद हा केवळ तुटपुंजा आणि क्षणजीवीच म्हटला पाहिजे.

दृष्टि आणि अंतःकरण यांच्या द्वारा मला हे जे अेकाच वेळीं अनुभव येत असत, दृग्विषयीभूत वस्तूच्या ठिकाणीं मला जें कांही अेक तदंगभूत अक्षय तत्त्व आढळत असे, माझें मन मला क्वचित् फसवी पण दृष्टि कधीहि फसवीत नसे हा जो मला प्रत्यय आला, त्यामधून अेक विचारसरणी प्रकट झाली. तिचाच विस्तार आणि विवेचन या निबंधांत आलें आहे.

चित्रांच्या दर्शनाने मनोभूमिकेवर खोल अुमटलेल्या ठशांतून जे विचार अुदय पावले त्या विचारांची कलाविषयक प्रमेयाच्या रूपाने मांडणी करण्याचा त्यांत प्रयत्न केला आहे, आणि त्यांत स्वीकारलेली पद्धति विश्लेषणात्मक आहे. याचा असा अर्थ नाही की मी केवळ स्वतःच्याच विचारांवर आणि अनुभवांवर सगळा भर दिला आहे. सावध आणि चिकित्सक वाचकाला मीं रॉजर फ्राय् आणि क्लाअीव्ह् बेल् यांपासून काय घेतलें आहे हें सहज कळून येईल. सौंदर्यशास्त्र आणि काव्यशास्त्र यांचें क्षेत्र अतिविस्तीर्ण आणि विविधरूपसंपन्न आहे. त्या त्या सगळ्यांचा मीं परामर्श घेतला नाही हें मीं सांगावयाला पाहिजे असें नाही, पण अमुक अेका मताचा मीं अुल्लेख केला नाही किंवा अमुक अेका पुस्तकांतून मीं अुतारा घेतला नाही म्हणून मला तीं अज्ञातच असलीं पाहिजेत असें मात्र अनुमान करणें योग्य ठरणार नाही. विद्वत्तेचें सवंग प्रदर्शन करावें हा माझा केव्हाच अुद्देश नसल्यामुळे तळटिपा आणि अुतारे देअून लेखांचें 'वजन' वाढवण्याचें मीं टाळलें आहे. माझें स्वतःचें प्रतिपादन वाचकांच्या नजरेसमोर ठळकपणें अुभें करावें हा माझा अुद्देश आहे. माझें प्रतिपादन आणि दृष्टिकोण हीं अेकदा चांगलीं आत्मसात् झालीं म्हणजे माझ्या सिद्धान्तावर अितरांकडून येअूं शकणाऱ्या आक्षेपांना या पुस्तकांत जरी अुत्तरें सांपडलीं नाहीत तरी वाचक स्वतःच तीं देअूं शकतील.

## एक ललितकला या दृष्टीने काव्याचें स्थान

या निबंधांमध्ये मीं माझी सौंदर्यमीमांसा सूचित करतांना विविध ललितकलांचा अेका किंवा अधिक ज्ञानेंद्रियांशीं संबंध जोडला आहे, आणि असें म्हटलें आहे की सौंदर्य किंवा सौंदर्यजन्य आनंदानुभव हा केवळ त्या त्या ज्ञानेंद्रियांकडून जाणत्या मनाकडे नेल्या जाणाऱ्या संज्ञांच्या स्वरूपावर आणि शुद्धतेवर अवलंबून असतो. (या संज्ञांचें स्वरूप अगदी शुद्ध असंमिश्र असलें पाहिजे. त्यांमध्ये दुसरें कोणतेंहि ज्ञानरूप (cognitive) तत्त्व शिरतां कामा नये.) तसाच तो आनंद या संज्ञा जाणत्या मनामधल्या आपापल्या विशिष्ट क्षेत्रांत कशा परस्पर-संघटित होतात यावरहि अवलंबून असतो. म्हणजे ज्ञानेंद्रियांकडून जाणत्या (field of consciousness) मनाकडे नेल्या जाणाऱ्या संज्ञाचे गुण आणि त्यांची आपापल्या कार्यक्षेत्रांत होणारी परस्परसंघटना यांवर सौंदर्य किंवा सौंदर्यास्वादजन्य आनंद अवलंबून असतो. विविध संवेदनांच्या अंगभूत गुणांच्या परस्परानुबंधाचें ज्ञान हें अिंद्रियविषयजन्य संज्ञांच्या अनुभवांतच असतें. तें या अनुभवाखेरीज दुसऱ्या अेखाद्या समकालीन किंवा पश्चात्कालीन ज्ञानरूप

प्रक्रियेने (cognitive process) सिद्ध होत नाही, ही गोष्ट पक्केपणीं मनांत बाळगणें अत्यंत आवश्यक आहे./

माझ्या सौंदर्याच्या कल्पनेप्रमाणे काव्यापासून खरा-शुद्ध आनंदलाभ होतच असेल तर तो काव्याचीं विविध अंगें विशिष्ट स्वरूपांत परस्परानुबद्ध झालीं असतात म्हणून; म्हणजे विरोध, लय अित्यादि नियमांनीं तीं बांधलेली असतात म्हणून. परंतु हा आनंद इतर कलांपासून मिळणाऱ्या आनंदाअितका रससंपन्न नसतो. याचीं कारणें दोन आहेत. अेक असें कीं काव्य हें सर्व ज्ञानेंद्रियांना अेकाच वेळीं कामाला लावून सर्व संवेदनागुणांचा आपल्या कार्यासाठी मरमसाट (indiscriminate) अुपयोग करून घेतें. दुसरें असें की काव्यजन्य संवेदना या खरोखर प्रत्यक्ष संवेदना नसून केवळ प्रतिमाछाया (images) असतात. आणि प्रत्यक्ष गम्य संवेदनांमधील वास्तवतेची प्रगाढता त्यांच्या ठिकाणीं नसल्यामुळे त्यांच्या आनंद देण्याच्या सामर्थ्याला अुणेपणा येतो. अिंद्रियजनित संवेदनांखेरीज काव्याच्या 'अर्था'मध्ये जो आनंद देण्याचा गुण आहे त्याची चर्चा मीं केली आहे; आणि या अर्थांना मी गौण कां समजतों तेंहि मीं स्पष्ट केलें आहे. प्रस्तावनेंतलाच अुतारा देअून असें म्हणतां येअील की (हे अर्थ "मानवसंसारांतील अनेक व्यवहारांनी कलंकित झालेले असतात. आणि या संसाराच्या क्षणभंगुरतेशीं ते अितके गुरफटले गेलेले असतात की त्याच्या पलीकडे त्यांना कांही महत्त्वच नाही अशी शंका येणें अपरिहार्य होतें.")

---

## वाङ्मयोपासक मंडळ, अहमदनगर

### वार्षिक सभा व तेरावा वार्षिक दिन

नगर वाङ्मयोपासक मंडळ या महाराष्ट्रसाहित्यपरिषदेच्या संलग्न संस्थेची वार्षिक सभा व तेरावा वार्षिक दिन गुरुवार दिनांक २६-३-४२ रोजीं येथील नगरशहरपालिकेच्या दिवाणखान्यांत फर्ग्युसन कॉलेजचे प्राध्यापक रा. श्री. जोग, अेम्. अे., ह्यांच्या अध्यक्षतेखाली समारंभाने साजरा झाला.

प्रा. रा. श्री. जोग, अेम्.अे., ह्यांनी "आजच्या ललित वाङ्मयापासून माझ्या अपेक्षा" या विषयावर व्याख्यान दिलें. मंडळाचे चिटणीस श्री. द. बा. डावरे ह्यांनी १९४१ सालचें अितिवृत्त सांगितलें. श्री. प. प. पटवर्धन ह्यांनी मंडळाचा ताळेबंद व हिशेब सभासदांपुढे मांडल्यावर अहवाल व ताळेबंद मंजूर करण्यांत आला. चालू सालाकरता पुढील पदाधिकारी निवडण्यांत आलेः—

अध्यक्ष— रा. ब. न. बा. देशमूख. अुपाध्यक्ष— (१) ले. कर्नल. प. कृ. चितळे, (२) श्री. त्र्यं. गं. धनेश्वर. कार्याध्यक्ष—श्री. रा. ब. हिवरगांवकर. चिटणीस— श्री. द. बा. डावरे, श्री. प. प. पटवर्धन. हिशेबतपासनीस— श्री. बा. ना. दातार.

निवडणुकीनंतर "महाराष्ट्र विद्यापीठ स्थापन करण्यासाठी मुंबअी सरकारने योग्य समासदांची अेक समिति नेमून या कार्यास आरंभ केला आहे याबद्दल नगर वाङ्मयोपासक मंडळास संतोष वाटत आहे. या समितीचें कार्य महाराष्ट्राच्या अपेक्षेप्रमाणे लौकरच फलदायी होअील अशी अपेक्षा ही सभा बाळगीत आहे." असा ठराव श्री. य. द. नवाथे ह्यांनी मांडला. श्री. रा. ब. हिवरगांवकर ह्यांनी ह्या ठरावास अनुमोदन दिल्यानंतर तो संमत करण्यांत आला.

---

# मराठीच्या भाषिक अभ्यासाच्या कांहीं दिशा



(लेखक– श्री. ग. वा. तगारे)

राजहंसाचें चालणें । भूतळीं जालियां शहाणें ।
आणिकें काय कोणें । चालावेंचि ना ॥ –ज्ञानेश्वरी १८.१७१४.

भारतीय आर्यभाषांच्या अेका अवस्थेच्या अभ्यासाच्या निमित्तानें भाषाशास्त्रीय वाङ्मय वाचीत असतां, प्राचीन व मध्ययुगीन आर्यभाषांवरील आदरणीय परिश्रम व सूक्ष्म अध्ययन पाहून, 'असे प्रयत्न आपल्या मातृभाषेबद्दल झाले तर–' हा विचार आल्यावांचून राहत नाही. आपली भाषाशास्त्राची परंपरा वेदकालाअितकी जुनी असली तरी तौलनिक व अैतिहासिक भाषाशास्त्राचा पाया युरोपियन पण्डितांनी घातला ही गोष्ट अमान्य करतां येत नाही; आणि हिंदुस्थानांत भाषाशास्त्राच्या अध्ययनाची आधुनिक परंपरा निर्माण करण्याचें श्रेय महाराष्ट्राला असलें तरी हिंदीभाषेसंबंधी अलाहाबादचे डॉ. बाबूराम सक्सेना व त्यांच्या शिष्यवर्गाचे प्रयत्न, प्रा. सिद्धेश्वर वर्मांचा हिमालयांतील बोलींचा अभ्यास व संताळी आणि मुंडारीसारख्या मागासलेल्या भाषांवरील बोडिंग (Bodding) किंवा होफ्मान (Hofman) यांचे परिश्रम पाहतां फादर स्टीफन्ससारख्या तिऱ्हाअिताला मोह पाडणाऱ्या 'चोखाळ' व 'साजिरिया' मराठीची आपण अक्षम्य अवहेलना केली आहे असें वाटल्यावांचून राहत नाही. सुदैवानें वाकरनागेल, पिशल, ग्रियर्सन, ब्लोक, टर्नर, चतर्जी अि. पण्डितांनी प्राचीन, मध्ययुगीन व अर्वाचीन आर्यभाषांसंबंधी अितकें विविधस्वरूपाचें लेखन केलें आहे की विश्वविद्यालयाच्या संशोधनात्मक पदव्यांसाठी किंवा ज्ञानलालसेने आपल्या मातृभाषेचा किती विविधस्वरूपाचा, सखोल व सूक्ष्म अभ्यास करतां येअील याची रूपरेखा अगदी स्पष्ट झाली आहे. तेव्हा म. सा. पत्रिकेच्या अंकांत यांतील कांही दिशा संक्षेपतः दाखवणें अस्थानीं होणार नाही असें वाटतें. हें कोणा परिणतप्रज्ञ प्राध्यापकाचें अधिकारसंपन्न लेखन नसून मध्ययुगीन आर्यभाषांच्या विद्यार्थ्यानें केलेली मातृभाषेची मानसपूजा आहे. या अतिक्रमणाबद्दल प्रस्तुत क्षेत्रांत दीर्घकालीन तपश्चर्या करीत असलेले विद्वान् मला क्षमा करतील अशी आशा आहे.

अुत्तर अक्षांश १५ ते २२ पर्यंत पसरलेल्या भारताच्या या त्रिकोणाकृती प्रांताच्या सीमा पश्चिमसमुद्र, नर्मदा, वैनगंगा, पैनगंगा अि० नैसर्गिक मर्यादांनी रेखीव केल्या, अुत्तर व दक्षिण दिशांनी होणाऱ्या आक्रमणांना यशस्वी रीतीनें तोंड देअून आपलें महाराष्ट्रीयत्व अखण्ड राखलें, रायकीय सत्ताकेंद्रें पूर्वेकडून पश्चिमेकडे बदलत गेल्यामुळे अखिल महाराष्ट्रीय भाषेला अेकजिनसीपणा आला (पाहा ब्लोक FLM §२४,२५) तरी सह्याद्रि-सातपुड्यांनी व कृष्णा, गोदावरी, तापी, वर्धा अि० नद्यांच्या खोऱ्यांनी बनलेल्या वैशिष्ट्यपूर्ण विभागांनी त्याला वैचित्र्य आणलें आहे. तापी सातपुड्याचा कान्ह देश, गोदावरीच्या अुगमाने पुनीत झालेला सेअूण देश, कृष्णा-ककुद्मतींच्या प्रीतिसंगमाचा करहाटक देश, माण नदीनें (अेका काळीं) सुपीक झालेला माणदेश अि० महाराष्ट्राचे नैसर्गिक विभाग आहेत. पोर्तुगीज, अिंग्रज व निजाम यांच्या राज्यांत

विभागला जाअून कृत्रिम राजकीय विभागांनी, सुगम दळणवळणाच्या साधनांनी व मुद्रण-कलेच्या प्रसाराने या 'देशां'चें वैशिष्ट्य नाहींसें होत जाअून यांच्या बोली मृत्युपंथाला लागल्या आहेत. महाराष्ट्राच्या सामाजिक व भाषिक अितिहासाचीं साधनें झपाट्याने नष्टप्राय होत आहेत अशा वेळीं ही अमोल साधनसम्पत्ति मातीमोल न समजतां पॅरिसमधील Institute d'ethnographie सारखी मध्यवर्ती संस्था स्थापन होणें जरूर आहे. महायुद्धाची छाया देशावर पडली असतां नवीन संस्था स्थापणें शक्य नसेल, तर मुंबअी, नागपूर व अुस्मानिया विश्वविद्यालयांनी, महाराष्ट्र साहित्य परिषद्, शारदाश्रम, सत्कार्योत्तेजक सभा अि० संस्थांनी व मराठी विषय शिकवणाऱ्या कॉलेजांनी, मनांत आणल्यास सर्वांच्या सहकार्याने हें कार्य अुत्कृष्ट तऱ्हेने पार पडेल.

ग्रियर्सन-कोनाअुप्रणीत Linguistic Survey of India ने हें कार्य मागे हातीं घेतलें होतें. पण माझ्या मागील* लेखांत वर्णन केलेल्या दोषामुळे Linguistic Survey चा प्रयत्न असमाधानकारक आहे. आणि त्यांतील प्रमुख वैगुण्य म्हणजे त्या बायबल-कथेंत अुपयोजलेल्या शब्दाबाहेर फारच अफाट जानपद वाङ्मय, कथा, गीतें, ओंव्या, म्हणी अि. स्वरूपांत विखुरलें आहे व कु. भागवत यांचा जानपद ओंव्यांचा संग्रह किंवा केळकर सम्पादित अैतिहासिक पोवाडे वाचतांना हें वाङ्मय अुपेक्षणीय नाही असें वाटतें. पुणें साताऱ्याकडील भाषेला महत्त्व देअून गोमन्तक ते नागपूरपर्यंत पसरलेल्या बोलींची अुपेक्षा करणें हें अंतिम दृष्ट्या मराठीच्याच अहिताचें आहे, ही गोष्ट आपण दृष्टीआड करूं शकत नाही.

केवळ दक्षिण कोकणचा जर विचार केला तर या प्रान्तांत वसाहत करणारे भट, ब्राह्मण (सारस्वत), मराठे, गावडे, देवळी, कोळी, खिस्ती, नाअिते अि० समाज निरनिराळ्या बोली वापरतात. सारस्वतांच्या बोलभाषेंत चित्रपुरी, कुडाळी, बारदेशकरी अि० पोटभेद आहेत. याशिवाय मध्य व अुत्तर कोकण, वऱ्हाड, नेमाड, खानदेश, बागलाण, मराठवाडा अि० विभागांतील बोलभाषा लक्षांत घेतां महाराष्ट्राच्या सामाजिक अितिहासाला आणि अर्वाचीन आर्यभाषांच्या अभ्यासाला केवढें विपुल साहित्य अुपलब्ध होअू शकेल याची कल्पना येअील. पण मुद्रणकलेचा प्रसार, दळणवळणाची सुलभता, राजकीय व आर्थिक परिस्थिति यांमुळे हें साहित्य झपाट्याने नाहींसें होत चाललें आहे. गोंयची भाषा पोर्तुगीझ वळणावरच गेली असून कोंकणीचें आंग्लीभवन होत आहे. महाराष्ट्राचा गाभा—मराठीची जन्मभूमि व कर्मभूमि—मराठवाडा यांतील भाषेचें अुर्दूकरण चाललें आहे. स्वत्वरक्षणासाठी सदैव सन्नद्ध असण्याचा अभिमान असणाऱ्या महाराष्ट्राने या गंभीर परिस्थितीचा विचार करावा, आणि हीं साधनें अजून वेळ आहे तोंवर संग्रहित करावीं.

या साहित्याचा संग्रह दोन प्रकारें करतां येअील— (१) ध्वनिमुद्रण (Phonographic records), व (२) ध्वनिदर्शक लिपींत (Phonic script) लेखन. यांपैकी पहिला प्रकार खर्चाचा असला तरी अत्यंत आवश्यक आहे. कारण कोणतीहि ध्वनिदर्शक लिपी मूलध्वनि जसेच्या तसे दाखवूं शकत नाही. यामुळे महाराष्ट्रांतील सर्व बोलभाषांचे प्रांतीय व जातीय प्रातिनिधिक नमुने ध्वनिमुद्रितावर घेतल्यास आपल्या मातृभाषेच्या आजच्या जिवंत स्वरूपाची कल्पना यथातथ्य रीतीने आजच्या व भावी विद्यार्थ्यांना होअील.

* म. सा. पत्रिका जानेवारी १९४२.

दुसरा प्रकार सांगण्यापूर्वी नागरी लिपीवर आधारलेल्या ध्वनिदर्शक लिपीची आवश्यकता थोडक्यांत सांगतों.

भाषेचें शास्त्रीय अध्ययन करण्यासाठी सर्व महाराष्ट्रभर पसरलेलें जानपदवाङ्मय गोळा करतांना आपण जें व जसें ऐकतों तें जसेंच्या तसें लिहून घेण्याची दक्षता दाखवली नाही तर त्या श्रमांचा कांही उपयोग नाही. 'मलेका मालूम माऊ' असें म्हणणारा लेवा पाटिदार किंवा 'शेटी, गोड ना जाल्यार गडासारकें उत्तर ना' असें म्हणणारा कोकणी कसा बोलतो याची फारच स्थूल कल्पना हें वाचल्यावर येईल. पण मराठींतील स्वरांचे विविध उच्चार, कवर्ग-चवर्गाचे द्विविध उच्चार व्यक्त करण्याला नागरी लिपींत पुरेशीं ध्वनिचिन्हें नाहीत, अखिल-भारतीय प्रसारासाठी नागरीसारखी शास्त्रशुद्ध लिपी नाही, हें मान्य करूनसुद्धा भारतीय भाषांशीं संबद्ध अशा फारसी, अरबी, द्राविडी, तिबेटी-ब्रह्मी, ऑस्ट्रो-ऐशियाटिक भाषासमूहांतील ध्वनि व्यक्त करण्यास आपण आहे याच लिपींत थोडीशी सुधारणा केली तर International Phonetic Association ने तयार केलेल्या लिपीपेक्षा अधिक सुलभ अशी ध्वनिवाचक लिपी (phonetic script) निर्माण होईल. नागरी लिपी सर्व भाषांतील सर्व वर्ण योग्य तऱ्हेने व्यक्त करते असा खोटा अभिमान बाळगण्यांत अर्थ नाही हें alms, amoeba, chant, cut, datum, curl, man, accept, loud इ. शब्दांतील अचे विविध उच्चार लिहितांना आढळून येईल. हीच गोष्ट इ, उ, ए, ओ च्या उच्चारांची. ही अडचण परदेशी शब्दांबद्दल येते असें नसून भारतीय भाषांमध्ये सुद्धा भासते. काल (उद्या), काल (वेळ); आमि (मी), त्याग (सोडणें) या बंगाली शब्दांतील स्वर उच्चाराप्रमाणे नाहीत. देश, माया, केवल (सं. केवल) शब्द बंगालींत उच्चारतांना आढळणारे ए चे उच्चार विशेष आपणांस लिहिण्याची पाळी आल्यास नागरीच्या मर्यादा लक्षांत येतील. अर्वाचीन आर्यभाषांत शब्दांतील अन्त्य स्वराचा लोप करण्याची प्रवृत्ति असल्यामुळें उच्चारित व अनुच्चारित अन्त्य स्वराच्या मधल्या अवस्थेतील शब्द (विशेषतः त्यांचें अन्त्याक्षर) लिहितांना पंचाइत पडते. उदा० सिंधी. अखि = मैथिली. ऑखि= सं. अक्षि (डोळा). प्राकृतमधील ए–ओचे ऱ्हस्व–दीर्घ उच्चार नागरी लिपींत नसल्यामुळे ऱ्हस्व ए–ओ बद्दल इ उ लिहिण्याचा मोह मध्ययुगीन पोथीलेखकांना पडे. नागरी लिपीचा ध्वनिवाचक लिपी म्हणून उपयोग होत नसल्यामुळे तिच्यावर आधारलेली phonetic script तयार करणें शास्त्र, स्वाभिमान व सुलभता यांना धरून होईल. नागरी लिपि-सुधारसमितीचा वृत्तान्त पाहतां त्यांत सामान्य व्यवहारांत आपण वापरत असणाऱ्या लिपींतील कांही सामान्य सुधारणा दिल्या आहेत असें दिसतें.*

---

* तिच्या कांही सूचना न पटण्यासारख्या आहेत. उदा० छ बद्दल'च्ह' लिहिण्याची सूचना. वस्तुतः छ हा च चा महाप्राण नव्हे. संस्कृत छ हा तालुपृष्ठ्य स्वर किंवा य यांच्या पुढील स्क पासून झाला आहे. (पाहा Meillet— BSL. LXIV p.62). पाली किंवा प्राकृतांत संस्कृतांतील श च्या जागीं तो पुष्कळ वेळां येतो (Pischel; Grammatik §211), मराठींत प्राकृत छ चा स शीं व तालव्यवर्ण पुढे असतां श शीं घोटाळा होतो (Bloch; FLM §102). छ च्या उच्चाराची अनिश्चितता फार जुन्या काळापासून अर्वाचीन भारतीय आर्य भाषांपर्यंत आढळते. मुद्रणांत किंवा लेखनांत बदल होण्यापूर्वी या मुद्याचा फेरविचार होईल अशी आशा आहे. (या समितीचा मूळ रिपोर्ट हातीं न आल्यामुळे म. सा. पत्रिकेच्या जानेवारी १९४२ मधील सारांशावरून हें लिहीत आहें.)

ध्वनिवाचक लिपी (phonetic script) तयार झाल्यावर महाराष्ट्रांतील सर्व बोलभाषांतील वाङ्मयसंग्रहाचें काम सुरू करतां येईल. अशा संग्रहास शास्त्रीय स्वरूप येण्यासाठी भाषातज्ज्ञांची अेक समिति नेमून त्या समितीने निरनिराळ्या विभागांतील कॉलेजें, दुय्यम शिक्षणसंस्था, पोट-जातींच्या संस्था व अितर हौशी कार्यकर्ते या सर्वांच्या– निदान मिळेल त्यांच्या– सहकार्याने या नवीन ठरलेल्या ध्वनिवाचक लिपींत व व्यवहारांतील लिपींत मध्यवर्ती समिति ठरवील तशा पत्रिकेवर या वाङ्मयास 'शुद्ध' करण्याच्या मोहांत न पडतां जसें अैकूं येअील तसें (आघात– accents न विसरतां) लिहून तपासून घ्यावें. कोणत्याहि बोलभाषेंतील वाङ्मयाचा बराचसा– निदान प्रातिनिधिक संग्रह झाला की त्या भाषेची घटना दाखवणारें वर्णनात्मक (व कांहींचें शक्य तर अैतिहासिक) व्याकरण लिहितां येअील. कोकणी भाषेपुरता असा व्यवस्थित प्रयत्न केलेला आढळतो. चित्पावनी, अहिराणी अि० भाषांबद्दलचें आपलें औदासीन्य अजून संपलें नाही असें दिसतें.

मराठी ही वस्तुतः अेक भाषा नसून महाराष्ट्रांत निरनिराळ्या काळांत वसाहत करणाऱ्या निरनिराळ्या समाजांच्या बोलभाषांचें मिश्रण आहे. या बोलभाषांतील कांही विशेषांचा विकास स्वतंत्र तर कांहींचा संघर्ष-साहचर्याने झाला आहे. आणि मराठी बोलींचें तौलनिक व्याकरण लिहिल्यानंतरच आपण या बाबतींत निश्चित बोलूं शकूं. कोणत्याहि भाषाशास्त्रज्ञांच्या कोणत्याहि गृहीत कल्पनेच्या आहारीं न जातां हा अभ्यास केलेला असावा.

भाषा हा समाजशास्त्राचा विभाग असल्यामुळे समजेतिहासावर प्रकाश पाडणारीं भाषिक मानचित्रें (dialectal maps) व समभाषांग-रेखण (isoglosses) आपल्याला यानंतर हातीं घेतां येतील. वर सांगितल्याप्रमाणे महाराष्ट्रीय समाज हा या भूविभागांत निरनिराळ्या काळांत स्थायिक झालेल्या घटकांचा बनल्यामुळें या समाजांच्या बोलभाषेवर त्या घटकांच्या प्राचीन प्रवासांतील निरनिराळ्या टप्प्यांतील तत्कालीन बोलभाषांचे ठसे आहेत. दक्षिण कोकणांतील सारस्वतसमाज अुत्तरहिंदुस्थानांतून येअून तेथे स्थायिक झाला असें पौराणिक दन्तकथावरून दिसतें (स्कन्दपुराण, सह्याद्रि खण्ड) व त्यांच्या भाषेच्या प्रत्ययक्रियेवर हिंदी, बंगाली, अुडिया व गुजराती भाषांचा परिणाम दिसतो* ही लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे. समाजाच्या प्राचीन अितिहासांतील अज्ञात दुवे भाषाशास्त्राला निश्चित करतां आल्यास आणखी काय हवें? या विषयावर प्रो. ब्लोक यांच्या Furlong Lectures (BSOS V 1930) मध्ये भाषिक मानचित्राबद्दल अधिक माहिती मिळेल अेवढें सांगून पुढील मुद्द्याकडे वळतों.

मराठीचें अैतिहासिक व्याकरण लिहिण्यास प्राचीन ग्रंथांची आवश्यकता आहे हें निराळें सांगावयास नको. शिळाप्रेस व 'शुद्धीकरण' या दोन दिव्यांतून गेलेलें जुनें वाङ्मय या दृष्टीने तितकेंसें अुपयोगी नाही. त्यासाठी मुकुंदराज-ज्ञानेश्वरादि लेखकांच्या ग्रंथांच्या चिकित्सक संहिता (critical texts) तयार होणें– निदान शोधून मूळ पाठ निश्चित करणें– जरूर आहे. संतवाङ्मयाला 'महाराष्ट्रवेद' म्हटल्यानंतर त्यांतील प्रत्येक शब्दाच्या मूळ स्वरूपाच्या रक्षणाबद्दल आपण कितीतरी दक्ष असावयास पाहिजे पण त्याबद्दल या बेफिकीरीच्या प्रदर्शनांत आपण

---

* प्रा. कत्रे— The formation of Koṅkaṇi §315.
Annals of the Bhandarkar Institute, XXII 3-4.

पुष्कळदा मोठेपणा मानतों.* ही परिस्थिति बदलून ज्ञानेश्वरांनी ज्ञानेश्वरी कोणत्या शब्दांत लिहिली, तुकारामांच्या मुखांतून स्फुरलेले अभंग कोणत्या भाषेंत व्यक्त झाले, हें जाणण्याबद्दल औत्सुक्य निर्माण झाल्यास त्यांचें व्यक्तिमत्त्व आपल्यास अधिक चांगलें प्रतीत होईल. मराठी वाङ्मयाची निर्मिति गेल्या हजार वर्षांतील असल्यामुळे ग्रंथाची मूळ प्रत (Autograph किंवा Arche-type) अुपलब्ध होणें अवघड नाही. संशोधन अधिक कसून करूनसुद्धा जेव्हा मूळ प्रत मिळत नाही तेव्हा अितर प्रमाणांवरून मूळ पाठ निश्चित करतां येतात, हें हल्ली चालू असलेल्या संस्कृत प्राकृत ग्रंथांच्या चिकित्सित आवृत्त्यांवरून दिसून येईल. (अशी आवृत्ति कशी तयार करावी यावर स्वतंत्र लिहावें लागेल कारण माझ्या माहितीप्रमाणे कोणत्याहि प्राचीन मराठी कवीची— डॉ. सुखटणकर, डॉ. वैद्य, डॉ. अुपाध्ये वगैरे संशोधक संस्कृत-प्राकृत ग्रंथांच्या चिकित्सित आवृत्त्या काढतात तशी— चिकित्सित आवृत्ति अजून निघाली नाही.† त्यामुळे मराठीच्या कालिक किंवा अैतिहासिक अभ्यासाला वैगुण्य येतें. मला वाटतें की मातृभाषेच्या अध्ययनाला मिळत असलेल्या वाढत्या मानामुळे ही परिस्थिति लौकरच निवळेल.

शेवटीं मराठीच्या भाषिक अभ्यासाला आवश्यक अशा कांहीं कोशांच्या स्थूल कल्पना सांगून हा लेख पुरा करतों. महाराष्ट्र शब्दकोशाची शाअी वाळलीं नाही तोंवर मी नवीन कोश-कल्पना मांडतों याचें पुष्कळांना नवल वाटेल. वस्तुतः यांत नवीन कांहीहि नाही. नावीन्य असल्यास ज्ञानकोशानें सुरू केलेल्या सद्यःकालीन 'कोशयुगा'अितका अनुकूल काल कोशरचनेची कल्पना मांडण्यास दुसरा कोणता असणार? भाषिक अभ्यासाला अुपयुक्त तेवढ्याच कोशांचा मी विचार करणार आहें.

आपण प्राचीन भारतीय आर्य भाषांपुरताच जर विचार केला तर आपल्याला मोठा व छोटा पीटर्सबर्गकोश (Pw व pw म्हणून ज्याचे अुल्लेख भाषाशास्त्रीय लेखनांत येतात) व त्यांची पुरवणी Schmidst कृत Nachträge (१९२४-२८), Walter Wüst कृत Vergleichendes und Etymologisches Wörterbuch des Alt-Indoarischen, लाहोरच्या विश्वेश्वरानन्द वैदिक संशोधन मण्डळाचा 'वैदिक पदानुक्रम कोश' अित्यादि अनेक पुस्तकें आपल्या डोळ्यांसमोर येतात. ग्रियर्सन व टर्नर यांचे काश्मीर व नेपाळी भाषांचे कोश प्रसिद्ध आहेत. या कोशकारांच्या कामाच्या दिशा, दोष व मर्यादा लक्षांत घेअून आपल्यास पुढील प्रकारचे कोश तयार करतां येतील.

पहिल्या प्रकारचे कोश म्हणजे ग्रंथकारांचे वैयक्तिक शब्दकोश (Indices Verborum) ज्ञानदेव, दासोपंत, अेकनाथ किंवा तुकाराम या जुन्या लेखकांची शब्दसम्पत्ति, त्यांचे त्यांच्या कालखंडावर, व त्यांच्या कालाचे त्यांच्यावर झालेले परिणाम अजमावण्याच्या दृष्टीने त्यांनी कोणता शब्द कोणत्या अर्थाने किती वेळां कोणकोणत्या ठिकाणीं वापरला याची वर्णानुक्रमें सूचि किंवा

* ज्ञानेश्वरांच्या शब्दांत ज्ञानेश्वरींतील अवतरणें देण्यांत यावींत या अर्थाचे प्रा. रा. द. रानडे यांचे प्रा. शं. दा. पेंडसेकृत 'ज्ञानेश्वरांचें तत्त्वज्ञान' या ग्रंथाच्या प्रस्तावनेंतील विचार मननीय आहेत.

† माझ्या डोळ्यांसमोर मुकुंदराज-ज्ञानेश्वरादि 'संत' कवि असल्यामुळे माझें हें विधान त्यांच्यापुरतें मर्यादित आहे. प्राचीन ग्रंथांच्या निघालेल्या चिकित्सित आवृत्त्यांचीं नांवें मला कळवल्यास मी अत्यंत आभारी होईन. 'चिकित्सित संहितें'वर मी करीत असलेल्या लिखाणांत शक्य तों त्या वाङ्मयाचा अुपयोग मला करावयाचा आहे.

शब्दसंग्रह तयार करणें हें पहिलें पण अतिशय महत्त्वाचें कार्य आहे.* कोणत्याहि लेखकाच्या भाषेबद्दल असेंदें विधान करतांना आपल्याजवळ त्याची शब्दसंपत्ति वा प्रत्यय-प्रक्रिया यांच्या पृथक्करणाचा आंकडेशास्त्रावर आधारलेला पुरावा असावा. प्राचीन ग्रंथ संपादन करतांना ही न टाळतां येण्यासारखी जबाबदारी आहे. संतकवींची तुलना करतांना किंवा संतवाङ्मयाच्या भाषेबद्दल बोलतांना आपलीं आवडतीं मतें त्यांच्या माथीं मारण्यापेक्षा संतांना स्वतःबद्दल काय म्हणावयाचें आहे हें स्पष्ट केलेलें बरें. वाङ्मयाचा यथातथ्य (objective) अभ्यास हाच त्यावर अुपाय आहे.

हे वैयक्तिक शब्दकोश तयार झाले की आपल्यास राष्ट्रकूट, यादव, बहामनी अित्यादि कालखण्डांचे कोश आणि त्या सर्वांवर आधारलेला शब्देतिहासकोश तयार करून मराठी शब्दार्थशास्त्राच्या (Semantics) साधनसामुग्रीचा संग्रह केला असें म्हणतां येअील. शब्देतिहासकोशाची कल्पना थोडक्यांत अशी सांगतां येअील‡— श म्हणजे शब्द, अ म्हणजे अर्थ व अु म्हणजे विशिष्ट शब्दाचा विशिष्ट अर्थाने येणारा (प्रकाशित वा अप्रकाशित) वाङ्मयांतील अुल्लेख, अशी कल्पना करूं. तर शचें अ१, अ२, अ३ अित्यादि कालानुक्रमाने कोणकोणते अप्रकाशित वा प्रकाशित वाङ्मयांत अुल्लेख येतात यावरून आपल्यास श चा अितिहास कळेल. श हा श१, श२, श३ अशा स्वरूपांत आढळून (अुदा० विटणें, वीट, विटाळ) त्या प्रत्येकाचे निरनिराळे अर्थ निरनिराळ्या काळीं आढळतील. आपलें काम हा सर्व श चा अितिहास शोधून काढून कोश तयार करावयाचा आहे. भाषाशास्त्राची ही शाखा नवीन पण परिश्रम करण्यासारखी आहे.†

शब्देतिहास व अैतिहासिक भाषाशास्त्र यांना पूरक व यांचा अभ्यास सुकर होण्यासाठी शब्दपर्यायशास्त्र (Synonymics) आपल्यास फार अुपयुक्त ठरेल व त्यासाठी शब्दपर्यायकोशाचें काम हातीं घेणें जरूर आहे. शब्दपर्यायकोश ही अमरकोशाची आधुनिक भाषाशास्त्रीय (सुधारून वाढवलेली) आवृत्ति आहे. कोणत्या शब्दाला कोणकोणते पर्याय आहेत हें निश्चित करून तौलनिक व्युत्पत्ति व कालानुक्रम या दृष्टीने आपण ते पुनः मांडल्यास आपल्यास कांही शब्दांचे अर्थ निश्चित करतां येतीलच पण त्याखेरीज़ त्या त्या कालखंडांतील लोकांच्या अंतःकरणाची घडण आपणांस थोडीबहुत कळेल.

व्युत्पत्तिकोशाचें काम प्रा. कृ. पां. कुलकर्णींनी केलें आहे असें अैकतों. व्यक्ति-वनस्पति-पशुपक्षी यांच्या नामसूची व पारिभाषिक शब्दकोश याबद्दल पुनरुक्ति न करतां स्थलनाम-

* प्रा. Oertel यांनी बूलनरस्मारक ग्रंथांत (पृ. १७७ व पुढे) अशा कोशाबद्दल आपली कल्पना मांडली आहे ती पाहावी.

‡ प्रा. कत्रे—A thesaurus Lingua Sanscritae (New Indian Antiquary Nov. 1941) पाहा

† Tucker : Introduction to the Natural History of Languages. Sarkar : The Intellectual Laws of Language and Bengeli Semantics (Sir A. Mukherjee Silver Jubilee Vol. III). (या लेखांत Breal च्या Essaide Semantique चा अुपयोग करून घेतल्यामुळे फ्रेंच न जाणणाऱ्याची सोय झाली आहे.) Taraporwala— Elements of the Science of Language ch. VI. व प्रा. कृ. पां. कुलकर्णी — मराठी भाषा, अुद्गम व विकास यांतून या शास्त्रासंबंधी बरीच माहिती मिळेल.

सूचीच्या महत्त्वाकडे मी वाचकांचें लक्ष वेधूं अिच्छितों. कारण त्यांत महाराष्ट्राचा प्राचीन अितिहास आहे. निजाम राज्यांत अज्ञातावस्थेंत पडलेलें 'तेर' हें बुद्धपूर्वकालापासून प्रसिद्ध असलेलें 'तगर' नामक नगर होतें. भोरताम्रपटांतील 'श्रीवलय' 'शिरवळ' म्हणून ओळखलें जातें, तर शके ५७७ च्या सेंद्रक-पटांतील 'नांदीपुरद्वारि' हा प. खानदेशातील नंदुरबारचा अुल्लेख आहे, या गोष्टी पुष्कळांना माहीत नसतात. 'महाराष्ट्रांतील ग्राम-नगरें' हा संशोधन करण्यासारखा विषय आहे.

संस्कृत व प्राकृत धातुपाठ लक्षांत घेतां अिण्डो-युरोपियन धातूंपैकी १२२ धातु वेद-वाङ्मयांत न आढळतां पौराणिक संस्कृतमध्ये येतात (प्रा. कत्रे– (Some Problems of Historical Linguistics in Indo-Aryan — Lecture II). काव्यनाटकांच्या संस्कृतांत न आढळणारे ग्रभ्, दुम् अि० धातु प्राकृत वाङ्मयांत दिसतात. प्राकृत वाङ्मयांत शिष्ट समजले गेलेले लआी (पुष्कळ), हेठा(खाली–अधः) अि० शब्द वाङ्मयांतून लोपून आज खालच्या समाजांत वापरले जातात, शाहिरी वाङ्मयांतील कांही शब्दांना आज शिष्ट भाषांत स्थान नाही, कांही संस्कृत शब्दांचे अपभ्रंश आज अपशब्द समजले जातात यावरून वाङ्मयांत प्रतिनिधित्व नसलेले शब्द कालांतराने वाङ्मयांत येतात तर कांही शब्दांचें शिष्टमान्यत्व जाअून त्यांना 'अशिष्ट' समजण्यांत येतें हें लक्षांत येअील. आज आपल्यास अज्ञात असणाऱ्या कारणांनी ही शब्दरत्नाकराची खळबळ चालू असेल पण त्यामुळे अशिष्ट शब्दांचें महत्त्व कमी होत नाही. वाङ्मयांत न दिसणाऱ्या पण बोलभाषेंत असणाऱ्या अशिष्ट (Slang) शब्दांचा कोश तयार करणें भाषाशास्त्राला अुपकारक ठरतें हें अिंग्लिश व फ्रेंच भाषांतील अशा कोशांवरून दिसतें.

आपल्या प्राचीन व मध्ययुगीन भाषांचें युरोपियन व हिंदी पण्डितांनी केलेलें विविध स्वरूपाचें अध्ययन पाहून आपल्या मातृभाषेचा अभ्यास कोणत्या दिशांनी करतां येअील त्याचें संकलनात्मक व संशोधनात्मक स्वरूप मीं अत्यंत संक्षिप्त तऱ्हेने मांडलें आहे; आणि अगदी अुघड दिसणाऱ्या व तांतडीने हातीं घेण्यासारख्या कांही गोष्टी मीं सुचवल्या आहेत. सुदैवाने विश्वविद्यालयांत मातृभाषेला मानाचें स्थान मिळत आहे. बहुजनसमाजांत शिक्षणाचा प्रसार होत आहे. मराठी भाषाशास्त्रावर प्रबंध लिहिले जात आहेत. अशा काळांत महाराष्ट्र साहित्य संमेलनाच्या निमित्ताने जमणाऱ्या विद्वान मंडळींनी यांतील कांही सूचनांचा विचार केल्यास मराठी भाषाशास्त्राच्या दृष्टीने अधिक भरीव कामगिरी होअील असें वाटतें.

प्रथमतः सांगितल्याप्रमाणे मध्ययुगीन भाषाशास्त्राच्या विद्यार्थ्याच्या या नम्र सूचना आहेत. यांत कोणत्याहि तऱ्हेने अधिकारयुक्त वाणीने केलेलें दोषदर्शन नाही. यांतील कोणत्याहि विषयाबद्दल शंका असेल तर माझ्याकडून होअील तितकें स्पष्टीकरण करण्याचा प्रयत्न करीन अेवढेंच आश्वासन मी देतों.

प्रस्तुत लेखांत अुपयोगी पडलेल्या सर्व ग्रंथकारांचा मी ऋणी आहें.

---

# महाराष्ट्रांतील जानपद ओवी

(लेखांक ४ था)

(लेखिका—कु. अनसूया भागवत)

पुराणविषयक ओव्या व संतकालीन भक्तिप्रचुर ओव्या हे दोन विभाग मागील अंकांत संपविले. त्यानंतर तिसऱ्या विभागांत कल्पित दंतकथांवर अुभारलेल्या ओव्या येतात; परंतु अशा तऱ्हेच्या ओव्या फारच तुरळक सांपडतात. त्यांचा विचार नंतर करण्याचें ठरविलें आहे. त्यापूर्वी चौथा विभाग येथे देत आहें. या शेवटल्या विभागांत सर्व सामाजिक व कौटुंबिक ओव्यांचा समावेश केलेला आहे.

**सामाजिक व कौटुंबिक जीवनावरील ओव्या :**— विषयानुरूप पाडलेल्या जानपद ओव्यांच्या विभागांपैकी सामाजिक व कौटुंबिक जीवनावरील ओव्यांचा विभाग सर्वांत प्रमुख आहे. ओवी हा पद्यप्रकार अशिक्षित जनता व विशेषतः स्त्रिया यांच्या जीवनाशीं निगडित झालेला असल्याने ज्या वर्गांतून या ओव्या गाअिल्या जातात त्या लोकांचीं भावनाचित्रें व जीवनचित्रें रेखाटणाऱ्या ओव्या अगदी विपुल प्रमाणांत मिळतात.

मध्यमस्थितींतील व विशेषतः गरीब वर्गांतील खेडुत स्त्रिया ओवीगीतांचा अुपयोग मुख्यतः जात्यावर दळतांना होणारे श्रम हलके करण्याकरता करतात. किंबहुना, ओव्यांची निर्मिति व रचना प्रत्यक्ष दळण्याच्या प्रसंगींच केली जाते. ओवी-गीतांची रचना अशा रीतीने दळण्याच्या क्रियेबरोबर अेकरूप झालेली असते. स्वाभाविकच जात्याचें स्वरूप व दळण्याची क्रिया यांवरच कांही ओव्या रचलेल्या आढळतात. जातें जड असल्यामुळे दळण्याचें काम बहुधा दोन स्त्रियांकडून जोडीने केलें जातें. शेजारणीपाजारणी अेकमेकींना या कामीं मदत करतात व पुष्कळदा घरांतील लहान मुलीसुद्धा या कामांत अुत्साहाने भाग घेतात.

पहाटचं दळाण शिरवळाचं शेणपाणी ।
माझी मायाबहीण काम झालं गवळणी ॥४४६
आता न्हाओनी धोओनी मी दळीतें बक्षी गहु ।
माझ्या बाअीला पावला सत्यनारायण देअू ॥
थोरल्या जात्याचं नांव त्याचं हाथीरथी ।
मला दळूं लागे गंगा गिरजा पारवती ॥४४८
थोरलं माझं जातं मला वोढना अेकलीला ।
बहिणी बोलाव धाकलीला ॥ ४४९
थोर माझं जातं पेलीतें पेलानं ।
वैणीची माझी बाअी मला सवंगड तोलानं ॥
अग थोरल्या जात्यावरी मला अुलीसा हात लाव ।
तुझ्या हातचा अंत पाहुं ग गीता अंत पाहुं ॥
दळूं मला लाग बाई माझी हळुंहळुं ।
लाल्या बागेंत केळुं[2] ॥ ४५२

---

१ नवसाची.

२ केळीचें झाड हें हिंदुधर्मांत किती पवित्र मानतात हें केळीचीं पानें व खांब मंगल प्रसंगीं शोभेकरता अुपयोगांत आणतात या प्रथेवरून कळून येतें. जानपद ओव्यांतून पुष्कळदा खालील कल्पना दिसून येते. केळीचें झाड (स्त्री.) हें अितकें पवित्र असतें की केळीला जीं फळें येतात तीं कोठल्याहि नरझाडाच्या मदतीशिवाय येतात ("माळ्याच्या मळ्यांत नको जाअूं कळवातिणी । पुरुषावांचुनी केळी झाल्या बाळंतिणी।।). म्हणूनच साध्वी स्त्रीची तुलना केळीशीं व तिच्या मुलांची केळीच्या फळांशीं केलेली आढळते. गाणारी स्त्री या ठिकाणीं अप्रत्यक्षपणें स्वतः फार साध्वी स्त्री आहे हें सुचवीत आहे.

दळूं मला लाग बस जात्याच्या जंवळी ।
बहिणी हंसाबाई जव मनगटं कवळीं ।। ४५३

दळूं मेला लाग बाअी माझी ती नागर।
शिरीं केसाचं आगर टाकी भुजेच्या माघार ।।

आपल्या माणसांकरता दळण्यासारखें कठीण कामहि करण्यांत स्त्रीला किती आनंद होतो हें खालील ओव्यांत दिसतें—

दळाण रंधान माझ्या हातांतील खेळु ।
देरे देवराया मला माणसं बैल बळु ।। ४५५

सोनसळी गहू मी दळीतें नखुल्याला ।
माझ्या बंधवाला भाअूबीज धाकल्याला ।।

दळण भाकरी माझं तव्हाच व्हायाचं ।
अवघड वाटतं मला पाण्याला जायाच ।।४५६

गहू दळीतें पोळ्याला डाळ दळीतें मज्याला ।
जेवण करीतें म्यापल्या माहेरच्या राजाला ।।

दळण दळीतें सूप मरूनी हरघडी ।
माझ्या बधुच्या शेतात बारा बैल चार गडी ।।

बारीक दळणाची भाकर चवघडी ।
बयाच्या जेवणाची याद होतीया घडुघडी ।।

अत्यंत बारीक पीठ दळणें म्हणजेच दळणांतील कौशल्य—

गरतीचा गरतवा कशांत ओळखावा ?
बहिणी गयाबाअी तिच्या पीठांत बारकावा ।।

जातीयाची शीग मोडूं नये ती बोटानं[1] ।
नेणती साळुबाई तुझ्या पाठचा पठाण ।।४६२

अशा तऱ्हेच्या ओव्यातून मधूनच खालीलप्रमाणे अेखादी विनोदी ओवीहि गुंफली जाते :—

दळण दळीतें मकाबाअीचा खकाणा । भरतारापरास माझा मैतार देखणा ।। ४६३ ।।

अेकमेकींच्या मदतीने ज्याप्रमाणे दळण्याचा भार हलका होतो त्याप्रमाणे गाण्यामुळेहि श्रमांची जाणीव कमी होते. जात्याच्या कंटाळवाण्या घरघरींत, सुरांत गाअिलेल्या ओवींमुळे अेक प्रकारची गोडी अुत्पन्न होते. खरोखरच जात्यावर दळतांना ओव्या आळवणें हें ग्रामीण स्त्रियांच्या अितकें अंगवळणीं पडलेलें असतें की ज्या स्त्रीला मुळीच गातां येत नाही तिची खालील ओवींत मोठ्या मार्मिकपणें टिंगल केलेली आहे :—

जिला येईना गाणं तिनं कशाला गावावं ?
दळतांना दाण खाव नांगरामागे काशीच्या[2] जावं ।।

अग पहिल्या ओवीचा म्या सारोपं[3] पाहिला ।
सर्ज्या माझ्या बंधु रामें जात्यावर गाअीला ।।

पण दळण्यासारखें जड काम करण्यास लागणारें बळ कोठून येतें ? खालील ओवींतून गाणारी स्त्री अभिमानानें सांगते की—

१ दळलेल्या पिठाची शीग (निमुळति रास) बोटाने मोडली तर तें भावाच्या जीवाला बाअीट असतें अशी समजूत आहे.

२ 'काशी' म्हणजे हरळी किंवा 'काशी' हा शब्दप्रयोग जानपद ओव्यांतून पुष्कळदा आअीबद्दल योजतात (आअी काशीप्रमाणे पवित्र म्हणून). दळतांना व नांगरणी करतांना दोन्ही वेळीं गाणीं म्हणण्याची शेतकरी स्त्रियांची पद्धत असल्यामुळे जिला मुळींच गातां येत नाही तिने दळतांना नुसते दाणेच खावेत व नांगराच्या केवळ मागेच हिंडावें.

३ सारूप्य = सारखेपणा (मूर्तिमंत स्वरूप).

४ पुष्कळदा अनेक ओव्यांची मालिका गातात त्या वेळीं प्रत्येक ओवी कोणातरी देवाला किंवा थोर व्यक्तीला अर्पण करतात. पहिली ओवी बहुधा रामाच्या नांवाने गातात.

जातं ओढायाला याला कशाला हावं बळ ?
बयाचं प्यालें दूध पांची बोटांतें माझ्या कळ ॥
दळाण दळीतें मीच खंडीला द्रेतें मांडी[2] ।
बयाचं प्यालें दूध देही पोलादाची कांडी[3] ॥

जातं वोढायाला माझ्या बाह्या लोखंडाच्या ।
बयानं दिली गुटी जायफळ वेखंडाच्या ४६८
जातं ओढितांना घाम अुतरला पोटीं ।
माझ्या बया काशीच्या दुधाला सर्दी मोठी[4] ॥

दळण संपण्याच्या वेळीं खालील प्रकारच्या ओव्या गाअिल्या जातात :—

सरील दळांण अुरील आठवी[5] ।
सोन्याचा बटवा भीमाशंकरीं पाठवा ॥४७०
सरील दळाण सरो माझी सरस्वती[6] ।
दादाच्या डफावरी महादेव पारवती ॥४७१
सरील दळाण सरता शिव झाला ।
प्रभुं फेरीला निघाला वाध दवण्याचा आला ॥

सरील दळाण माझ्या सुपांत केवर्डा[8] ।
पंढरींचा अिठु तान्ह्या बाळकाअेवढा ॥४७३
सरील दळाण पीठ मरलं ताब्यांत ।
आअी लखाबाअी[9] अुभी केळीच्या डांभ्यांत ॥
सरील दळाण माझ्या सुपाच्या कोनी ।
जात्याच धनिणी तुम्ह डोळ जाव दोन्ही ॥४७५

निरनिराळ्या सुचलेल्या कल्पनांवरून ज्याप्रमाणे ओवींची रचना केली जाते त्याप्रमाणे कांही ओव्या देवादिकांच्या किंवा थोर व्यक्तींच्या नांवाने गायल्या जातात. अेकेक ओवी म्हणजे अेकेक फूल अशी कल्पना केली तर अशा तऱ्हेच्या अनेक फुलांची अेकेक माळ गुंफली जाते. अशा माळेंतील प्रत्येक ओवी कुठल्या तरी देवाला किंवा थोर विभूतीला अर्पण केलेली असते. व्यक्तीच्या थोरपणाला अनुसरूनच अर्पित ओव्यांचा अनुक्रम असतो. अशा रीतीने देवादिक, पुराणांतील थोर विभूति, चंद्र, सूर्य वगैरे ग्रह आणि पृथ्वीवरील सर्वांत थोर व्यक्ति म्हणजे आअीबाप या सर्वांना ओव्या अर्पण केलेल्या आढळतात. निरनिराळ्या मालिकांतील ओवींची संख्या निरनिराळी असूं शकते तरी पण ५ व ९ ह्या संख्या जास्त प्रमाणांत आढळतात. अशा तऱ्हेच्या ओवीमालिका खाली दिल्या आहेत :—

पहिली माझी ओवी गणराज गणपती ।
भरल्या सभेमधीं सारजाअू अुभी होती ॥ १
दुसरी माझी ओवी गणराज तुम्हा याव ।
घागऱ्याची चाळ संग सारजाला तुम्ही घ्याव ॥
तीसरी माझी ओवी गणराज कां अुपाशी ?
साखरेचे लाडू तोंड सोडितो तुपाशीं ॥३

१ किंवा "नखाबोटामधीं".

२ अेका मांडीला अेक खंडीभर दळतें.

३ किंवा :—"दळाण मळाण माझ्या नखाच्या अंगटीं ।
बयाचं प्यालें दूध देही पोलादी कांबटी ॥"

४ किंवा :—"जातं ओढीतांना घामानं केली गर्दी ।
बया माझी काशी जायफळांत झाली सर्दी ॥"

५ आठवा भाग; आठवी मूठ. प्रत्येक ओवी ज्याप्रमाणे कोणाच्या तरी नांवाने गातात त्याप्रमाणे प्रत्येक मूठ कोणाच्या तरी नांवाने जात्यांत घालतात.

६ सरस्वतीच्या नांवाची मूठ.

७ सूर्यनारायण. सकाळ झाली, दळण संपलें, असा भाव.

८ कोंडा.

९ लखाबाअी म्हणजे लक्ष्मी. या ठिकाणीं हा शब्दप्रयोग कडकलक्ष्मीला अुद्देशून योजिला असावा असें दिसतें. खेड्यांतून सकाळच्या प्रहरीं कडकलक्ष्मी दारोदार हिंडते; म्हणजे दळण संपलें व सकाळ झाली असा भाव.

अनुक्रमणिका

चवथीं माझीं ओवी चवथींच्या चांदाला ।
तेहतीस कोटी ऋषी द्रुपदीच्या मावंडाला ॥४
पांचवी माझी ओवी मारुती ब्राह्मणाला ।
नवलक्ष्मीं ती गळ्या तिला जानव्याला ॥ ५
सहावी माझी ओवी बाजींवेरीं[1] गायिली ।
माझी ब्राअी[2] दारीं तुळस राहिली ॥६
सातवी माझी ओवी ओवीचा काय नेम ।
तुळशीच्या झाडाखाली पोथी वाची अिथं राम ॥
नववी[3] माझी ओवी म्या तो सारोपा पाहिला।
देवा पांडुरंगा गण न्यातीनं गाअीला ॥४७६
पहिली माझी ओवी कैलासी अैकूं गेली ।
अिंद्रसभा जागी झाली ॥१
दुसरी माझी ओवी ओवीचा नित नेम ।
देवमारुती पहिलवान ॥२
तीसरी माझी ओवी येसीपासल्या मारुतीला ।
जळ कापूर आरतीला ॥३
चवथी माझी ओवी मारुती ब्रामणाला ।
नवलक्ष मोती दुपेरी जानव्याला ॥४
पांचवी माझी ओवी पांची पांडवाला ।
द्रुपदीच्या बंधवाला मग म्यापल्या बंधवाला ॥
पहिली माझी ओवी ओवीचा काय नेम ।
पोथी वाचायाला तुळशीखाली राम ॥१
दुसरी माझी ओवी धर्तरी मेघाला ।
बया माझी बाजी जल्म दिलेल्या दोघालों[4] ॥२
तीसरी माझी ओवी पित्या माझ्याला गायीली ।
गंधारी माझी गोदु माझी तुळस राहिली ॥३
चवथी माझी ओवी चवथीच्या चांदाला ।
जल्म दिलेल्या दोघाला ॥४
पांचवी माझी ओवी पांची पांडवाला ।
द्रौपदीच्या बंधवाला ॥४७८॥
पहिली माझी ओवी पहिल्या पानाची ।
सीता गाअीली रामाची ॥१
दूसरी माझी ओवी ओवीचा काय नेम ।
पोथी वाचयीतो तुळशीखाली राम ॥२
तीसरी माझी ओवी गाती मात्यापित्या ।
जन्म दिलेल्या भागिरथ्या ॥३
पांचवी[5] माझी ओवी पांची पांडवाला ।
द्रुपदीच्या बांधवाला ॥४७९

पुष्कळदा सबंध मालिका मिळत नाही, परंतु खालीलप्रमाणे अेखादी ओवी सांपडते:—

पहिली माझी ओवी चंद्रभागेचा आकार ।
देवा कुंडलिकाचं पाण्यांत शिखर ॥१॥

अुच्च वर्गातील स्त्रियांत प्रचलित असणारी अशा तऱ्हेची सव्वीस ओव्यांची अेक सुसंबद्ध मालिका मिळालेली अहे ती या ठिकाणीं देत आहें. त्यांतील सर्व ओव्या साडेतीनचरणी आहेत :—

पहिली माझी ओवी पहिला माझा नेम ।
तुळशीपाशीं राम पोथी वाची ॥१॥
दूसरी माझी ओवी दुजा नाही भाव ।
चरणीं द्यावा ठाव पांडुरंगा ॥२॥
तीसरी माझी ओवी तीन त्रिकुटाचे परी ।
महाविष्णूवरी तुलसीपत्र ॥३॥
चवथी माझी ओवी चवथीच्या चांदा ।
मोती तुझ्या मांगा तुळसादेवी ॥४॥
पांचवी माझी ओवी पांची पांडवांना ।
पाठीच्या मावंडांना विद्या येवो ॥५॥
(द्रौपदी अर्जुनाला माळ घाली ॥५॥)
सहावी माझी ओवी साअुलीच्या छाया पडे ।
तुझ्या गर्भी तेज चढे काकूबाअी ॥६॥
सातवी माझी ओवी सात ज्योतिर्लिंगें ।
त्यांत माझीं दोघें मायबापें ॥७॥

---

१ 'बाजी' हा शब्द पित्याच्याबद्दल खेडुत स्त्रिया अुपयोगांत आणतात.

२ आअी; तुळशीचें रोप पवित्र मानलें जातें म्हणून आअीची तुलना पुष्कळदा तुळशीशीं करतात.

३ आठवी ओवी मिळाली नाही.

४ धर्तरी व मेघ यांना काव्यांत अनुक्रमें आअी व बाप यांची अुपमा दिलेली असते त्यामुळे ही ओवी जास्त सयुक्तिक झाली आहे.

५ चवथी ओवी मिळाली नाही.

(सातवी माझी ओवी सात सप्तऋषी ।
आठवी आरुंधती नमीयेली ।।७।।)
आठवी माझी ओवी आठ ओटे पट्टे ।
देवाजीचे ओटे रंगवीले ।।८।।
नववी माझी ओवी नव्वू नागकुळें ।
पूजीत मी गेलें पंचमीला ।।९।।
दहावी माझी ओवी दशांगुळें मी गाअीन ।
लक्ष्मी होअीन सर्वसारी ।।१०।।
(दहावी माझी ओवी दशरथाचे वंशीं ।
कौसल्येच्या कुशीं रामचंद्र ।।१०।।)
अकरावी माझी ओवी न करावा आळस ।
देवात्रिंबककळस सोनीयाचा ।।११।।
बारावी माझी ओवी बारा आदितवार ।
सूर्याला नमस्कार घालूं दोघी ।।१२।।
तेरावी माझी ओवी तेरा आअुली पाअुलीं ।
मला भेटली माअुली तुळसादेवी ।।१३।।
चवदावी माझी ओवी चवदा चवकड्यांची ।
पालखी मोतियाची देवाजीची ।।१४।।
पंधरावी माझी ओवी पंधरा ह्या खिडक्या ।
मैदानी पालख्या देवाजीच्या ।।१५।।
सोळावी माझी ओवी सोळा सोमवार ।
वडापिंपळा बांध पार बापाजी हो ।।१६।।
सतरावी माझी ओवी सतरा शंखांची दाटणी ।
कृष्णाला रुक्मीणी माळ घाली ।।१७।।
अठरावी माझी ओवी अठरा हे ग गहू ।
नैवेद्याला लाडू मोरयाचे ।।१८।।
अेकोणीसावी माझी ओवी अेकोणीसावी गोरी राया ।
आम्ही बहिणी सारखीया ।।१९।।
वीसावी माझी ओवी विसाव्या पानाचीं ।
निशाणें देवाजींचीं अुभीं करा ।।२०।।
अेकवीसावी माझी ओवी अेकवीस मोदक ।
तुम्हां मोरयाचें व्रत बापाजी हो ।।२१।।
(अेकवीसावी माझी ओवी अेकवीस दुर्वांचें आसन ।
तुम्हां मोरया प्रसन्न बापाजी हो ।।२१।।)
बाविसावी माझी ओवी बावीस खंडी भात ।
मांगिरी आली आंत बापाजी हो ।।२२।।
तेविसावी माझी ओवी तेवीस खण्डी वऱ्या ।
मांगिरी आली दर्या बापाजी हो ।।२३।।
चोविसावी माझी ओवी चोवीस खंडी गहू ।
मांगिरी आली पाहूं बापाजी हो ।।२४।।
पंचविसावी माझी ओवी खुंटुं नये ।
नांदतें माझें सये सासर माहेर ।।२५।।
सव्वीसावी माझी ओवी सरसकट सहादेवा ।
आरती महादेवा कापूराची ।।२६।। ।।४८१

खेड्यांतील जीवनाचीं निरनिराळीं चित्रें रेखाटणाऱ्या ओव्या असंख्य आहेत. शेतकऱ्याची शेतावरील निरनिराळीं कामें, गवळ्याचें काम किंवा माळ्याचें काम यासंबंधीचे अुल्लेख कितीतरी ओव्यांतून आढळतात; परंतु खेड्यांतील आयुष्यक्रमाचीं चित्रें रंगविणें हा गाणाऱ्या स्त्रियांचा प्रमुख हेतु दिसत नाही, तर या ओव्यांतून अुठावदारपणें दिसून येणारा भाग म्हणजे कुटुंबांतील निरनिराळ्या माणसांना अेकमेकांबद्दल वाटणाऱ्या भावना. पुष्कळशा ओव्या कुटुंबांतल्या किंवा सभोवतालच्या कोणातरी माणसावरून गाअीलेल्या असतात व गाणारणीला त्या माणसाबद्दल वाटणाऱ्या भावना या त्यांतून प्रामुख्याने व्यक्त झालेल्या असतात. अर्थात् अशा तऱ्हेने भावना व्यक्त करण्याकरता पार्श्वभूमि खेड्यांतील जीवनाचीच घेतलेली असते. खेडेगांवांतील लोकांचे निरनिराळे उद्योग, धार्मिक कर्तव्यें, करमणुकीचे कार्यक्रम अशा तऱ्हेच्या जीवनांतील सर्व बाजूंचीं चित्रें योग्य ठिकाणीं पार्श्वभूमीला घेअून त्यांवर मानवी मनाचीं भावनाचित्रें रंगविलेलीं असतात. म्हणूनच अशा तऱ्हेच्या ओव्यांचे वर्गीकरण खेड्यांतील निरनिराळ्या जीवनाच्या दृष्टीने न करता भावनांच्या दृष्टीने केलेलें आहे. तरी पण प्रातःकाळ व सायंकाळ यांवरील खास ओव्या बऱ्याच मिळतात. या ठिकाणीं प्रथम त्या देत आहें :—

१ गलबत.

अुगवला दिन अून पडूं दे माझ्या दारीं ।
दह्यादुधाची कर न्यारी[1] मग पृथिमी घ्यावी सारी
अुगवला दिन जशी सोनियाची घडी ।
सर्व्या पृथिमी आधी मीच लेईन त्याला मांडीवरी
अुगवला दिन आहे तांबडी त्याची काया ।
त्याला ओवाळी अिंद्रसभेची अनसूया[2] ॥
अुगवला दिन गंगनीं लावी ध्वजा ।
देव भगवान सार्‍या पृथिमीचा राजा ॥४८५
अुगवला दिन सार्‍या पृथिमीखालता ।
त्याच्या अंगावरी नवलाखाचा घोंगता ॥
अुगवला नारायण जसा आगीचा भडका ।
सुवर्णाच्या तेजी याला मोत्यांच्या सड्का ॥
अुगवला दिन अुगवता काय गुण ? ।
माणिक चौकामधी पिवळं पडं अून ॥४८८॥
अुगवला दिन अुगवता बाळचरों[3] ।
मर दोपारीं डौल न्यारा ॥ ४८९ ॥
अुगवला दिन आगिनपासोडा घेअोनी ।
मावळाया जातो शेर दुनियाला देअोनी ॥

अुगवला नारायण तांबडी त्याची घडी ।
मी आपल्या बाळाला औख मागतें वाढीदिडी ॥
नारायणबापा तुला मागत नाही कांही ।
राघू माझ्या मैनाला औख घाल लअी ॥४९२
नारायण बापा मला अुगव चांगला ।
तान्हा माझा राघू दूरदेशीं लक्ष प्राण लागला ॥
अुगवला नारायण झाल्या तांबड्या माझ्या भिंती ।
पाठीच्या पोटिच्याला औख मागाया अुभी होती
अुगवला दिन जशी शेंदराची पुडी ।
माझ्या बंधवाला औख मागितें वाढीदिडी ॥
नारायणबापा सर्वस्ताचं बरं कर ।
बंधवाला माझ्या शेवटीं हातीं धर ॥ ४९६ ॥
नारायणाला हात जोडीतें रोज रोज ।
जतन कर देवा माझी पाठभुज ॥ ४९७ ॥
निघाला सुर्व्या तांबड्या याच्या खापा ।
आअुख मागतें रंभा तुझ्या बापा ॥ ४९८ ॥
अुगवला नारायण गेला आअिवाच्या[4] आळीं ।
पाठीची मायबहीण कुकु देखीलं कपाळीं ॥

धार्मिक कर्तव्यें करण्यास सकाळचा समय शुभ समजला जातो. राम-नाम, पूजा-अर्चा वगैरे कर्तव्यें प्रथम करून नंतर रोजच्या कामास सुरुवात केली जाते :—

सकाळचा पारा देवाधरमाचा ।
वर हात झाला माझ्या राजकारणाचा ॥ ५००
अुगवला दिन तांबडी त्याची काया ।
दशरथाच्या पोटीं जन्मला रामराया ॥५०१॥
सकाळचा पारा रामरायाचा वकुत ।
रामाचें नांव घेती चतुर झोपेंत ॥ ५०२ ॥
राम राम म्हणूं राम माझी साडीचोळी ।
अुलटतें घडी सकाळच्या प्रातःकाळीं ॥५०३॥

सकाळीं अुठुयुनी पुरुषाला काय काम ?
मंदिलावरी हात मुखीं याच्या राम राम॥५०४
सकाळींच्या पारीं राम राम कुणीं केला ?
चेला गुरुच्या घरीं गेला[5] ॥ ५०५ ॥
सकाळीं अुठूनी रामनाम माझ्या मुखीं ।
नारायणदेवा सर्व राहूं दे माझी सुखी ॥५०६
पहाटच्या पार्‍यामधें हात जोडीतें रामाला ।
पोटीच्या बाळाला औख मागतें देवाला॥५०७

---

१ सूर्याला अतिथी समजून म्हटलें आहे की आधी माझ्या घरीं दह्यादुधाची न्याहारी कर आणि मग सर्व पृथ्वीभर फीर. या ओवीचा दुसरा चरण खालीलप्रमाणेहि आढळतो :—

"देव भगवान मंग पृथिमी घ्यावी सारी"

२ अत्रि ऋषीची साध्वी स्त्री अनसूया हिच्याबद्दल पुराणांत अशी अेक कथा आहे की अेकदा अेका ऋषिपत्नीने सूर्याला शाप देअून सूर्योदय बंद केला त्या वेळीं अितर ऋषींच्या विनंतीवरून अनसूयेने आपल्या तपोबलाने पुन्हा सूर्योदय करविला.

३ लहान बालकाप्रमाणे.

४ आअिव = आहेव = अविधवा; सवाष्ण स्त्री.

५ किंवा दुसरा चरण:—"माझ्या गुरुजीचा चेला नित रामाचं ध्यान त्याला."

सकाळच्या पारीं रामरायाला सुमरन ।
जनतास कर माझ्या घरीचं कांम्ररूण ॥५०८
सकाळीं अुठोनी नांव घ्यावं त्या रामाचं ।
धरण्या मातेवरी मंग पाअूल नेमाचं ॥५०९
सकाळीं अुटोनी आधीं रामाचं नांव घेती ।
आणि सयांनो किती सांगूं चिंतिल्या कामा जाती
सकाळीं अुटोनी तोंड माझं पिराकड ।
अुघडा मारवती राम रथावरी चढ ॥५११
सकाळीं अुटोनी तोंड बघावें अेकीचें ।
दारीं वृंदावनीं झाड तूळशीसखीचें ॥५१२
सकाळीच्या पारीं दारीं तुळस दहिवरली ।
माझ्या बयाअीनं पतिव्रतानं पूजा केली ॥५१३
सकाळीं अुठुयुनी मी अुघडी परडीदार ।
अुघडी परडीदार तुळस थंडगार ॥५१४
सकाळीं अुटूनी मला लक्षा लाभ झाला ।
तुळशीच्या ओट्यावरी करंडा कुकवाचा सापडला
सकाळीच्या पारीं वासुदेवा देतं शेला ।
आजा गुजराची कुळी अुजरीत गेला ॥५१६
पाहाटच्या पाऱ्यामधीं कोण आलाया गुडघमिटी
कष्ट करीतो पोटीच्या पुत्रासाठीं ॥५१७॥
सकाळीं अुटूनी हात जोडीतें सुखाला ।
औख मागतें भावजअीच्या कुकवाला ॥५१८
अुगवला नारायण कधी येशील वरवर ? ।
राघोबाचं माझ्या नांव ठेवीन गंगाधर ॥५१९
अुगवला दिन अुगव बिगीबिगी ।
चुडदानाला जाअूं दोघी ॥५२०॥

परंतु धार्मिक कर्तव्यांशिवाय सकाळीं करण्याचीं रोजचीं अितर कामें असतातच. खालील ओव्यांतून प्रातःसमयींच्या खेड्यांतील जीवनाचीं कांही दृश्यें दिसतात. खेड्यांतील प्रातःकालच्या आल्हाददायक वातावरणाने तीं ओतप्रोत असल्यामुळे मनोवेधक वाटतात—

पहाटच्या पाऱ्यामधीं जागी झाली सारी दुनिया।
राजा अिंदुराची कनिया ॥५२१॥
पहाटच्या पाऱ्यामधीं दांडीवाला झोंपीं गेला ।
माळी भरण्याचा[१] कऱ्हां गेला ॥५२२॥
दिवस अुगवला किरणं टाकी झपझपा ।
माझी मायाबहिण नागीण लोटी सोपा ॥५२३
सकाळीच्या पारीं चल अंगण लोटूं दोघी ।
माझ्या दारामधीं सुर्व्या पावणा आला बिगी ॥
सकाळच्या पारीं मीच लोटतें ओसरी ।
माझ्या बाअीसाठी बाळ आल्याती दुसरी ॥
भरताराची सेवा कोण करीते पतिव्रता ।
आंघोळीला पाणी ठेवीतें शुक्री अुगवतां ॥
सकाळीच्या पारीं हात भरलं अमृताने ।
आंदण दिली गाअी बंधु माझ्या सम्रताने ॥
पहाटच्या पाऱ्यांत रवीबाअीचा गजर ।
माझ्या बंधवाचा मला गवळ्याचा शेजार ॥
सकाळीच्या पहारीं अुजळते वाटी लोटी ।
माझा बंधुराया आलाया न्याहारीसाठी ॥५२९
पहाटच्या पाऱ्यामंदी कोण हौशा गाणं गात ।
बयाचं माझ्या बाळ तान्हया अुसाला पाणी देत

वरील ओव्यांतून खेड्यांतील शेतकऱ्यांचा प्रातःकाळचा अुत्साह दिसून येतो. परंतु तोच शेतकरी खेड्यांतील मोकळें वातावरण सोडून गजबजलेल्या शहरांत आला म्हणजे बदललेल्या परिस्थितीनें त्याची वृत्ति अजिबात पालटते. खालील अेकच ओवी याचें अुत्तम अुदाहरण आहे. खेड्यांतील स्त्री सकाळच्या प्रहरीं सूर्याचें आनंदाने स्वागत करते तर शहरांतील स्त्री रात्रपाळीहून आलेल्या आपल्या भावाची झोंप मोडूं नये म्हणून सकाळच्या हालचालींकडे थोड्या निरुत्साहाने पाहते—

सकाळीच्या पारीं गिरणबाअी हळू कोक ।
माझ्या बंधवाची बाजूवाल्याची पहिली झोप ॥

सायंकालावर फार थोड्या ओव्या मिळतात. दिवसभराच्या कष्टाच्या कामानंतर संध्याकाळची वेळ म्हणजे शेतकऱ्यांना बहुतेक विश्रांतीची असते. खालील ओव्यांतून संध्याकाळीं घरांत दिवे लावणाऱ्या किंवा कामाला गेलेल्या आपल्या नातलगांची वाट पाहणाऱ्या स्त्रियांचीं

१ भरण = झाडास पाणी घालणें, बुंध्यास माती पुरविणें वगैरे.

दृश्यें रंगविलेलीं दिसतात.—

दिवस मावळला बारामतीच्या मैलावरी।
आता माझ्या बंधु टाक चाबूक बैलावारी॥
दिवस मावळला फलटण गांवींच्या वाळवंटीं।
तांब्याचीं पत्रं बंधुच्या पिरवंटी॥५३३॥
दिवस मावळला माळाच्या पोटीं अून।
ताअीत बंधवाची करडी घोडी पिवळा जीन॥
दिवस मावळला झाडींत झळकला।
माझा बंधुराया म्यां तर चालींत ओळखला॥
दिवस मावळला चुनखडी।
कस्तुरी बाबअी बाअी जाती गिरजाला पावंणी
दिवस मावळला दिवसापाशीं माझं काय।
माझा बंधुराया गावां गेला आला नाय॥५३७
कितीक वाट पाहूं गावां गेलेल्या मेवण्याची।
सांवली परतली दारीच्या शेवग्याची॥५३८॥
हात मी जोडितें जरा रातीबाअी थांब।
गांवा गेला बंधू दौलतीचा खांब॥५३९॥
सवा सांज झाली दिवा लाव सवाषिणी।
माझ्या बंधवाच्या गाया आल्यात मोकाशिणी॥
सवा सांज झाली दिवा लाव पारवती।
माझ्या वाड्यामंदी मुंजाबा मारवती॥५४१॥
सवा सांज झाली नको धरूंस कोपरा।
वाळायाची माझ्या जावळाची जतरा॥५४२॥
दिवस मावळला दिवा लाव राअीबाअी।
पोटींचा बाळराज सखा पाजी तान्ह्या गाअी॥

---

## स्त्रियांच्या म्हणी

( ६१ व्या अंकावरून पुढे )

(५८१) चुकला घाव, अैरणीच्या माथीं.
(५८२) लेक मोठ्या घरीं, अन् भेटायची चोरी.
(५८३) खटपट करी, तो पोट भरी.
(५८४) न्हाव्याचा अुकिरडा अुकरला, तर सर्व केसच.
(५८५) डोळा काना असावा, पण गाव काणा नसावा (गावाची अवकृपा नसावी).
(५८६) गंध्याची चापट बरी, पण तेल्याची संगत नको.
(५८७) अुकिरड्याची दैना बारा वर्षांनी फिटते.
(५८८) दाराला कुलूप, हिंडते मुलूख.
(५८९) सख्ख्या बहिणी, पक्क्या वैरिणी.
(५९०) जावा जावा अुभा दावा.
(५९१) तूं कर वटवट, मी आहें निगरगट्ट.
(५९२) पोसलेला कुत्रा अंगावर येतो.
(५९३) तिळास गूळ बोळवण.
(५९४) ज्याचे घरीं दाणा, त्यास म्हणती नाना.
(५९५) देअी घेअी ती गोमटी, नाही देअी ती हिमटी.
(५९६) असेल गाठीस तंर लागेल पाठीस.

---

१ कनवटीला.

# परिषद्-संमेलनांची निरर्थक सांगड



**(लेखक— श्री. दिनकर विनायक काळे)**

महाराष्ट्र-साहित्य-परिषदेचा बराच जुना घटक (सभासद) म्हणून साहित्य-परिषद् आणि साहित्य-संमेलन या दोहोंकडेहि माझें लक्ष आहे, आणि जरी साहित्य-संमेलनाच्या प्रत्येक अधिवेशनाला हजर राहण्याचें माझ्या हातून जमलें नसलें तरी बहुतेक पार पडलेल्या अधिवेशनांबद्दल आस्थापूर्वक मीं माहिती मिळविण्याची काळजी घेतलेली आहे. अितकें सांगितल्यावर कांहीं गाजलेल्या अधिवेशनांना मी समक्ष अुपस्थित होतों हें आदरून नच सांगितलें तरी चालण्यासारखें आहे. मात्र अुपस्थित होतों त्या सर्व अधिवेशनांत माझी भूमिका कार्यकर्त्याची नव्हती, केवळ निरीक्षकाची होती, हें स्पष्ट करणें अवश्य आहे. असें स्पष्ट करण्याचे हेतु दोन— अेक असा कीं, हें स्पष्ट केल्यामुळे, माझ्या पुढील विवेचनांत कोणत्याहि प्रकारच्या हर्षामर्षाचा वास हुडकून काढण्याचें कोणाला कारण आढळणार नाही. आणि दुसरा असा कीं, त्रयस्थाची भूमिका घेणाऱ्याच्या निरीक्षणशक्तीवर थोडासा विश्वास असेल तर त्याला प्रत्यक्ष कार्यकर्त्यांच्या दृष्टिकोनापेक्षा निराळ्या दृष्टिकोनाने गोष्टी पाहतां येतात ही शक्यता जमेस धरतां येअील. आणखीहि अेक गोष्ट आरंभींच सांगून ठेवलेली बरी. परिषदेचे अुद्देश आणि ते अुद्देश साध्य होण्याकरिता अुपयोजावयाचीं साधनें यांबद्दल महाराष्ट्र-साहित्य-परिषदेच्या घटनेमध्ये नमूद असलेलीं कलमें २ व ३ हीं संपूर्णतया मला मान्य आहेत. किंबहुना त्यांच्या सिद्धीवरच परिषदेचें आणि संमेलनाचें कार्य यांची खरी कसोटी लावावयाची आहे, लाविली पाहिजे, या दृष्टीने सर्व कारभाराकडे मी पाहत आलेला आहें. आणि यापुढे जे कांही विचार प्रदर्शित केले आहेत त्यांची तरी भूमिका तीच आहे.

तसें म्हटलें तर आजच हे विचार प्रकट करण्याला कांही विशेष कारण घडलें आहे असें म्हणतां यावयाचें नाही; ते यापूर्वीहि मांडतां आले असते; किंवा यानंतरहि मांडावयाचे ठरवून आताच तहकूब केले तरी त्यांत फारसें कांहींच बिघडणार नाही. यांपैकी कांही किंवा सर्वच देखील कल्पना आधीच मांडल्या गेल्या असतील; प्रत्यक्ष लेखांत आल्या नसतील कदाचित्. पण कित्येकांच्या मनांत खासच आल्या असतील. कित्येकांचा प्रत्यक्षाप्रत्यक्ष अम्मलहि चालू असेल. परंतु तशी विचक्षणा करीत न बसतां सर्वच्या सर्वच योजना अेकजिनसी मांडण्याचा फायदा लक्षांत घेअून तशी या टिपणांत दाखल करणार आहें. आणि त्याला प्रसंगहि अगदी नाही असें नाही. अलीकडे आठ पंधरा दिवसांत नाशिक येथे भरावयाच्या २६ व्या महाराष्ट्र-साहित्य-संमेलनाचीं प्रसिद्धिपत्रकें वृत्तपत्रांत आलीं आहेत. 'संमेलनासंबंधी आस्था असणाऱ्या सर्व सज्जनांनी नाशिकच्या कार्यकर्त्यांना सूचना करून...सहकार्य करावें' अशी कार्यकर्त्यांनी विनंती केलेली आहे. हा प्रसंग योग्यच म्हणतां येअील. मात्र पुढील सूचनांचें आवाहन फक्त नाशिकच्या कार्यकर्त्यांपुरतेंच मर्यादित नसून अधिक विस्तृत प्रमाणांवर आहे हें अुघड आहे.

जळगांवच्या साहित्यसंमेलनांत १९३६ सालीं मान्य झालेल्या परिषद्-घटनेच्या सरनाम्यांत 'म. सा. संमेलन व म. सा. परिषद् या दोन संस्था अेकात्म बनतील अशा धोरणाने

परिषदेचा विकास व्हावा' अशी सदिच्छा प्रकट केलेली आहे. या वाक्यांतील 'विकास' या शब्दाचा अर्थ अगदी मर्यादित आहे हें अुघड आहे. परिषदेचा विकास म्हणजे घटनाकलम ३ मधील अुद्देशसिद्धीच्या तपशिलांतील साधनांचा विकास नव्हे, तर 'महाराष्ट्रांतील सर्व साहित्यिक परिषदेचे सभासद होअून संमेलन ही परिषदेची वार्षिक साधारण सभा व्हावी हें या घटनेचें अंतिम साध्य' सिद्ध होण्याच्या दृष्टीचा विकास. म्हणजे कांहीं अेका दृष्टीची तांत्रिक वाढ. घटना बनविण्याच्या कालांतील घडामोडींच्या पार्श्वभूमीवर या घटनेचा विचार केला असतां, परिषदेने स्वीकृत केलेल्या कित्येक महत्त्वाच्या कार्यांच्या प्रगतीचा पुसट विचार देखील हे शब्द घटनेंत नमूद करणारांच्या मनांत आला असेल असें म्हणवत नाही. परिषदेच्या सभासदांच्या संख्येवर जो भर दिला आहे त्यावरूनहि या सरनाम्याच्या अुद्दिष्टाबद्दल यथार्थ कल्पना होते.

परिषद् व संमेलन या दोहोंमधील चुरशीचा अंत करण्याकडेच विशेष लक्ष पुरविणारांच्या मतें या सरनाम्याला कांहीं अेक विवक्षित अर्थ होता यांत शंका नाही. परंतु परिषदेचे अुद्देश व त्यांच्या सिद्धीसाठी अमलांत आणावयाचीं साधनें यांनाच विशेष महत्त्व देणारा असाहि अेक विचारी वर्ग अस्तित्वांत आहे. त्याच्याहि मनांत परिषद् व संमेलन यांच्या संबंधांत तरतमभाव वागत असतो. परंतु तो श्रेष्ठ-कनिष्ठ अशा वर्चस्वभेदाचा नाही. परिषद् व संमेलन यांच्या स्वभावतः भिन्न अशा कार्यक्षेत्रांच्या जाणिवेवर अवलंबून असणारा अुला आहे. संमेलन हा साहित्यिकांचा सोहळा आहे. रा. सा. चापेकर त्याला 'समारम्भ'[१] म्हणतात. 'जेथे साहित्य-संमेलन भरविण्यांत येतें तेथील लोकांच्या मनोवृत्ति अुल्लसित करून त्यांचें स्वभाषेवरील स्वाभाविक प्रेम जागरूक ठेवण्यासाठी हा समारम्भ असतो'[२] असें कै. प्रा. माधवराव पटवर्धन त्याविषयी खुलाशाने सांगतात. अलट परिषदेचे अुद्देश व त्यांचीं साधनें कितीतरी गंभीर, कार्यप्रेरक आणि अत्यंत व्यापक अशीं आहेत. 'दरसाल परिषदेचीं प्रादेशिक व अखिल महाराष्ट्रीय संमेलनें भरविणें व भरविण्यास प्रोत्साहन देणें' हें परिषदेच्या व्यापक ध्येयसिद्धी-करिता अवलंबावयाच्या अनेक साधनांपैकी अेक साधन आहे. प्रथमारंभीं 'मराठी भाषा व साहित्य यांच्या अभिवृद्ध्यर्थ' संमेलन हेंच अेकमेव साधन म्हणून अस्तित्वांत होतें ही गोष्ट खरी असेल. साहित्यपरिषदेची घटना आणि निर्मिति ह्या गोष्टी साहित्यसंमेलनामुळेच झाल्या हेंहि खरें असेल. पण त्यानंतर स्वाभाविकपणेंच साहित्यपरिषदेचें कार्यक्षेत्र स्वतंत्र, व्यापक आणि अधिक चिरस्थायी स्वरूपाचें ठरविण्यांत आलें असल्यामुळे त्याची अप्रतिहत वाढ होअूं देणें हेंच केव्हांहि हितकारक आहे. या दोघांचा संसार परस्परांच्या साहाय्याने सुरळित आणि अुभयतांच्या हिताला पोषक अशा प्रकाराने चालला तर तो हवाच आहे. ही परस्परहित-पोषणाची मर्यादा पाळली जात असेल तोंपर्यंतची 'अेकात्मता' ठीक आहे. परंतु ही अेकात्मता संभाळण्याचा अट्टाहास केल्याने अेकमेकांचे पाय अेकमेकांशीं बांधल्यामुळे घोटाळाच होत असेल तर ही अेकात्मता नष्ट झालेली पुरवली. ही तीन पायांची शर्यत थांबवावीच लागेल. साहित्यसंमेलन या लौकिक समारम्भप्राय संस्थेची वाढ जरूर तर ती स्वावलंबी होण्यापर्यंतहि आता झालेली आहे. अशा तऱ्हेच्या समारंभांचें तन्त्र आता अगदी तालुक्याच्या शहरांनी देखील आत्मसात् केलेलें आहे. पूर्वी 'साहित्यसंमेलन भरविणें अगर भरविण्याची व्यवस्था करणें' हें काम परिषदेने स्वतः करण्याची जरूरी होती. कारण जनतेंत साहित्याची जागृति फारशी झालेली नव्हती. अलीकडे ही जागृति बरीच झाली आहे. व त्यामुळे हें संमेलनें भरविण्याचें

१ सह्याद्रि– मार्च १९३५, पृ.२२०. २ सह्याद्रि– मार्च १९३५, पृ.२२१.

काम परिषदेने केलें नाही तरी तीं भरत राहतील अशीं निश्चित चिन्हें दिसूं लागलीं आहेत.'[३] हें प्रो. वाडेकरांचें मत कोणालाहि मान्य होईल. यावरून संमेलनें व परिषद् यांचा परस्परसंबंध तोडण्यासहि हरकत नाही येथपर्यंतहि विचाराची मजल जाऊं शकेल. अगदी तेथपर्यंत जावयाची जरी कित्येक लोकांची तयारी नसली तथापि दोघांची अगदी घट्ट सांगड बांधण्याची आता आवश्यकता राहिलेली नाही एवढें तरी मान्य होण्यास हरकत नसावी. संमेलनाने मातृभाषेबद्दल जागृतीचा समारंभ म्हणून आपला आकर्षक थाटमाट स्वतंत्रपणें संभाळावा आणि मातृभाषेच्या अभिवृद्ध्यर्थ करावयाच्या भरीव कामगिरीचा मक्ता परिषदेवर सोपवावा. उभयतांनी आपलीं स्वतंत्र कार्यक्षेत्रें चोखाळावीं. त्यांची परस्परांना पूरक होण्याची शक्ति ओळखावी. आणि सत्ता किंवा वर्चस्व याविषयीच्या निरर्थक वादांत पडून त्या शक्तीला व्यत्यय आणूं नये. असेंच चालेल तर कांही एकात्मता राहील. कांही कां? अवश्य तेवढी सर्व एकात्मता राहील. आणि उभयतांनाहि आपापला विकास स्वतःला अनुकूल अशा क्षेत्रांत करून घेतां येईल. परंतु निरर्थक सांगड घातली तर ती खोड्यासारखी होईल. संमेलनाचें ध्येयच मर्यादित असल्याने त्याला हा खोडा विशेष जाचक होणार नाही. साहित्यपरिषदेचा कार्यक्रम विशेष महत्त्वाकांक्षी व चिरकालिक सातत्यलक्षी असल्यामुळे तिला मात्र त्या खोड्यांतून बाहेर पडतां येणार नाही आणि आपल्या मातृभाषेचें पाऊल पुढे पडणें मुष्कील होईल.

परिषद्-संमेलन-वाद म्हणजे घटनावाद चालू असतांना साहित्यसंघटनेच्या या अंगाकडे फारच दुर्लक्ष झालें. पुढेहि त्या अंगाचा कोंडमाराच झाला. तो नजरेसमोर असल्यानेच मुंबईच्या बाविसाव्या साहित्यसंमेलनाचा तीन दिवसांचा सोहळा पाहून आल्यावर प्रस्तुत लेखकालाच 'साहित्यसंमेलनांचें कर्तव्य' अशा तऱ्हेचा लेख लिहिणें अवश्य वाटलें. '...विद्वत्परिषद् आणि चळवळीच्या सभा यांतील फरक ध्यानांत येत नसावा. राजकीय परिषद् आणि साहित्यसंमेलन यांत पुष्कळच फरक आहे. साहित्यपरिषत्पुरस्कृत साहित्यसंमेलनाचें कोणाशीं साधर्म्य असेल तर तें अखिल भारतीय आर्थिक परिषद्, तत्त्वज्ञानपरिषद्, विज्ञानपरिषद् किंवा लोकसंख्यापरिषद् अशांशीं आहे. विद्वज्जनांनी खूप व खोल ज्ञानाचे विभागशः निबंध वाचावे, चर्चा करावी, जगांतील व स्वदेशांतील वाङ्मयीन ज्ञानाचा आढावा घ्यावा, मातृभाषेच्या प्रसार-आकुंचनाबद्दल अभ्यासपूर्वक विधानें करावीं आणि त्यांतून निघणारे निष्कर्ष सर्व प्रमुख आणि आस्थेच्या अशा कार्यकर्त्यांच्या सहकार्याने कांही विधायक कामगिरीच्या मार्गाला लावावे, असा या संमेलनाचा प्रपंच थाटला पाहिजे'[४] अशी कल्पना मीं त्या वेळीं मांडली. ती मांडतांना संमेलनाच्या प्रचलित कार्यपद्धतींत आमूलाग्र फरक व्हावा अशीच मागणी केलेली आहे. परंतु ही इच्छा बाळगणें अयथार्थ आहे असाच अनुभव आला. संमेलन व परिषद् यांचें कार्यक्षेत्रच भिन्न असल्यामुळे त्या संस्थांनी आपापलीं कार्यें अगदी स्वतंत्रपणें चालविणें अपरिहार्य आहे या मताला आता मी येऊन पोंचलों आहें. श्री. विठ्ठल रामजी शिंदे यांचें मत या बाबतींत असंदिग्ध व मार्गदर्शक आहे. '(साहित्यसंमेलन व साहित्यपरिषद् यांपैकी) एकीचेंहि काम पद्धतशीर व समाधानकारक चालत नाही, असें ज्यांना तज्ज्ञता व अनुभव आहे अशा साहित्यिकांना वाटूं लागलें आहे. याचें मुख्य कारण एकीचा हेतु केवळ करमणूक म्हणजे समारंभ हा व दुसरीचा गंभीर म्हणजे संशोधन व स्वतंत्र ग्रंथनिर्मिति हा. हे दोन्ही हेतु फार महत्त्वाचे आहेत. पण ते इतके भिन्न आहेत की त्यांची जबरीची सांगड बांधल्याने दोन्ही नीट साधेनात. समारंभाचें कार्य मात्र जास्त जोरांत चाललें

३ सह्याद्रि– फेब्रुवारी १९३६, पृ.१९४. ४ सह्याद्रि– मे १९३८, पृ. ४३१.

आहे. कारण त्यांत स्त्रियांची व तरुणांची करमणूक होते. म्हणून सालोसाल गर्दी अधिकाधिक जमते. पण तितक्याच प्रमाणांत परिषदेचें किचकट काम मागे पडत चाललें आहे, हें कोणाचे लक्षांत येत नाही'...'साहित्यपरिषदेचें काम असें कांही शिळोप्याचें नाही, की अेखाद्या संमेलनाच्या मागील दालनांत बसून अुरल्यासुरल्या वेळांत आल्यागेल्यांनी तें अुरकून टाकतां येअील. या सभेस तज्ज्ञांनी यावें."[५] यावरून दोघांच्या कार्यक्षेत्राबद्दल आणि त्यांच्या भिन्नत्वाच्या आवश्यकतेबद्दल श्री.शिंदे यांच्या मनांत मुळीच संदेह नाही हें स्पष्ट होअील. प्रचलित कार्यपद्धतीबद्दलचा असंतोष आणि भिन्न व्यवस्थेची आवश्यकता यांबद्दल आजपर्यंत प्रदर्शित झालेलीं कांही मतें अुद्धृत केल्यावर यापुढील विचार करण्याचें काम साहजिकच थोडें सोपें होणार आहे. कोणत्याहि प्रश्नाप्रमाणें, म. सा. परिषदेची म. सा. संमेलनाच्या गोंधळांतून सुटका करण्याच्या या प्रश्नाला तात्त्विक आणि व्यावहारिक अशा दोन्ही बाजू आहेत. आणि या दोन्ही बाजूंचा निर्देश वर दिलेल्या अवतरणांत संक्षेपाने आलेला आहे.

संमेलन आणि परिषद् यांचीं कार्यक्षेत्रें मुळांतच निराळीं आहेत. प्रत्येकाच्या यशाची कसोटीच निराळी आहे. संमेलनाचें यश बहुसंख्येने अुपस्थिति आणि विस्तृत प्रमाणावर जागृति यांवर अवलंबून आहे. मातृभाषेबद्दल आस्था, आवड, अभिमान, अभिनिवेश वाढीला लावण्याचें बहुतांशीं भावनांच्या क्षेत्रांतील कार्य संमेलनाला अभिप्रेत असणार. अुलट, देशांतील आणि जगांतील भाषाभगिनींनी शास्त्रीय आणि संशोधनात्मक क्षेत्रांत जी जी प्रगतीची शीग गांठली असेल ती ती आत्मसात् करून घेण्याचा बौद्धिक विक्रम करणें—करविणें हें परिषदेचें वैशिष्ट्य समजलें पाहिजे, यशाची कसोटी असली पाहिजे. या यशाचे मानकरी नेहमी अल्पसंख्यच असणार. अर्थात् या अल्पसंख्याकांच्या यशाचे आपण भागीदार, साथी, चहाते, प्रोत्साहक आहों ही आपलेपणाची भावना बहुसंख्य लोकांमध्ये सदैव फैलावत ठेवली पाहिजे. बहुसंख्यांना अशा तऱ्हेचें स्वाभिमानपोषक खाद्य पुरविण्याचें कार्य हें परिषदेचें आहे आणि हें अुभयतांचें सहकार्य नेहमी चालू राहील अशी व्यवस्था जिवंत ठेवलीच पाहिजे. पण कोणत्याहि प्रकारचा पौष्टिक आहार सर्वांसाठीच तयार व्हावयाचा असला म्हणून त्याचें साहित्य, निर्मिति, पाकनिष्पत्ति अित्यादि प्रक्रिया देखील सर्व लोकांसमक्ष व सर्वांच्या मान्यतेने झाल्या पाहिजेत हा दुराग्रह ठरेल. त्या तज्ज्ञतेच्याच क्षेत्रांतील समजल्या पाहिजेत. आणि प्रसंगीं लोकांच्या नजरेआड सिद्ध करण्यानेच त्या निर्वेध यशस्वी होण्याची अधिक खात्री असते. ही तात्त्विक भूमिका निरपवाद आहे. आता ध्येय म्हणून कोणी याविरुद्ध वाद घालूं शकणार नाही असें नाही. तो म्हणेल— "मराठी बोलणारे सर्वच लोक अेकसारखे तज्ज्ञ झाले तरच परिषदेचें कार्य यशस्वी झालें असें आम्ही म्हणूं. सर्व जनता सारखी आहे. त्यांत श्रेष्ठकनिष्ठभाव तुम्ही काय म्हणून करतां ? किंबहुना सर्व लोकांना बरोबर घेअून जेथे आम्हांस जातां येणार नाही ती प्रगतिच आम्हांस नको. राजकारणाप्रमाणेच अर्थकारणांत, समाजकारणांत आणि बुद्धिकारणांत व वाङ्मयकारणांत देखील आम्हांला समानताच पाहिजे. वाङ्मयांत श्रेष्ठ कोणतें, कनिष्ठ कोणतें; चांगलें कोणतें, वाअीट कोणतें; श्लील कोणतें, अश्लील कोणतें; हें सर्व आम्ही मताधिक्याने ठरवूं." हें अेकांतिक म्हणणें सर्वमान्य होअील असें वाटत नाही. तसें तें झालेलें नाही, कारण या मताचा आग्रह धरतांच त्यांतील अनेक व्यावहारिक अडचणी दत्त म्हणून लगेच पुढे अुभ्या राहतील, आणि हा आग्रह निव्वळ हास्यास्पद ठरेल. परंतु अशी अेकांतिक मतशाही आणि अुत्तमप्रकारचें बौद्धिक यश यांचा कोणीं मेळ घालून दाखविण्याचें शतकृत्य करून दाखविलें

५ सह्याद्रि- मार्च १९३५, पृ.२२८.

तर अर्थात् तें कौतुकास्पदच म्हटलें पाहिजे.

प्रस्तुत प्रश्नाची व्यावहारिक बाजूहि तितकीच सरळ आहे. परिषदेच्या अुद्देशमालिकें-तील अनेक अुद्देश (साधनें) सतत कार्य करूनच साध्य होण्यासारखे आहेत. त्यांमध्ये यश मिळवावयाचें तर कार्यकर्त्यांचेंहि सातत्य आणि त्या सातत्याच्या पोटीं निर्माण होणारी आणि कांही प्राथमिक तज्ज्ञता गृहीत धरावी लागते. कलमक्रम ३ मधील (आ) पासून (औ) पर्यंत असा कोणताहि अेक कार्यक्रम नाही की ज्याला वर्षोतून सतत कांही दिवस आणि वर्षामागून अनेक वर्षे अेकसारखें काम केल्याशिवाय भागेल. बहुतेक कामें तज्ज्ञांनी केलीं तरच होतील अशा स्वरूपांचीं आहेत. निदानीं समाजांत कांही विशेष दर्जा प्राप्त झालेलीं माणसें तरी त्या कामांत लक्ष घालणारीं मिळाल्याशिवाय नांव घेण्यासारखें काम होण्याचा संभव कमी. अशा कामांचें तंत्र अगदी निराळें, पद्धतशीर व स्थिर स्वरूपाचें पाहिजे. मपका, अकारण प्रसिद्धि, कित्येक वेळां कालमर्यादेचीं वगैरे बंधनें हीं देखील यशाला मारक ठरतील. मध्यवर्ति कचेरी, स्थिर व आस्थेचा कायमचा सेवकवर्ग, महाराष्ट्रांतील त्या त्या विषयांतील किंवा शाखेंतील संशोधक कार्यकर्त्यांचीं कायमचीं चर्चामंडळें, अुपस्थित होणाऱ्या कोणत्याहि महत्त्वाच्या प्रश्नावर अेकत्र येअून विचारविनिमय करण्याची निरपवाद आणि नेहमी अस्तित्वांत असणारी सोय, या गोष्टींनीच अशा प्रकारचीं कामें वाढीला लागतील. साहित्यपरिषदेने आतापर्यंत केलेलीं 'नवीन शुद्धलेखनाचे नियम', 'कोकणी-अहिराणी भाषेवरील अहवाल', 'व्याकरणचर्चा', 'परिभाषा ठरविणें' अित्यादि कामें अेखाद्या संमेलनाकडून घडवून आणणें अशक्य होतें. कमिट्या नेमणें, खर्च मंजूर करणें, अहवाल मागविणें, प्रसिद्ध करणें हीं तांत्रिक कामें तशीं कठीण नाहीत. परंतु तज्ज्ञांचा मेळावा जमविणें व त्यांच्या हातून सतत काम करून घेणें हें संमेलनाच्या औटघटके-पुरत्या अुत्पन्न झालेल्या कार्यकर्त्यांच्या आवाक्या बाहेरचें आहे हें तत्त्व आधीच मान्य झालेलें आहे. परिषद् हीच संमेलनाची स्वतंत्र अशी कार्यकारी समिति म्हणून मानली जात असते. हेंच तत्त्व जरा आणखी वाढवून त्याची नैसर्गिक परिणति मराठीभाषिकांच्या पदरांत पडली पाहिजे. त्या दृष्टीने सर्व तात्त्विक आणि संशोधनात्मक प्रश्नांचा आमूलाग्र आणि स्वयंपूर्णतेने परामर्श घेणारी अशी तज्ज्ञपरिषद् म्हणून साहित्यपरिषदेचा विकास होण्याची आवश्यकता आहे. आणि ती प्रतिपादन करण्यासाठी प्रस्तुत टिपण लिहिण्यांत येत आहे. म. सा. परिषदेच्या घटनेंतील सरनाम्यांत सूचित केलेला 'विकास' हा या विकासाच्या कल्पनेला पोषक तर नाहीच, पण अुलट विरोधक होणार आहे.

म. सा. परिषदेने हल्लीप्रमाणे मराठीचे अभिमानी घटक (सभासद) करून घेण्याचें काम तसेंच चालू ठेवावें. परंतु त्यांपैकी तज्ज्ञ कोण आहेत याची पद्धतशीर नोंद ठेवावी. अेवढेंच नव्हे तर मराठीभाषिकांपैकीं तज्ज्ञ म्हणून जेवढा आहे त्याचें सहकार्य मिळविण्याचा आटो-काट प्रयत्न करावा व तज्ज्ञ किंवा सर्वसाधारणपणें साहित्यिक अशा दर्जाच्या भरपगारी कार्य-वाहाच्या मार्फत अशा सर्व अभ्यासकांची व तज्ज्ञांची कार्यक्षम संघटना करावी.

परिषदेच्या शाखासभा, संलग्नसंस्था अशा कोणत्या ना कोणत्या परिषद्-संघटनेंत अशा अभ्यासकांचा समावेश करण्याची खबरदारी घ्यावी.

'परिभाषामंडळ', 'व्याकरणसमिति' अशांसारख्या कायमच्या अुपसमित्यांचें कार्य सदैव चालू राहीलच. याशिवाय मराठी भाषेच्या हितसंबंधांचे म्हणून जेवढे महत्त्वाचे प्रश्न असतील त्या त्या अेक किंवा अनेक प्रश्नांचा अभ्यास, विचार, प्रसार करूं अिच्छिणारे सर्व लोक परिषदेच्या नियामकमंडळांत व कार्यकारी मंडळांत सामील होतील अशी तजवीज

करावयास पाहिजे. म्हणजे निवडणुकी करतांना नेहमीचे कारमारी कामांत लक्ष घालणाऱ्या अेकदोन व्यवहारी लोकांची व्यवस्था झाल्यावर अितर जागा अशा अभ्यासकांरिता राखून ठेवण्यांत याव्या. कार्यकारी मंडळाचें हें तज्ज्ञतेचें स्वरूप स्पष्ट होण्यासाठी आणि निवड करणाऱ्यांना योग्य नांवें सुचवितां येण्यासाठी कार्यकारी मंडळाची रचना निरनिराळीं खातीं वांटून घेतलेल्या मराठीच्या प्रधानमंडळासारखी करावी. प्रसारखातें, ग्रंथनिर्मितिखातें, परीक्षाखातें, मराठीवरील आक्रमणखातें, विद्वत्सभाखातें, संशोधनखातें अशीं किंवा कांही निराळीं खातीं पाडून तीं निरनिराळ्या घटकांच्या हातीं सोपवावीं. व त्या त्या खात्याने केलेल्या कामाचा वृत्तान्त जनतेला सादर करण्याची जबाबदारी म्हणजे अर्थात् कांहीना कांही कार्य करण्याची जबाबदारी प्रत्येक घटकावर असावी.

झालेल्या किंवा अपेक्षित अगर नियोजित कार्यांच्या अनुषंगाने प्रत्येक वर्षी खास विद्वत्सभा घडवून आणण्याचें परिषदेने ठरवावें. वर्षभर त्या विषयावर परिश्रम होअून ठरलेल्या दिवशीं अभ्यासकांची विचारविनिमयार्थ सभा होअून तिचे निर्णय लोकांच्या मार्गदर्शनासाठी प्रसिद्ध व्हावे. शक्य तर परिषदेच्या कार्यकर्त्यांनी आवश्यकतेप्रमाणे प्रवास वगैरे करून त्या त्या बाबतींतील अवश्यक तेवढी तपशीलवार माहिती गोळा करून ठेवावी व विद्वत्सभेपुढे मांडावी. अशी माहिती गोळा करण्यासाठी प्रवास करणें विशेष खर्चाचें वाटत असेल तर निदान घरबसल्या पत्रव्यवहार करणें, कर्तनें काढून ठेवणें अित्यादि गोष्टी तरी प्रत्येकाने करणें सहज साध्य आहे.

परिषदेनें केलेल्या अेतद्विषयक कामगिरीची प्रसिद्धि परिषदेच्या त्रैमासिकांत होअीलच. परंतु अेखादा विषय लोकप्रिय करण्याच्या दृष्टीने परिषदेने संमेलनांचा फायदा अवश्य घेतला पाहिजे. विद्वानांचें दर्शन-परिचय होण्याची संमेलनाला येणाऱ्या लोकांना अपेक्षा असते व मराठींतील महत्त्वाच्या घडामोडींचीहि त्यांना माहिती हवी असते. त्या दृष्टीने संमेलन-परिषदेचें सहकार्य अवश्य व्हावें व होणें अिष्टहि आहे.

तपशिलाचा हा केवळ आराखडा सुचविला आहे. यांत फरक अुत्क्रान्तितत्त्वाने होत जाअील. यांत मुळांत अव्यवहार्य असें कांहीच नाही. लोकांच्या औदासीन्याशिवाय अितर कोणताच मोठा अनुल्लंघ्य अडथळा या योजनेला येणार नाही असें वाटतें.

परिषदेने महत्त्वाच्या प्रश्नांवर आपली स्वतःची थोड्याशा तज्ज्ञांपुरती सुटसुटीत आणि अधिक कार्यक्षम अशी सभा नियमितपणें भरवावी आणि त्यासाठी संमेलनासारख्या समारम्भावर अवलंबून राहूं नये. त्या समारम्भांत भाग घ्यावयाचा तो कार्य होत नाही या असमाधानाने घेण्यापेक्षा तेथे महत्त्वाच्या संशोधनकार्याची अपेक्षा न ठेवतांच समारम्भोचित मोकळेपणाने घ्यावा आणि भरीव कामगिरी करण्याची तजवीज अन्य तऱ्हेने करावी हा या सूचनेचा मथितार्थ आहे.

असें केल्याने समारम्भवादी आणि कार्यवादी अशा दोघांचाहि जो आज कोंडमारा होत असतो तो होणार नाही. हा प्रश्न मोठा वादाचा किंवा प्रमाणें मांडून खरेंखोटें करण्याचा आहे अशी माझी समजूत नाही. अनेक संमेलनांना हजर राहून अनुभव आलेल्यांना याबद्दल विशेष सांगावयासच नको. मराठी साहित्यसंमेलनांशिवाय अितरहि परिषदांना अुपस्थित होअून गांठीं जमलेल्या प्रचीतीमुळेच ही सूचना करण्यास मी अुद्युक्त झालों आहें.

परिषत्पुरस्कृत विद्वत्परिषदांचा अुद्देश विशेषतः प्रसार असा नसल्यामुळे त्या संमेलनाप्रमाणे महाराष्ट्रभर फिरत्या राहिल्याच पाहिजेत असें बंधन नसावें. प्रसंगाने अन्यस्थळीं

भरविण्यासहि हरकत नसावी. पुण्यासच वर्षानुवर्ष भरली तरीहि त्यांत अडचण नाही. पुण्यास मे महिन्याच्या सुमारास बहुतेक महत्त्वाचे लोक येऊन जातात अशी वस्तुस्थिति असल्याने या परिषदेसाठी म्हणून प्रवासखर्चाला विशेष व्यय करावा लागणार नाहीच. अत्रांतर भोजन-करमणुकीचा खर्च अगदीच मर्यादित राहील.

पुण्यासच परिषदा भराव्या असें सुचविल्याने कित्येकांना विनाकारणच केन्द्रवादाचा वास येअील. त्यासंबंधाची प्रस्तुत लेखकाची निरभिनिवेश भूमिका येथे थोडक्यांत स्पष्ट करणें कठीण नाही. लेखक स्वतः मूळचा पुण्याचा नाही. परंतु कांही वेळ अन्यस्थलीं कार्य करून व अितर स्थलीं काम मिळण्याची संधि असूनहि पुण्याकडे आकृष्ट झालेल्यांपैकी अेक आहे. पुण्याला विद्वत्तासूचक, अभ्यासप्रेरक व कार्यसंवर्धक अशीं अनेक साधनें सहजासहजीं अुपलब्ध आहेत. हा अनेक वर्षांच्या अितिहासाचा, कार्याचा व परिश्रमांचा परिपाक आहे. त्याची बरोबरी अितर शहरें करूं शकलीं तर लोक साहजिकच तिकडे जातील. जिज्ञासूला मार्गदर्शन व प्रेरणा पुण्यांत सहज मिळूं शकतात. अनेक दृष्टींच्या अभ्यासपरंपरा येथे पूर्णतेला गेलेल्या आढळतात व त्यांचा सहजच अुपयोग घेतां येतो. केवळ वाचन व अेकांतिक अभ्यास यांमुळे आली असें वाटणारी पूर्णता ही चर्चा, विचारविनिमय व तज्ज्ञांचा सहवास यांच्या योगाने येणाऱ्या पक्वतेपेक्षा सहजच कमी दर्जाची असते. व्यावहारिक कारभाराप्रमाणेच विद्वत्तेच्या कारभारांतहि चर्चा, विचारविनिमय, देवाणघेवाण यांचें महत्त्व फार आहे. हें लक्षांत न घेतां आपआपल्या ठिकाणीं राहून परिश्रम करणारे अनेक लेखक पुण्यांतील परिपक्व अभ्यासकांवर निष्कारण नाराज असतात. त्यांनीहि आपलें येणेंजाणें वाढवून आपला सहवास पुण्याला म्हणजे पुण्यांतील कार्यकर्त्यांना अधिक घडवून आणून दिला तर मुळांत किरकोळ परंतु गैरसमजामुळे विकाळ स्वरूप धारण करणारे तक्रारींचे मुद्दे कायमचे नाहींसे होतील.

परिषदेने संमेलनाच्या भानगडींत पडून आपल्यावर आक्षेपांचें काहूर अुगाच ओढून घेतलें आहे. परंतु स्वतःची निरपेक्ष व निर्मळ भाषोन्नतीची तात्त्विक व शास्त्रशुद्ध भूमिका राखली तर सर्वच लायक लोक त्या पातळीवर अेकत्र येअून सहकार्याचें पीक सर्वत्र येअील आणि मनें बिघडविणारे कांहीं वाद तरी थांबतील. संमेलनाच्या अध्यक्षाच्या निवडीचा वाद हा अशा वादांपैकीच अेक आहे. परंतु त्यासंबंधी विशेष तपशिलांत न शिरतां परिषद् व संमेलन यांची मोळी बांधण्याचा ज्या अविचारावर जळगांव संमेलनांत मान्यतेची मुद्रा करण्यांत आली त्याला मूठमाती देण्याचा शक्य तों लौकर प्रयत्न व्हावा असें मी सुचवितों. संमेलनाला परिषदेच्या सासुरवासांतून वांचविण्याची जी आकांक्षा अेका वेळीं तीव्रतेने पुढे आली होती, आणि जिची वेळीं अवेळीं अजूनहि तळी उचलून धरण्यांत येत असते, तिचें संपूर्ण समाधान करावें अशी माझी सूचना आहे.

या टिपणांतले अुतारे सर्वच 'सह्याद्रि' मासिकांतील दिले आहेत. सह्याद्रीने मुद्दामच मागवून लेख छापले असल्याने त्यांचा अुपयोग सहजच करतां आला, अेवढेंच याचें कारण आहे.

---

अनुक्रमणिका

# सभाकार्यविषयक परिभाषा



(लेखक– प्रा. **सखाराम विनायक आपटे**)

**संघ आणि सभा**

सभेचें कार्य आणि तें चालविणें यासारख्या साध्या गोष्टींत तुमच्या परिभाषेची लुडबुड पाहिजे कशाला ? असा विचार अथवा प्रश्न किंवा शंका सकृद्दर्शनीं निघण्याचा फार संभव आहे. सुदैवाने अशी शंका न निघाली तर अुत्तमच; पण जर निघालीच तर कृपा करून जरा अेखादा विचार अैकून घ्यावा अशी विनंती करणें भाग आहे. आपल्याला सार्वजनिक कार्य करणाऱ्या मंडळींना असे बोलण्याचे प्रसंग थोडेथोडके का येतात की, आज काय म्हणे 'राष्ट्रीय सभेची सभा' आहे नि अुद्या 'हिंदुमहासभेची सभा' घेतली आहे, अित्यादि ? अशा ठिकाणीं सभा या शब्दाची होत असलेली द्विरुक्ति आपल्या कानाला ठीक लागते का ? अर्थात् नाही. पण यदाकदाचित् ती टाळण्याचें मनांत आणिलेंच तर काय होतें तें पाहा. 'आज हिंदुमहासभेची मीटिंग घेतली आहे आणि अुद्या राष्ट्रीय सभा मीट होणार आहे !' अेवंच अेकीकडे सभा शब्दाची हेंगाडी द्विरुक्ति टाळावी तों दुसरीकडे घेडगुजरी घडते ! येथे हिंदुमहासभा आणि राष्ट्रीय सभा अशीं दोनच अुदाहरणें घेतलीं; परंतु आपल्यापुढे अशींच आणखी किती तरी अुदाहरणें आहेत; जसें– ब्राह्मणसभा, वेदशास्त्रोत्तेजक सभा, सार्वजनिक सभा, अित्यादि. या अशा ठिकाणीं असें सहज लक्ष्यांत येत नाही काय की सभा शब्दाच्या अैवजी मण्डळी शब्द योजला गेला असता तर वरें झालें असतें ? आज अमुक मण्डळीची सभा आहे असें सफाअीने म्हणतां आलें असतें आणि तें ठीक आणि सयुक्तिकच झालें असतें. पण पुढे लगेच असाहि विचार मनांत येतो की मण्डळी शब्द सामान्य व्यवहारांत, प्राकृत संदर्भांत, फार फार वापरावा लागणारा आहे या कारणाने तो सोडून द्यावा; आणि समाज, संघ, महासंघ यांपैकी अेखादा शब्द वर सांगितलेल्या नामावळींत ठीक बसण्यासारखा आहे तो वापरावा. अुपरिनिर्दिष्ट मण्डळ्यांची स्थापना जेव्हा झाली तेव्हा कदाचित् थोडीच मण्डळी समारूपाने अेकत्र जमली असतील; आणि त्यांनी सभा हेंच नांव या कारणाने धारण केलें असेल. कोण जाणे नक्की काय विचार संस्थापकांच्या मनांत या शब्दाविषयी असेल तो— असल्यास; परंतु सद्यःस्थिति मात्र अशी आहे की हे मोठमोठाले समाज अथवा **संघ** स्थापन झालेले आहेत; आणि त्यांचें कार्य चालू राहण्यासाठी वेळोवेळीं त्यांना **सभा**— कित्येक वेळां पुष्कळच आटपशीर अशा सभा— भरवाव्या लागतात.

या अेकंदर विचारावरून, मला वाटतें, हें निश्चित मानण्यासारखें आहे की, जेव्हा चार लोक अेखाद्या विवक्षित कार्याचा विचार करण्याकरिता अेकत्र मिलित होतात तेव्हा त्यांच्या त्या मिलित होण्यालाच सभा म्हणतात. अर्थात् त्या मिलित झालेल्या मण्डळीलाहि आपण सभा म्हणूं, त्या देखाव्याला सभा म्हणूं, त्या स्थलालाहि सभा म्हणूं. पण हे सर्व सभा शब्दाचे पुढचे पुढचे आनुषंगिक अर्थ होतील. पहिला म्हणजे मिलित हाच मुख्यार्थ. तात्पर्य असें की

अनुक्रमणिका

'हिंदुमहासंघाची सभा' 'ब्राह्मणसंघाची सभा' असे शब्दप्रयोग कानाला ठीक लागतात आणि सयुक्तिकहि ठरतात. अशा रीतीने शब्दांच्या अुपयोगाविषयी थोडाबहुत विवेक केल्याने बोलण्यालिहिण्याची मोठी सोय होते आणि टाकठिकीहि साधते. म्हणून परिभाषा शब्द अुच्चारल्याबरोबर नाक मुरडण्याचें कांहीच कारण नाही.

कोणत्याहि अेखाद्या विषयासंबंधी आपले विचार भाषणद्वारा किंवा लेखनद्वारा प्रकट करण्याच्या कामीं आपल्या गरजा काय काय आहेत, कोणकोणते निरनिराळे अर्थ— जवळजवळ सारखे सारखे दिसणारे, परंतु वस्तुतः थोडेबहुत तरी वेगवेगळे असणारे अर्थ— आपल्याला व्यक्त करावयाचे आहेत याची सांगोपांग पाहणी झाली पाहिजे; आणि कोणत्या कामीं कोणता शब्द युक्त आणि समर्थ आहे हें ठरलें पाहिजे. म्हणजेच कोणत्याहि विषयांत परिभाषा विवेकपूर्वक सिद्ध केली पाहिजे. आपल्या संग्रहीं, सर्व गरजा लक्ष्यांत घेतां, पुरेसे शब्द— संख्येने आणि युक्ततेने पुरेसे शब्द— आहेत काय हें पाहिलें पाहिजे. या पाहणींत जर असें आढळून आलें की कांही अुपयोगी शब्द विनाकारण धूळ खात पडलेले आहेत तर आपणांस त्यांचें पुनरुज्जीवन करावें लागेल; कांही शब्द अगदी हाताशीं सदा अुपलब्ध आहेत, परंतु व्यर्थ तेच अतिशय राबविले जात आहेत असें दिसून आल्यास आपण त्यांना अमळ मर्यादित काम देअून थोडीबहुत विश्रांति मिळूं दिली पाहिजे. आपण अेकंदरींत सर्व विषयाची नीट सांगोपांग सजावट करीत असतांना कांही शब्द जरूरीप्रमाणे आपली सर्गशक्ति अुपयोगांत आणून नवीनहि निर्माण केले पाहिजेत. तात्पर्य, आपण विवेकपूर्वक असें केलें पाहिजे की आपल्या विविध आणि वक्तव्य अशा अर्थांच्या सर्व गरजा पूर्णपणें भागतील; आणि जो तो शब्द आपआपल्या ठिकाणीं साजेसा असेल आणि ठिक्क बसेल. याचेंच नांव परिभाषा किंवा व्यवस्था. अर्थात् वि, अव आणि स्था म्हणजे अनुक्रमें: वेगवेगळ्या विशिष्ट कामीं, अलग अलग आणि आपापल्या ठायीं ठिक्क बसविणें; आणि याप्रमाणे अेकंदरींत आपल्या शब्दांच्या कोठारांत गोंधळ होअूं न देणें; आपल्या सर्व अर्थव्यक्तीच्या गरजा यथास्थित भागविणें. तेव्हा परिभाषा शब्दाला अेवढें बिचकावयाचें कांहीच प्रयोजन नाही; कारण कोणत्याहि विषयांत झालें तरी व्यवस्था आणि ठाकठिकी कोणाला नकोशी आहे ?

आता प्रस्तुत प्रकरणीं, मला वाटतें, ही गोष्ट सर्वांना थोड्या विचाराअंतीं मान्य होण्यासारखी आहे की स्वभाषेला मान्यतेला चढविणें आणि सर्वस्वीं आणि सर्वदैव तिचें सामर्थ्य स्थापित होअील असें करणें आपल्या हरघडीच्या भाषाव्यवहारावर फार फार अवलंबून आहे. 'आज आपल्या महाराष्ट्रीय सभेची मीटिंग आहे, आपण कोठे मीट व्हावयाचें' यासारखें बोलणें आपण केव्हाहि न बोलतां 'आपल्या महाराष्ट्रीय संघाची सभा आज आहे; आपण कोठे मिलित व्हावयाचें, मिळावयाचें किंवा जमावयाचें' म्हणा; अशी आपलेपणाला शोभेशी आणि व्यवस्थितपणाला साजेशीच भाषा आपण निर्धारपूर्वक बोलिली पाहिजे. मराठी बोलावयाचें तेव्हा मराठी बोलेन, घेडगुजरी चालूं देणार नाहीं, अशी प्रतिज्ञा करणारी मंडळी पाहिजे आहेत. तशी कांही थोडी आहेत; पण सर्वांनीच हा अुपक्रम नेटाने चालविला पाहिजे.

### परिषद्, संस्था, परिसंस्था

वर सभा या शब्दाच्या अुपयोगासंबंधी विमर्श झाला आणि त्या शब्दाची व्याख्याहि पण झाली. आता त्याचप्रमाणे परिषद् या शब्दाचा जरा विचार करूं. सर्वांना विदितच आहे

की परवा नुकतीच येथे अेक कारखानदारपरिषद् (किंवा व्यापारोद्यमपरिषद्) होअून गेली. सध्या, समजा, अेक व्याकरणपरिषद् चालूच आहे; आणि कांहीं दिवसांनीं अेक आर्थिक परिषद् नि मग परिभाषा-परिषद्‌हि भरविण्याचें घाटत आहे; तदनंतर अेखादी भौतिकशास्त्रीय परिषद् देखील भरविण्याचा विचार होत आहे. तर अशा या अुदाहरणांमध्ये, मला वाटतें, परिषद् शब्दाचा योग्य अुपयोग होत आहे असें सहज पटण्यासारखें आहे. अर्थात् अेखाद्या परिषदेचीं, अेखादें वासंतिक तर अेखादें शारदीय अशीं, अनेक अधिवेशनें होअूं शकतील. प्रत्येक अधिवेशनांत पुनः सकाळ संध्याकाळ याप्रमाणे कित्येक सभाहि होतील; अेकेका सभेची बैठक तीन तीन चार चार तासांची देखील होअूं शकेल. यावरून परिषद्, अधिवेशन, सभा, बैठक अित्यादि शब्दांना आपापलें योग्य स्थान कसें आहे हें स्पष्ट दिसून येतें; नव्हे काय ? परिषद् म्हणजे अेकत्र विचारार्थ जमलेल्या विद्वानांचा समूह; या परिषदेची महत्ता म्हणजे मोठेपणा आणि तिचें महत्त्व विशेषच; ती बहुधा अेका नियमित कार्याच्या किंवा प्रश्नाच्या विचाराकरिता विशिष्ट प्रसंगींच बोलाविलेली असते अित्यादि अर्थ येथे अभिप्रेत आहे.

आता पाहा 'महाराष्ट्र साहित्य परिषद्' या नामाभिधानांत हा परिषद् शब्द युक्त वाटतो काय ? मला नाही वाटत की 'होय' असें म्हणतां येअील. या ठिकाणीं आणि अशाच अितर ठिकाणीं परिसंस्था हा शब्द योजावा असें मी सुचवितों. अर्थात् या ठिकाणीं परिसंस्था असा विशेष शब्द तेवढ्याचकरिता कशाला ? नुसता संस्था हाच शब्द नाही का चालणार असा प्रश्न कोणाच्याहि मनांत सहज येअील. त्याला थोडक्यांत अुत्तर असें की संस्था हा शब्द या ठिकाणीं योजल्यास त्याचा अर्थ, या ठिकाणीं आपल्याला अिष्ट असलेला, मंडळी असा होअूं शकेल; नाही असें नाही. तरी पण संस्था या शब्दाला दुसरा अेक विशिष्ट अर्थ आहे; आणि तो लक्ष्यांत घेअून मगच काय ती योजना निश्चित करणें योग्य होअील. तो दुसरा अर्थ महत्त्वाचा असून शिक्षणसंस्था, विवाहसंस्था, संमेलनसंस्था, वक्तृत्वसंस्था, यज्ञसंस्था अशा ठिकाणीं चांगला प्रतीत होण्यासारखा आहे. कांही तरी ध्येय आणि तदनुषंगाने विशिष्ट वहिवाट, आचारविचारांची प्रथा, असाच तो अर्थ नाही काय ? अर्थात् अशांपैकीं कोणतीहि अेखादी महत्त्वाची संस्था चालविण्यास वेश्म किंवा आगार पाहिजेच; त्या त्या संस्था आस्थेने चालविणारी माणसें, अर्थात् संघ, समाज, मण्डळी हीहि पाहिजेत. परंतु संस्था ही देवतेसारखी मध्यवर्ती कल्पिलेली असून तिच्या अनुषंगाने आणि अनुरोधाने तिच्याभोवती दोन गोष्टी पाहिजेत : अेक, संस्थेचें अिष्ट कार्य चालविण्याकरिता मूर्त परंतु स्वतः अजीवमान असें वेश्म; आणि दुसरें काय म्हणाल तर, जीवमान, अुत्साही, कार्यकर्ती, आस्थेवाअीक अशी मंडळी. याप्रमाणे कोणत्याहि अेखाद्या महत्त्वाच्या संस्थेची धारणा द्विविध आहे : केवळ अेक शरीररूपी आणि दुसरी प्राणरूपी. असें असल्यामुळे अेखाद्या मोठ्या मंडळीच्या नांवांत संस्था हा शब्द न घालतां मण्डळीचा वाचक परिसंस्था हा शब्द योजावा. असें केलें म्हणजे ब्राह्मणपरिसंस्था, शिक्षण परिसंस्था, वक्तृत्व-परिसंस्था, सार्वजनिक-परिसंस्था, राष्ट्रीय-परिसंस्था, वेदशास्त्र-परिसंस्था, वैद्यक-परिसंस्था, दैनिकेय परिसंस्था, वैजिक परिसंस्था, साहित्य-परिसंस्था अशीं नांवें त्या त्या संस्थांचें धारणवर्धन करणाऱ्या ध्येयप्रेरित आणि कार्येकर मण्डळींना सामुदायिकरीत्या मिळतील.

## साधनीय

रानडे शतकोत्सव नुकताच होअून गेला, त्या प्रसंगांत वेळोवेळीं झालेलीं व्याख्यानें आणि लिहिले गेलेले लेख मनांत आले म्हणजे वाटतें की रानडे हे सभा, परिषदा, संमेलनें

यांचे महान् प्रवर्तक आणि याशिवाय मराठी या स्वभाषेचेहि थोर पुरस्कर्ते; तेव्हा या दोन गोष्टी अेकत्र केल्या असतांना असें कोणीहि अपेक्षिल्यास वावगें होणार नाही की गेल्या पन्नास-साठ वर्षांच्या अवधींत महाराष्ट्रांत सभाकार्य चालवणें ही गोष्ट अुत्तम मराठींत फार व्यवस्थित आणि पद्धतशीरपणें चालूं असेल; आणि असे आदर्श ठिकठिकाणीं — निदान पुण्यांत तरी— पाहावयाला मिळतील. पण ही आशा अथवा अपेक्षा फारशी सफल झालेली दिसत नाही असें खेदानें म्हणावें लागतें. या बाबतींत मराठीभाषिकांनी सर्व बाजूंनी अवश्य लक्ष्य घालावयाला पाहिजे आहे याविषयीं वाद असण्याचें कारण नाही. ज्याने त्याने आपापल्यापरी होण्यासारखा यत्न अवश्य केला पाहिजे असें क्रमप्राप्तच असल्याकारणाने माझ्या हातून थोडाबहुत झालेला प्रयत्न रानडे-शतकोत्सवाच्या निमित्तानें पुढे मांडल्यास तें योग्य आणि प्रसंगोपात्तच होअील असें वाटतें.

पुढे मांडिलेल्या प्रयत्नांत धोरण काय आहे याचें दिग्दर्शन वरील विवेचनांत थोडेंसें आलेंच आहे; परंतु अधिक स्पष्टतेकरिता तें अशा रीतीनें मांडितां येअील: प्रस्तुत विषयांत आपल्या मराठीचें दारिद्र्य असें यत्किंचितहि राहूं देतां कामा नये; तिची समर्पक शब्दांची संपत्ति अगदी भरपूर झाली पाहिजे. हें अेक साध्य. दुसरें असें की शब्द वापरण्यांत शब्द-संपत्ति कमी म्हणून म्हणा किंवा दुर्लक्षामुळे म्हणा किंवा अन्य कारणांनी म्हणा येणारा शिथिल-तेचा दोष, मोघमपणाचा रोग, संदिग्धपणाचा किंवा अनिश्चितपणाचा व्याधि हे सर्वथैव घाल-विलेच पाहिजेत. यासाठी शब्द सुस्पष्ट, विपुल आणि सुव्याख्यात असेच असले पाहिजेत; आणि ज्या ठिकाणचा शब्द त्या ठिकाणीं अशीच योजना नेहमी पाळली पाहिजे; म्हणजे भाषेला करारीपणा येअील आणि ठाकठिकी साधेल; अर्थात् तिची संपन्नता तर वाढेलच वाढेल. या-शिवाय तिसरें धोरण असें ठेविलें पाहिजे की 'परधार्जिणपणा' समूळ घालविला पाहिजे. प्रत्येक कल्पना स्वकीय शब्दांत व्यक्त झाली पाहिजे. अिंग्रेजीच काय परंतु अरबी-फारशी शब्ददेखील फारसे स्वभाषेंत येतां कामा नयेत. जेणेंकरून स्वभाषेचा शब्द अेकीकडे पडून परभाषेचा शब्दच प्रबळ होअील, अथवा आपल्या भाषेची सर्गशक्ति खुंटेल तें तें सर्व टाळलें पाहिजे. सारांश, (१) दरिद्रीपणा (२) शिथिलता (३) परधार्जिणपणा हे त्रिदोष टाळून (१) संपन्नता (२) ठाकठिकी (३) स्वसामर्थ्य किंवा स्वावलंबन हे गुण स्थापित केले पाहिजेत.

संस्था, परिसंस्था, सभा आणि परिषद् या चार शब्दांचें विवरण वर होअून गेलें आहे.

* * * *

### सदस्, सदस्वी आणि सभासद

अेखादी परिसंस्था संस्थापकांनी स्थापिली म्हणजे तिचें कार्य सतत आणि सुयन्त्रपणें चालू राहावें यासाठी तिला नियमबद्धता आणावी लागते. या नियमबद्ध अशा रचनेलाच **घटना** म्हणतात; आणि घटना मान्य करून परिसंस्थेंत सामील होणारे ते त्या परिसंस्थेचे घटक होत. **घटक** यालाच अपर पर्याय **सदस्वी** आणि **सदःस्थ.** कोणतीहि अेखादी घटना मान्य करून त्या सामान्य घटनेच्या भूमिकेवर आपण सर्व नांदणारे आहोंत असें कांही मंडळी जेव्हा ठर-वितात तेव्हा तेथे त्या मंडळीसाठी आणि त्या कामापुरतें त्यांचें अेक **सदस्**[१] निर्माण होतें.

---

[१] सद् = वसणें. सदस् म्ह० अेकाच घटनेच्या भूमिकेवर नांदूं म्हणणारी सर्व मंडळी—सामुदायिक दृष्ट्या. संस्कृतांत सदस् शब्द व्यंजनान्त जरी असला तरी मराठीच्या सोअीकरिता तो स्वरान्त वापरण्यास हरकत नाही. सभासद हा शब्द असाच संस्कृतांत व्यंजनान्त; मराठींत स्वरान्त.

अर्थात् अेखाद्या सामान्य घटनेचे घटक तेच सदसाचे सदःस्थ किंवा सदस्वी. अेवंच घटक, सदःस्थ आणि सदस्वी हे तीनहि शब्द समानार्थक म्हणून वापरण्यास हरकत नाही. सदस् हा अतिसामान्य शब्द समजावयाचा. तो सभा, परिषद्, परिसंस्था, समिति या सर्व प्रकारांना सामान्यपणें लागू करण्यास हरकत नाही; आणि यांपैकीं कोणत्याहि अेका समुदायाच्या पटावर ज्याचें नांव नोंदलें जातें तो— मग त्या समुदायाच्या सभेला केव्हा प्रत्यक्ष हजर असो वा नसो, तें कसेंहि असलें तरी तो— त्या समुदायाचा, सदसाचा अथवा मण्डळीचा सदःस्थ, सदस्वी किंवा घटक झालाच.

आता या ठिकाणीं सभासद हा शब्द कां घातला नाही अशी शंका साहजिकच निघेल. यासाठी याच ठिकाणीं त्या शब्दाची व्याख्या पुढे ठेवणें आवश्यक दिसतें. सभा[1] शब्दाचा अर्थ आणि व्याख्या वर आलेलीच आहे; तेव्हा त्या व्याख्येशीं सुसंगत अशीच सभासद शब्दाचीहि व्याख्या करणें प्राप्त आहे. 'सभा म्हणजे मिलित, अर्थात् चार लोकांचें अेखाद्या कार्याच्या विचाराकरिता एकत्र मिळणें; आणि **सभासद**[2] म्हणजे तो की जो सभेमध्ये प्रत्यक्ष **आस्थित**[3] (हजर) असून मतदान अित्यादि जे सभासदाचे सभेमधील अधिकार ते चालविण्यास आणि अेकंदरींत सभेच्या कार्यामध्ये भाग घेण्यास पात्र असतो. यावरून सदस् आणि सभा यांतील भेद; त्याचप्रमाणे अेकीकडे सदस्वी, सदःस्थ किंवा घटक आणि दुसरीकडे सभासद यांमधील भेद स्पष्टपणें ध्यानांत आलाच असेल.

### वर्ग, वर्गणी, निधि

सर्वारम्भाः तण्डुलप्रस्थमूलाः अशी म्हणच आहे. तेव्हा, समजा घटना झाली आहे, नि घटक, सदस्वी अथवा सदःस्थ सर्व अेकमेकाला अेका घटनाभूमिकेवर आणून चुकले आहेत. तर आता लगेच पुढील प्रश्न म्हणजे मूठ, पसा, ओंजळ— ज्याची जशी अिच्छा आणि सामर्थ्य असेल आणि परिसंस्थेला आवश्यकता असेल त्याप्रमाणे आणि नियमाला धरून **निधि**— गोळा करणें. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे बहुधा परिसंस्थेच्या घटकांत, निधि सिद्ध करण्याच्या सोअीसाठी, वर्गवारी करावीच लागते; आणि प्रत्येक घटकाने आपापली **वर्गणी**— त्या त्या वर्गांत (वर्ग + नी ?) आपल्याला नेअून बसविणारी— परिसंस्थेला सादर केली पाहिजे असें ठरतें.

परिसंस्थेच्या घटकांचे वर्ग ठरतात ते बहुधा दातृत्वाच्या अनुरोधाने. या वर्गांचीं नांवें सांप्रतकाळीं प्रचलित (!) काय आहेत हें पाहिल्यास तीं आश्रयदाता, हितचिंतक, हितकर्ता,

१ सह भान्ति यस्यां सा. अेकमेकाला दिसतील अशा रीतीने सदस्वी लोक जिच्यामध्ये येअून मिळतात ती सभा.

२ स्त्री किंवा पुरुष दोन्ही यांत समाविष्ट आहेत असा संकेत. हीच गोष्ट अशा सर्व ठिकाणीं लागू आहे हें ध्यानांत ठेवावें. सभासदास (त्याला किंवा तिला) अुद्देशून सभेंत बोलावयाचें झाल्यास 'सभासद्वर्य' असा शब्द वापरणें.

३ आस्थान आणि आस्थानी हे सभागृहवाचक शब्द जुनेच आहेत. आस्थित म्हणजे सभालयांत सभेसाठी हजर. हजर या अर्थी हल्लीं अुपस्थित शब्द वापरतात; परंतु आस्थित शब्द या अर्थी वापरणें अधिक योग्य. अुपस्थित या शब्दांत अेकदम, अचानक, अकल्पितपणें पुढे आलेला हा जो विशेष अर्थ रूढ होता, अजूनहि कित्येक संदर्भांत आहे, तोच मुख्यतः राखणें सोयीचें आहे.

अुपकर्ता, समासद, वर्गणीदार अित्यादि फारच बहुविध आणि संकुल अशीं दिलेलीं सांपडतात. यांत अधरोत्तर क्रम कसा लागतो, किंवा शास्त्रीय रचना काय तत्त्वावर आहे हें सहज सांगणें बहुधा कठीणच पडतें. अितकें होअून पुनः घटनापत्रकें चाळलीं असतां किंवा या संबंधांत बोलणें चालू असतांना लक्ष देअून पाहिल्यास असें दिसून येतें की रचनाकारांच्या मनांतच या संज्ञांविषयी साशंकता आणि असमाधान असावें; कारण कित्येक वेळां त्यांच्या तोंडून आणि लेखणींतूनहि फेलो, पेट्रन, बेनीफॅक्टर, मेंबर असेच शब्द— मराठी संज्ञा अजिबाद बाजूला राहून— येत असतात. याविषयींच्या संज्ञावलीमध्ये अेकरूपता आणि व्यवस्थित रचना असणें, सध्याच्या समाबहुल लोकशाहीच्या कालांत तरी निदान, अिष्ट नाही काय ? परिसंस्था कितीहि विविध आणि पुष्कळ असल्या तरी साधारणतः कोणत्याहि परिसंस्थेच्या घटकांची वर्गवारी अेकाच साच्यांत बसणारी असून त्यांतील वर्गसंज्ञाहि अेकसारख्याच असल्या तर या बाबतींत निर्देश— अुल्लेख करणें, समजूत करणें— करविणें अित्यादि गोष्टी साध्या आणि फार सोयीच्या होतील.

हें तत्त्व अेकदा पटल्यास, थोड्याच विचाराअन्तीं, अेक सामान्य आराखडा आणि मांडणीचा सांचा सहज सुचण्यासारखा आहे. कारण, पाहा की परिसंस्थेला वर्गणी देण्याच्या पद्धति अुघडअुघड दोनच दिसतातः— (१) साधारण अल्पशी वर्गणी सदस्य पुनः पुनः, बहुधा वर्षोवर्षीने, परिसंस्थेकडे देत राहतो; किंवा (२) याच्यापेक्षा कांहीशी मोठी रक्कम (रुक्म) परंतु अेकरासपणें परिसंस्थेकडे अेकदाच देअून टाकून तो मोकळा होतो. आता वर निर्देशिलेल्या वर्गणीचा आंकडा किंवा रुक्म निरनिराळ्या परिसंस्थांत साहजिकच निरनिराळे असूं शकेल; परंतु कोणत्याहि अेका परिसंस्थेंत देखील यांत आणखी पायऱ्या पायऱ्या घालणें सोअीस्कर आहे. शास्त्रीय वर्गीकरणाच्या दृष्टीने पाहतां, वर्गांत अुपवर्ग म्हणून अनेक काढिले तरी, मुख्य वर्ग वर म्हटल्याप्रमाणे दोनच. असे असले तरी, व्यावहारिक दृष्ट्या आणखी अेक वर्ग या दोन वर्गांच्या भरीला घालणें बहुधा आवश्यक आणि अिष्ट मानिलें जातें. तो वर्ग म्हणजे सर्वांत मोठी रक्कम–रुक्म देअून टाकणाऱ्या किंवा देत राहणाऱ्या विशेष दानशूर लोकांचा होय. आता अितका आराखडा ठरल्यानंतर वर्गवारीची, आणि तदर्थक योग्य संज्ञांची, मांडणी करितां येते ती अशीः—

| मुख्य वर्ग | अुपवर्ग | क्रमाङ्क | विशेष | |
|---|---|---|---|---|
| श्री I ददान° | ददान° | १ | वर्गणी पुनरावर्ती | ↓ वर्गणीचें |
| | प्रददान° | २ | | |
| ग II दाश्वत्° | दाश्वत्° | ३ | वर्गणी-रुक्म अेकदम अेक-रास दिलेलें | ↓ रुक्म वाढतें. |
| | प्रदाश्वत्° | ४ | | |
| णे III वदान्य° | वदान्य° | ५ | | |
| | प्रवदान्य° | ६ | | |
| | संवदान्य° | ७ | | |

वरील आराखड्यांत ठोकळपणें पाहतां मुख्य वर्ग तीन हें सहज दिसून येअील. या तीन वर्गांच्या संज्ञा **ददान, दाश्वत्** आणि **वदान्य** या होत. (१) ददान म्ह. देत राहणारा. दा

धातूचें वर्तमानकालवाचक रूप. (२) दाश्वस्[1] : दाश्‌=देणें या धातूचें, भूतकालीन पूर्णक्रियावाचक रूप. (३) वदान्य=दानशूर. या तीन संज्ञा मूलभूत कल्पून अुपसर्गांच्या योगानें अुपवर्गांच्या संज्ञा आपल्या गरजेप्रमाणे अिष्ट तितक्या सहज अुपकल्पितां येतात हेंहि वरील आराखड्यांत दिसून येअीलच.

आता अेखाद्या परिसंस्थेला असेंहि वाटणें संभवनीय आहे की आपल्या सदःस्थांचे शुद्ध दातृत्वाच्याच दृष्टीने प्रथम दोन ठोकळ वर्ग पाडावे; आणि मग त्यांत अुपवर्ग म्हणून पाहिजे तर देण्याच्या ज्या दोन नेहमीच्या पद्धति त्या विचारांत घ्याव्यात. असें असल्यास वर्गवारीची दुसरी अेक विकल्परूप मांडणी खाली दाखविली आहे तिचा अवलंब करतां येअील. या मांडणींत ठोकळ वर्गसंज्ञा आधी दोनचः– (१) अुपकारी आणि (२) वदान्य. या मुख्य दोन वर्गांमध्ये पुनः अुपसर्गांच्या योगाने, जरूर असल्यास, अधिक पायऱ्या सहज अुपकल्पितां येतात. पुढे प्रत्येक पायरीवर पुनः पद्धतिभेदानुरूप ददान आणि दाश्वत् हे दोन अुपपर्याय आहेतच.

श्री I
- १ उपकारी
  - ददान (पुनरावर्ती व १)
  - दाश्वत् (पंचवीसपट अेकदम अेकरास)
- २ समुपकारी
  - द० (पुनरावर्ती व २)
  - दा० (वीसपट अेकदम अेकरास)

ग II
- ३ वदान्य
  - द० (पुनरावर्ती व ३)
  - दा० (दसपट अेकदम अेकरास)
- ४ प्रवदान्य
  - द० (पुनरावर्ती व ४)
  - दा० (पांचपट अेकदम अेकरास)

येणेंप्रमाणे वर्गवारीच्या रचना दोनप्रकारें वर मांडून दाखविल्या आहेत; तथापि अेकंदरींत पाहतां या दोन रचनांपैकी पहिली रचनाच अधिक सोअीस्कर असें वाटतें.

वरील भागांत घटना, घटक, सदःस्थ, सदस्वी, सभासद, वर्ग, वर्गणी, निधि, ददान, दाश्वत् आणि वदान्य अितक्या संज्ञांचा उपन्यास झाला.

* * * *

**मण्डळें आणि कार्यवाह**

या सर्व संज्ञांमध्ये 'वर्ग' हा शब्द मथळ्याचा किंवा चावीवजा म्हणण्यासारखा आहे. कारण वरील सर्व विवेचनामध्ये सदःस्थांचे वर्ग सांगणें ही मुख्य मुद्याची गोष्ट होती; बाकीचा सर्व भाग तदनुषंगानेच आलेला आहे म्हटलें तरी चालेल. आता, अेखाद्या परिसंस्थेने आपल्या निधीची जमवाजमव केली म्हणजे झालें असें थोडेंच आहे ? कार्य बहुधा निधिमूलक असतें म्हणून निधीला अेवढा मान; नाही तर खरोखरी परिसंस्थेने रोजच्यारोज, महिनोमहिने, वर्षो-वर्षे जें कार्य सतत चालू ठेवावयाचें त्यांतच परिसंस्थेची खरी अितिकर्तव्यता आहे. वस्तुतः तिकडेच सर्व लक्ष्य तिने अेकवटलें पाहिजे. प्रस्तुत वक्तव्य अितकेंच की आपल्याला जें कार्य

१ 'दाश्वान् सुपुत्राशिषमित्युवाच' रघुवंश. दाश्वस् हें रूप संस्कृतमध्ये विद्वस् याच्या जोडीचें म्हणून लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे. विद्वान्- ज्याने विद्या पूर्ण केलेली आहे तो; दाश्वान्- ज्याने देय पूर्ण देअून टाकिलें आहे तो.

करीत राहावयाचें असेल त्या कार्याच्या निरनिराळ्या अंगांनी कोणकोण कोणकोणतें कार्यभाग करण्यास पात्र आणि समर्थ आहे हें हेरून तदनुसार परिसंस्थेने आपापलीं **मण्डळें** निर्माण करावयाचीं असतात. हीं मण्डळें परिसंस्थेच्या व्यापाप्रमाणे आणि कार्यानुसार पुष्कळ आणि नानाविध असणें संभवतें. अुदाहरणार्थ प्रशासकमण्डळ, अनुशासक किंवा समुपदेशकमण्डळ, नियामकमण्डळ, व्यवस्थापकमण्डळ, चालकमण्डळ अित्यादि. परिसंस्था साधारणपणें बरीचशी असल्यास तिला यांपैकी निदान दोन मण्डळें तरी अवश्य लागतात; परंतु परिसंस्था अगदीच लहानशी असल्यास अेका मण्डळावरहि तिचें काम भागतें. वर निर्दिष्ट केलेल्या किंवा तत्सदृश मण्डळांमध्ये जीं माणसें योजिलीं जातात तीं सर्व **कार्यवाह, कार्यवाही** किंवा **कार्य-वाहक** (तिन्ही शब्द समानार्थक; ज्या वेळीं जो सोअिस्कर वाटेल तो वापरावा.) जो कार्यवाह ज्या मण्डळांत असेल त्यावरून त्याला स्थानपरत्वें अनुरूप संज्ञा **प्रशासक, समुपदेशक, नियामक, व्यवस्थापक, चालक** अशासारखी कोणती तरी प्राप्त होअीलच हें अुघड आहे.

### अधिवाहक, निवाहक, नैधिक

कांही कार्यवाह कांही विशिष्ट अधिकारिपदावर नियोजित असतात. अुदाहरणार्थ **अध्यक्ष, अुपाध्यक्ष, नैधिक, विश्वस्त, अधीक्षक** आणि **निवाहक**. हे सर्व **अधिवाहक** होत. अधिवाहक म्हणजे परिसंस्थेच्या अधिकारिपदावर जे आरूढ असतात ते. अधिवाहक आणि अितर कार्यवाहदेखील बहुधा निवडणुकीने (**अुद्धरणाने**) आपापल्या पदावर प्राप्त होत असतात. **आशंसुक** म्हणून त्यांना त्या त्या पदाकरिता निवडणुकीला अुभें राहावें लागतें. त्यांची **नामोक्ति** अर्थांच रीतसर झालेली असते; मग मतप्रदान होअून भूयसी[1]–नियमानुसार—म्हणजे ज्याला जास्तींत जास्त मतें पडतील तो प्रथम निवडून आला या नियमानुसार—निवडणुकींचे निकाल लागतात. गुप्तमतदानपद्धति बहुधा हल्लीं बहुतेक ठिकाणीं पुरस्कारिली जाते.

वर अधिवाहकांच्या संज्ञा दिल्या त्यांपैकी अध्यक्ष, अुपाध्यक्ष आणि विश्वस्त या संज्ञा हल्ली पुष्कळ ठिकाणीं प्रचलितच असल्यामुळे त्यांचें स्पष्टीकरण निराळें करावयास नकोच. परंतु नैधिक, अधीक्षक आणि निवाहक[2] या संज्ञांचा मात्र खुलासा केला पाहिजे. परिसंस्थेचा निधि संभाळणारा अधिकारी तो नैधिक. बहुधा परिसंस्थांची वहिवाट अशी असते की विश्वस्ताने परिसंस्थेची स्थावर मत्ता सांभाळावयाची; आणि रोकड–रक्कम, परिसंस्थेच्या नियमानुसार, नैधिकाने सांभाळावयाचें. अेकंदर परिसंस्थेच्या कार्याचा (किंवा त्या त्या मंडळाच्या कार्याचा) सर्वांत मोठा भार बहुतकरून आणि साहजिकपणेंच त्या त्या निवाहकांवरें पडतो. निवाहक हा मोठा कार्यदर्शी असावा लागतो; त्यांत आळस तर मुळींच अुपयोगी नाही. त्यांत कल्पकता असावी लागते; परिसंस्थेच्या ध्येयाशीं तो तद्रूप असून त्याला कार्याची तळमळ सतत पाहिजे आणि प्रत्यक्ष तें तें कार्य करीत असतांना जरूर ती चतुराअी त्याच्या अंगांत पाहिजे.

### अधीक्षक, वैयायिक

वर निर्देशिलेले निवाहकीय सर्व गुण अंगीं विलसत असून शिवाय जो ज्ञानवृद्ध, वयो-

---

१ अर्थात् येथे भूयसी म्हणजे भूयसी संख्या असा अर्थ आहे.

२ नितरां आणि निश्चितपणें कार्यधुरा वाहणारा. चिटणीस आणि कार्यवाह या प्रचलित संज्ञा आहेत. आतापर्यंत दिलेली संज्ञावलि पाहिलेली असल्यास 'कार्यवाह' संज्ञा कां टाकिली हें निराळें सांगावयास नकोच. सेक्रेटरी ही संज्ञा ज्या कारणाकरिता टाकावयाची त्याच कारणाकरिता चिटणीस हीहि टाकावयाची.

अनुक्रमणिका

वृद्ध आणि तपोवृद्ध अशा अवस्थेप्रत पोंचलेला असेल त्यालाच बहुधा परिसंस्थेचा अध्यक्ष करितात; आणि त्यान्या खालोखाल अधिकार आणि योग्यता अुपाध्यक्षाची असते. हे परिसंस्थेचे मोठे मार्गदर्शक असतात हें अुघडच आहे. आता अधीक्षक (अधि + अीक्षक) या संज्ञेचा खुलासा असा की जो अधिकृतरीत्या परिसंस्थेची आर्थिक बाजू परिशुद्ध आहे कीं नाही हें पाहण्याची आणि शक्यतोंवर तशी ती ठेवण्याची देखील जबाबदारी स्वीकारतो तो. परिसंस्थेच्या **संव्यया**चीं पुस्तकें आणि पत्रकें व्यवस्थितपणें ठेवणें हें काम बहुधा निवाहकाच्या शिरावर असतें. तथापि त्याला तीं बहुधा प्रतिवर्षी अधीक्षकाकडून परामर्शून– तपासून– घ्यावीं लागतात. अधीक्षक आपल्या **वैयायिकां**च्या (वि + आय→व्याय→वैयायिक) साहाय्याने संव्ययाच्या पुस्तकांचा आणि पत्रकांचा परामर्श करून जरूर तेथे आपल्या **अधीक्षा** (म्हणजे सुधारण्याकरिता किंवा परिशुद्धीकरिता केलेल्या सूचना) निवाहकाकडे पाठवितो. निवाहकाला त्या नीट ध्यानांत घेअून तदनुसार आपलीं संव्ययपत्रकें आणि पुस्तकें व्यवस्थितपणें परिशुद्ध करून योग्य वेळीं **निकाय-सभे**पुढे मांडावीं लागतात. अर्थात् अधीक्षकाच्या अधीक्षा लक्ष्यांत घेअून त्याने तीं सर्व व्यवस्थित ठेविलेलीं असल्यास निकायसभेंत तीं बिनबोभाट संमत होतात हें निराळें सांगावयास नकोच.

### निकायसभा

वर अुल्लेखिलेल्या संव्ययपुस्तकांतून परिसंस्थेच्या आयव्ययाची मांडणी असते हें वाचकांच्या ध्यानांत आलेंच असेल. आयव्ययाविषयक जें शास्त्र तें वैयायिकशास्त्र; आणि वरील वर्णनांत अधीक्षकाचा सहायक म्हणून जो वैयायिक आला आहे तो आपल्या वैयायिक शास्त्रांत निष्णात असून आपल्या कामांत मान्यता मिळविलेला असाच समजावयाचा. 'अधीक्षित' संव्ययपत्रक म्हणजे अर्थात् अधीक्षकाने मान्य केलेलें आयव्ययपत्रक. आता वर म्हटलें की अधीक्षित असें संव्ययपत्रक निकायसभेपुढे आल्यास तें मान्य होण्यास कांहीच अडचण नसते. या वाक्यांत निकायसभा म्हणजे हल्ली आपण जिला साधारण सभा म्हणतों ती होय. या ठिकाणीं साधारण हा शब्द तितकासा चांगला नाही हें कित्येक वेळीं कित्येकांच्या ध्यानांत आलेलेंच असेल. विशेषतः आपण जेव्हा साधारण सभासद असें वर्णन अैकतों तेव्हा तर दुसरा अेखादा यापेक्षा सरस शब्द या अर्थाचा वाचक पाहिजेच असें बहुधा आपल्याला जाणवल्याशिवाय राहत नाही.

साधारण सभासद, साधारण सभा, विशेष साधारण सभा हे शब्दप्रयोग वर्जनीय होत. यांपैकी साधारण सभासद ही संज्ञा टाकून त्या ठिकाणीं कार्यवाह आणि सदःस्थ अशा संज्ञा वापरणें कारणपरत्वें योग्य होय हें वरील विवेचनांत येअून चुकलेंच आहे. आता राहिली साधारण सभा ही संज्ञा; आणि वर तिच्याच अैवजी निकायसभा ही संज्ञा ग्राह्य म्हणून दिली आहे. संस्कृत जाणणाऱ्यांना काय शब्दाचा अर्थ देह, आणि निकाय शब्दाचा अर्थ समूह हें रूढ असल्याचें सांगावयास नकोच. अेकूणअेक सदःस्थ मिळूनच अेखाद्या परिसंस्थेचें अखिल जीवमान शरीर बनतें हें अुघडच आहे; म्हणून ज्या सभेंत अेकूणअेक सदःस्थांना येण्याचा अधिकार असतो त्या सभेला निकायसभा म्हणणें युक्तच ठरतें. याप्रमाणे आपल्याला जनरल बॉडी, जनरल बॉडी मीटिंग, ऑर्डिनरी जनरल मीटिंग, अेक्स्ट्राऑर्डिनरी जनरल बॉडी मीटिंग या अर्थांचे शब्द अनुक्रमें निकाय आणि निकायसभा, साधारण निकायसभा आणि विशेष निकायसभा असे मिळतात.

येथपर्यंत परिसंस्था, वर्ग आणि मण्डळें अितकी प्रस्तुत विषयाची मांडणी झाली. यांपैकी शेवटच्या प्रकरणीं पुरवणीदाखल आणखी दोन तीन संज्ञा, त्या अुपयुक्त असल्यामुळे, येथेच सांगून टाकतों. ज्या सदःस्थांच्याकडे परिसंस्थेच्या वर्गणीचा शेष राहिलेला असेल, ज्यांनी आपलें दातव्य पूर्णपणें अद्ययावत् देअून टाकिलेलें नसेल, ते शेषित[1] घटक होत. याच्या अुलट ज्यांनी आपलें दातव्य अद्ययावत् देअून टाकिलेलें असेल ते अशेषित घटक होत. कोणताहि सदस्वी अशेषित असला की तो नेहमी मतस्वी[2] देखील असतो; म्हणजे त्याचा मतदानाचा हक्क शाबूत किंवा अबाधित असा साहजिकच राहतो. शेषित हा बहुधा आणि साहजिकपणेंच निकायसभेंत मतस्वी होअूं शकत नाही. याशिवाय आणखी अेक शब्द सांगावयाचा राहिला तो म्हणजे प्रष्ठ हा होय. अध्यक्ष, अुपाध्यक्ष या संज्ञा वर आलेल्याच आहेत. परिसंस्थेमध्ये अध्यक्ष हा अग्रगण्य आणि त्याच्या खालोखाल अुपाध्यक्ष. पण याशिवाय आणखी अेका प्रमुखाचा पुष्कळ वेळां निर्देश करावा लागतो; तो म्हणजे चालक अथवा व्यवस्थापक यासारखें जें कार्यवाही मण्डळ असेल त्याचा प्रमुख. याला प्रष्ठ अशी संज्ञा असावी. अर्थात्, त्या मण्डळाला हवें असल्यास, त्याच्या खालोखाल अुपप्रष्ठ असेंहि पद होअूं शकेल. प्रत्यक्ष कोणतीहि सभा आणि तिचा अधिष्ठ यासंबंधी विचार पुढे व्हावयाचाच आहे.

*　　*　　*　　*

प्रस्तुत लेखाच्या आतापर्यंतच्या मागांत जें विवेचन झालें तें परिसंस्था आणि तिची रचना याविषयींचेंच झालें. त्यांत अजूनपर्यंत प्रत्यक्ष सभाकार्याविषयींची परिभाषा मांडली गेलीच नाही; लेखाचा मथळा मात्र सभाकार्यविषयक परिभाषा हा आहे. अशी शंका कोणी काढल्यास तेथे अुत्तर हेंच की असें होणें हें साहजिकच आहे; नव्हे, तसें करणें आवश्यक आणि अिष्टच होतें हें थोड्या विचाराअन्तीं ध्यानांत येण्यासारखें आहे. पाहा की सभा म्हटली की तिचा संबंध थोडाबहुत तरी अेका किंवा अनेक परिसंस्थांशीं बहुधा असतोच. स्थूलमानाने सभांचे प्रकार दोन : (१) सार्वजनिक सभा आणि (२) परिसंस्थीय सभा. पैकी दुसऱ्या प्रकारच्या सभांचा संबंध परिसंस्थेशीं— तिच्या नियमांशीं, तिच्या घटनेशीं, तिच्या निरनिराळ्या वर्गांशीं आणि मंडळांशीं— अगदी निकटचा असतो हें सांगायला नकोच. तें अुघडच आहे. परंतु सार्वजनिक सभेचा जरी विचार केला तरी बहुधा असें आढळून येअील की यद्यपि ती परिसंस्थेच्या सभेसारखी नियतकालिक आणि तितकीच नियमबद्ध नसली; तथापि प्रत्यक्ष व्यवहारांत पाहिल्यास, सोय म्हणून, सार्वजनिक सभादेखील बहुधा अेखादद्दुसऱ्या परिसंस्थेमार्फतच भरविण्याची तजवीज करीत असतात. या कारणाने सभा सार्वजनिक असली तरी देखील तिचे प्रवर्तक बहुधा अेखादद्दुसऱ्या परिसंस्थेचे अधिवाहकच असतात. शिवाय सार्वजनिक सभेच्या कार्याला देखील नियमबद्धता, थोड्या कमी प्रमाणांत कां होअीना, परिसंस्थीय सभेच्यासारखीच असणें अिष्ट असतें. दुसरी अेक गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे. ती ही की सार्वजनिक सभेचा गाजावाजा जरी खूप होत असला तरी प्रतिवर्षी अेकंदरींत परिसंस्थीय सभा जितक्या होतात त्या मानाने सार्वजनिक सभा किती तरी थोड्या होत असतात. सारांश, दृष्टान्ताने बोलावयाचें झाल्यास आपल्याला वेश्मरचना (घरबांधणी) करावयाची असली तर वास्तुमागांत खोल शिरावेंच लागतें, तेथे पाया सुप्रतिष्ठित करावा लागतो; अेवढेच नव्हे तर वेश्माच्या

१ शेषित = दातव्याचा शेष ज्यांनी ठेविला आहे असे.

२ मत हेंच स्व असलेला. स्व = स्वकीय विशेष हक्क.

आजूबाजूंच्या परिसराचीसुद्धा चांगली पाहणी आणि व्यवस्था करणें आवश्यक ठरतें. पाया आणि परिसर हा सर्व वेश्मरचनेचाच अवश्य कर्तव्य भाग आहे. परिसंस्था आणि सभा यांचाहि असाच जिव्हाळयाचा संबंध असतो.

* * * *

सार्वजनिक सभा बोलवावयाची असल्यास तिचे **प्रवर्तक** बहुधा वर्तमानपत्रद्वारा सभेची **आघोषणा** करितात. सभा सार्वजनिक नसून परिसंस्थीय असल्यास आगाअू **सूचना**पत्रकें बहुधा सर्व सदःस्थांच्याकडे जावीं लागतात. सभेचें कार्य, तिचें स्थल आणि दिन-वार-वेला यांचा निर्देश आघोषणेंत किंवा सूचनेंत अवश्य झालेलाच असतो. सभेच्या नेमिलेल्या स्थळीं आणि काळीं सभेचे प्रवर्तक अथवा निवाहक यांनी **आस्थित** असलेंच पाहिजे.

कांही सभा अगदी **वेलायतिक** आणि **नैमिषिक**[१] असतात. म्हणजे असें की, आरंभ अगदी वेळेवर झालाच पाहिजे; साधारणतः कोणत्याहि गोष्टींत निमिषमात्र अिकडे तिकडे जातां कामा नये (नैमिषिक) असा निर्बंध त्या पाळतात. याशिवाय कामकाजाची आणि तत्प्रीत्यर्थ द्यावयाच्या वेळाची किंवा दिवसांची वगैरे आंखणी (वेलायतिक) त्यांनी करून ठेविलेली असते, नि त्या आंखणीप्रमाणे सर्व कार्यावलि त्या सभा बरोबर पार पाडितात. सदैव नैमिषिकपणा आणि वेलायतिकपणा या गोष्टी जर साधतील तर अुत्तमच. परंतु प्रत्यक्ष व्यवहारांत थोडी सवडसवलत ठेवणें केव्हा केव्हा अिष्ट असतें. सभेच्या नेमलेल्या वेळेवर पुरेसे सभासद आस्थित नाहीत असें आढळून आल्यास घटकाभरें[२] थांबावें असा साधारणपणें संकेत पाळला जातो.

## अधिष्ठ आणि किंमान

सभेला आरंभ करण्याच्या वेळीं दोन गोष्टी अवश्य पाहाव्या लागतात. त्या अेकेकाच शब्दांत सांगावयाच्या झाल्यास असें म्हणतां येअील की **अधिष्ठ** आणि **किंमान**.

सभेच्या कामाचा जो कर्णधार तो **अधिष्ठ** होय. **अधिष्ठा** हें त्याचें स्थान– त्याची विशिष्ट खुर्ची आणि अधिष्ठपद. (वाच्य आणि अुपलक्षित या अुभयविध अर्थांनी अधिष्ठा हा शब्द प्रसंगानुसार योजावयाचा.) बहुधा असा नियम असतो की परिसंस्थेचा जो अध्यक्ष त्यानेच सभेचें अधिष्ठपद स्वीकारावयाचें. अध्यक्ष अनास्थित म्हणजे हजर नाही असें असल्यास अुपाध्यक्षाने अधिष्ठा स्वीकारावी असा संकेत असतो. हे दोन्हीहि अधिकारी आस्थित नसल्यास मग बहुतकरून अधिष्ठाची निवड आस्थितांमध्ये सभेचें कर्णधारत्व चालविण्यास योग्यतम कोण आहे हें लक्ष्यांत घेअून नेहमीच्या अुद्धरणपद्धतीने— म्हणजे प्रसूचना, अनुमोदन, बहुमत अित्यादि पद्धतीने— करावी लागते. सभा परिसंस्थीय असल्यास, जरूर तर अधिष्ठाची तेथल्या तेथे निवड करणें ही गोष्ट आस्थित सभासद सहज पार पाडितात; कारण ही पद्धति त्यांच्या अंगवळणीं पडलेली असते. परंतु सभा सार्वजनिक असल्यास, सभेचे जे

१ ऑन् शेड्यूल काम करणाऱ्या आणि पङ्क्च्युअल असणाऱ्या (अशीं बोलणीं कानांवर पडतात ना ?)

२ पळ, विपळ, घटिका, मुहूर्त हे शब्द आपण विनाकारण अुपेक्षीत आहों. पैकी घटिका म्हणजे वाट पाहण्याचा सोअीस्कर काळ २४ पळांचा. (पळ = मिनिट. हें मोठें पळ होय. तें छोट्या पळाच्या २॥ पट. छोटें पळ सामान्य व्यवहाराला फारसें अुपयोगी नाही.) मुहूर्त म्हणजे ४८ पळें; अितका काळ साधारणपणें अेखाद्या विषयावर श्रोत्यांचें लक्ष न कंटाळतां केंद्रित राहूं शकतें; हें ध्यानांत ठेवून वक्त्यांनेहि साधारणपणें मुहूर्तमात्र अितकेंच आपलें मुख्य भाषण करावें.

प्रवर्तक असतात ते अेवढी दक्षता घेतात की अधिष्ठ कोणाला करावयाचें हें आगाअू आघो-षितच करून ठेवितात. पुढे त्याप्रमाणे प्रत्यक्ष सभेच्या स्थानीं आणि योग्य वेळीं निकल्पित अधिष्ठ आस्थित असेल आणि त्याची निवड औपचारिकरीत्या यथोचित होअील अशीच योजना ते सुयंत्रपणें घडवून आणितात. सार्वजनिक सभा असली तर ती प्रासंगिक असते आणि बहुधा प्रासंगिक विषयाच्या सार्वजनिक महत्त्वामुळे आणि निकल्पित अधिष्ठाच्या नांवलौकिकामुळे पुरेसे सभासद सभास्थानीं योग्य वेळीं आस्थित नाहीत असें सहसा घडत नाही; आणि सभा-कार्याला प्रारंभ होण्यास दुसरा कांही प्रत्यवाय राहत नाही. परंतु सभा नित्याची परिसंस्थीय असल्यास मात्र, किंमान प्रश्नाकडे अवश्यमेव लक्ष्य द्यावें लागतें. किंमान म्हणजे सभेला सभात्व येण्याला आवश्यक म्हणून ठरविलेली कमींत कमी सभासदांची संख्या (मान). अेवढी सभा-सदांची संख्या आस्थित असलीच पाहिजे. तेवढी ती असली म्हणजे किंमान प्रश्न सुटला. अर्थात् अधिक सभासद जितके असतील तितके अिष्टच.

याप्रमाणे— विनाधिष्ठं सभा नास्ति, किंमानेन विनापि च— अधिष्ठावांचून सभा नाही, तसेंच किंमानावांचूनहि सभेला सभात्व नाही हे दोन आद्यदंडक.

### अधिष्ठ आणि क्रमणिका

अधिष्ठ हा सभेचा कर्णधार असतो असें वर म्हटलें तें अनेक दृष्टींनी खरें आहे. प्रथम थट्टेने त्याचा अर्थ असा घेतला तरी चालेल की, अधिष्ठाचा अेक हात तरी आपल्या कानाशीं पाहिजेच. आशय असा की अधिष्ठाने सभेचें कार्य चालू असतांना अत्यन्त अवधानपूर्वक आणि बारकाअीने कोठे काय चाललें आहे हें जसें पाहिलें पाहिजे तसेंच कोठे काय बोललें जात आहे हेंहि फार लक्ष्यपूर्वक अैकिलें पाहिजे. अधिष्ठाने स्वतःच्या कानाशीं जसा अेक हात ठेविला पाहिजे म्हणजे सर्व बारकाअीने अैकिलें पाहिजे, तसा दुसरा हातहि सभेच्या कर्णस्पर्शासाठी, अर्थात् चळणाऱ्या सभासदांस शिष्ट मर्यादेच्या आंत राखण्यासाठी, नित्य सज्ज ठेविला पाहिजे. तात्पर्य असें की अेखादी गोष्ट अशिष्ट किंवा असभेय घडते असें लक्ष्यांत येतांच त्याने योग्य तो अुप-चार, प्रतिकार किंवा प्रतिविधि आचरिला पाहिजे. सभेचें काम सुयंत्र चालण्याकरिता अधिष्ठाने स्वतः सत्त्वधीरपणें वागावयास पाहिजे; तसेंच सभासदांचेंहि, योग्य तेव्हा नि योग्य तितकें, गोडीने पण करारीपणाने, नियंत्रण केलें पाहिजे. यालाच म्हणावयाचें अधिष्ठाचें **आलानिक** म्हणजे आळा घालण्याचें काम. अधिष्ठाच्या कामगिरीमध्ये हेंच मुख्य काम असें जरी नव्हे तरी हें काम कांही गौण किंवा दुर्लक्षणीय नव्हे खास. अधिष्ठ हा सभेचा कर्णधार असतो असें जें वर म्हटलें त्याचा सरळ विधायक अर्थ असा की सभेचें दिग्दर्शन करणें हें काम मुख्यत्वेंकरून त्याच्याकडे असतें. त्याला नेहमी ही खबरदारी घ्यावी लागते की सभेचें काम केव्हाहि रेंगाळल्यासारखें होतां कामा नये; योग्य दिशेने, आणि धिमेपणाने कां होअीना परंतु, चालतें राहिलें पाहिजे; आणि तें चालू असतांना सभेत कोठेहि अयोग्य क्षोभ अुत्पन्न होतां कामा नये. तात्पर्य सांगा-वयाचें तें हें की अधिष्ठाने आपली वृत्ति आणि आपलें वर्तन असें ठेविलें पाहिजे की वातावरण सदा **'चारणा'**युक्त राहील; आणि आपली सभाकार्याची नौका स्तब्धता आणि क्षुब्धता— अेक वाळवंट आणि अेक भोवरा — हीं दोन्ही कडेचीं संकटें टाळीत टाळीत प्रसन्नतेने पुढे पुढे जात राहील.

अधिष्ठामध्ये अनेक गुण अुत्कटतेने पाहिजेत; परंतु त्यांतल्या त्यांत अपक्षता, निश्चय आणि चातुरी हें त्रैगुण्य तर अगदी अवश्यमेव असलें पाहिजे. अपक्षता म्हणजे निःपक्षपाती

वर्तन, निश्चय म्हणजे खरोखरी क्षिप्रनिश्चय अथवा अेखाद्या प्रश्नावर निकाल सांगावयाचा तर त्याला तो त्वरित देतां आला पाहिजे ही हातोटी, आणि काम चालविण्यांत चातुरी म्हणजे माधुरी आणि कुशलता. (अपक्षता-निश्चय-चातुरीति त्रैगुण्यमेतत् विशिनष्टि अधिष्ठम्).

अधिष्ठाच्या कामामध्ये महामंत्र म्हटला म्हणजे 'चारणा' हें वर दिलेंच आहे. काम सारखें पुढे, न रेंगाळतां, चालत्त राहिलें पाहिजे. या बाबतींत निवाहक आणि त्याने प्रारंभींच सज्ज ठेविलेली **क्रमणिका** यावर साहजिकच त्याची मोठी भिस्त असते.

क्रमणिकेंत जीं निरनिराळीं **क्रमणीयें** दाखल केलेलीं असतात त्यांत बहुतकरून प्रथम पूर्वसभेचें **सारांशिक** वाचून दाखवून तें **स्थिरायित** करणें ही गोष्ट असते. अर्थात् सभा सार्वजनिक आणि प्रासंगिकच असल्यास हें क्रमणीय तेथे असण्याचें कारण नाही. परंतु सभा परिसंस्थीय असल्यास अेकामागून अेक येणाऱ्या परिसंस्थेच्या सर्व सभांमध्ये अनुबंध ठेवणें आवश्यक असतें; आणि यासाठी पूर्वसभेचें सारांशिक वाचून दाखवून स्थिरायित करणें ही गोष्ट प्रथमच केली जाते. पूर्वसभेच्या सारांशिकामध्ये पूर्वसभेंत घडलेली कोणतीहि महत्त्वाची गोष्ट वगळलेली नसली पाहिजे. परंतु पाल्हाळ आणि अतिविस्तर मात्र टाळलेलाच पाहिजे. कांहीं सभांची मात्र अशी परिपाटी असते की पूर्वसभेचा अित्थंभूत, सविस्तर आणि समग्रच्या समग्र असा **अुपाक्रम** लिहिला जावयाचा आणि तो वाचून दाखविल्यावर अधिष्ठाच्या सहीने स्थिरायित व्हावयाचा. सारांशिकच फक्त लिहिलें जाणें आणि स्थिरायित होणें हीच प्रथा पुष्कळशा ठिकाणीं युक्त ठरते; कारण तसें केलें म्हणजे आवश्यक तेवढें जुनें काम होतेंच परंतु त्यापायीं नव्या कामाचा फारसा वेळ विनाकारण व्यायित होत नाही.

पूर्वसारांशिकाचें काम अेकदा अुरकलें म्हणजे बहुधा दुसरें क्रमणीय म्हणजे कांहीं निवेदन (आणि पत्रव्यवहार अि०) नि त्यावरील **परिप्रश्न** हें असतें. परिसंस्थेच्या कामकाजाविषयी प्रस्तुत आणि प्राकरणिक असे प्रश्न किंवा शंका कांहीं सभासदांच्या मनांत असल्यास त्यांनी त्या सभेपुढे टाकून खुलासा नि माहिती पाहिजे असेल ती निवाहकद्वारा अथवा अधिष्ठद्वारा प्राप्त करून घ्यावी. अेखादा प्रश्न किंवा अेखादें बोलणें अप्रस्तुत, नियमबाह्य, प्रतिशिष्ट किंवा **शिष्टिविरुद्ध** आहे कीं काय हें ठरविण्याचा अधिकार अर्थातच अधिष्ठाकडे असतो; आणि त्याने तो योग्य वेळीं योग्यपणें बजाविला पाहिजे. त्याने तो आपण होअून न बजाविल्यास, व तसें अेखाद्या सभासदास वाटल्यास, त्याने **कोनय** प्रश्न काढावा. म्हणजे चट्दिशी अुमें राहून 'कोनय' हीं तीन अक्षरें अधिष्ठाला अुद्देशून अुच्चारावीं. त्याच्या तसें करण्याने सभेच्या कामांत **व्यत्यय** आला असें मानलें जात नाही; मात्र अर्थात् हा कोनय प्रश्न प्रामाणिकपणें आणि सविनय अथवा शिष्टाचाराला धरूनच केलेला असला पाहिजे. कोनय याचा अर्थ 'को नयः ? वाट कोणती' ?, 'चालू आहे हें योग्य अथवा शिष्टीला धरून किंवा प्रस्तुत आहे काय ?' असा समजावयाचा. हा प्रश्न अुपस्थित झाल्यास अधिष्ठाने, पाहिजे तर, कोनय प्रश्न काढणारास अधिक खुलासा विचारावा. परंतु अशा वेळीं अधिष्ठाने दिरंगाअी अशी मुळींच होअूं न देतां आपला **निदेश** चट्दिशी आणि ठामपणें दिला पाहिजे; आणि सभेनेहि तो चट्दिशी मानिला पाहिजे. साधारणतः कोणाहि सभासदाने निदेशवर्तीच असावयास पाहिजे. निदेश म्हणजे अुपस्थित झालेल्या प्रश्नावर अधिष्ठाने आपल्या सारासारविचाराने दिलेला निर्णय. कोनय प्रश्नासंबंधी सांगावयाचें तें येथेच म्हणजे परिप्रश्न या क्रमणीयावरच असतांना सांगून ठेविलें खरें; परंतु वस्तुतः कोनय प्रश्न अुपस्थित होतात ते बहुधा पुढेच. जेव्हा सभेंत अेखाद्या महत्त्वाच्या विषयाची चर्चा कमीअधिक आवेशाने सुरू होते तेव्हा.

**चर्चा, चारणा, निर्धारित**

ठरावरूपाने सभेपुढे कांही प्रश्न चर्चेला यावयाचे असतात ते बहुधा तृतीय क्रमणीय म्हणून ओळीने घेतले जातात. अेखादा ठराव सभेपुढे चर्चेकरिता मांडावा असें सदःस्थाच्या मनांत आल्यास त्याने त्या ठरावाची (**स्थापनीयाची**) लेखी **पूर्वसूचना** अधिष्ठाकडे किंवा निवाहकाकडे द्यावी लागते. अधिष्ठाच्या मतें तो ठराव नियमबाह्य किंवा अप्रस्तुत किंवा कोण-त्याहि कारणाने '**न आदेय**' असा ठरल्यास तो ठराव **अपास्त**च होतो. अपास्त न झाल्यास अर्थात् तो **आदेय** आहे असें ठरतें आणि त्याचा **प्रसूचक** कोण, **अनुमोदक** कोण, याची चौकशी अधिष्ठ करतो. प्रसूचना आणि अनुमोदन रीतसर होत आहे असें दिसल्यास अधिष्ठ प्रसूचकाला **पाचारण** (प्राचारण) करितात की तुम्ही आपल्या ठरावाची **चारणा** करावी. म्हणजे अर्थात् या ठिकाणीं **प्रस्ताव**रूप भाषण करावें. प्रसूचकाने ठरावावर प्रस्ताव म्हणून भाषण केलें तर त्याला या नात्याने **प्रस्तावक** म्हणावयाचें. प्रस्ताव झाल्यावर अनुमोदकाचें भाषण. केव्हा केव्हा अनुमोदक आपलें भाषण पुढे करूं म्हणून राखून ठेवितो; आणि नुसतेंच अनु-मोदन देअून बसतो.

मग पुढे प्रश्नाची **चर्चा** सुरू होते. अधिष्ठ बहुधा अेक अनुकूल, अेक प्रतिकूल अशी वक्त्यांची क्रमवारी लावितो. या बाबतींत अधिष्ठाने अेक खबरदारी मात्र अवश्यमेव घ्यावी लागते. ती ही की सभेपुढे प्रश्न काय आहे, कोणत्या स्वरूपांत तो सभेपुढे मांडला गेला आहे याचें स्पष्ट आणि ठसठशीत **प्रवेदन** त्याने चर्चेच्या आरंभींच करावें; आणि जरूर दिसल्यास किंवा कोणीं सभासदाने प्रामाणिकपणें विनंती केल्यास अेकापेक्षा अधिक वेळांहि प्रवेदन स्पष्टपणें करण्यास कंटाळा करू नये. अेखाद्या प्रश्नावर पुरेशी चर्चा झाली आहे अशी वेळ आली म्हणजे अधिष्ठाकडून त्या प्रश्नाची **विचारणा** होते—प्रश्न मताला टाकला जातो. मग **संघोष**—हो हो अित्यादि, आणि नो नो अित्यादि. या संघोषावरून सभेचा आशय जाणून प्रश्न **असंमत** झाला की **संमत** झाला हें अधिष्ठाने **प्र-घोषित** करावयाचें असतें.

समजा की अधिष्ठाने 'प्रश्न संमत झाला' अशी प्रघोषणा केली; आणि ती अुलट बाजूच्या कोणा सभासदास पटली नाही तर त्याने 'नाही' म्हणून **प्रतिघोष** करावा. तसें झाल्यास अधिष्ठाने सभेचा आशय जाणण्याच्या दुसऱ्या पद्धतीचा अवलंब करावा लागतो. ती म्हणजे हातगणति (अुद्दर्शन) किंवा शिरगणति (विभाजन). हातगणति याचा अर्थ स्पष्टच आहे; शिरगणतीकरिता सभासदांचें **विभाजन** करावें लागतें. याकामीं गणक म्हणजे मोजणारे नेमून त्यांच्या साहाय्याने मताधिक्य कोणीकडे आहे हें अधिष्ठाला निश्चित करावें लागतें. अेखादा ठराव संमत झाला म्हणजे रास्त रीतीने तो कशा स्वरूपांत मांडिलेला असावा तें पाहा. अुदाहरणार्थ— निर्धारित कीं : मराठी भाषेंत चांगले अर्थवाही शब्द विपुल असूनहि त्यांच्या अैवजी त्याच अर्थाचे परदेशी शब्द, परकी भाषेच्या प्रतिष्ठेमुळे किंवा केवळ चालढकली-मुळे, नव्याने दाखल करण्याची किंवा दाखल होअूं देण्याची संवय आपल्या लोकांत दिसून येते ती अनिष्ट आहे.

अेखादें **स्थापनीय** किंवा अेखादा ठराव प्रथम सभेपुढे **प्रस्ताव**रूपाने येतो. त्याच्या आधी तो निवाहकाकडे **सूचना**रूपाने आलेला असतो. पुढे सभेंत त्यावर अनुकूल प्रतिकूल **चर्चा** होते. सभेपुढे ठराव असतांना कदाचित् तो सभेच्या अनुज्ञेने **परांचित** होअील (मागे

घेतला जाअील); कदाचित् कांही कारणाने तो **अपसारित** होअील; अथवा **गलित** होअील. कदाचित् तो कमीअधिक **विशोधित** होअील; आणि मग शेवटीं विशोधित रूपांतच सभेकडून बहुमताने अथवा (तो जास्त सुदैवी असल्यास) **अकमत्यानेहि संमत** होअील. अुलट अेखाद्या वेळेस असेहि घडतें की तो ठराव चांगला तावून सुलाखून म्हणजे नाना तऱ्हेने विशोधित होअून सभेपुढे मतार्थ येतो; आणि शेवटीं त्याची अधिष्ठाकडून विचारणा झाल्यावर पाहावें तों तो बहुमताने असंमत किंवा **निरस्त** देखील ठरतो.

यावरून दिसून येअील की ज्याला अेखाद्या ठरावाची अित्थंभूत काहाणी नको असेल त्याने निश्चितार्थक चौकशी करावयाची ती ही की तुमच्या सभेंत शेवटीं निर्धारितें कोणतीं कोणतीं झालीं तेवढींच आम्हांला कळवा; तुमच्यापुढे आलेले निरनिराळे ठराव आणि त्याच्या निरनिराळ्या प्राप्त झालेल्या दशा-दशान्तरें यांच्याशीं आम्हाला कांही कर्तव्य नाही.

या सर्व विवेचनावरून चारणा, ठराव, सूचना, प्रसूचन, प्रस्ताव, निर्धारित या शब्दांना सर्वांना आपापली कामगिरी आणि स्थान आहे, आणि त्या त्या शब्दाला त्या त्या ठिकाणीं व्यवस्थेनुरूप वापरणें अगत्याचें आहे हें स्पष्टपणें दिसून येअील. अेकच शब्द घेअून तो नाना ठिकाणीं वाटेल त्या कामीं दडपीत सुटावयाचें असें करावें लागणें ठीक नव्हे. अुदाहरणार्थ सूचना हा शब्दच पाहा. भयासंबंधी दिलेली सूचना; सावधान राहावें म्हणून सौम्य उपदेश तोहि सूचनाच; ताळ्यावर यावें किंवा अेखाद्या क्रियेपासून निवृत्त व्हावें म्हणून दिलेली सावधगिरीची आणि निषेधपर तीहि सूचनाच; सभा भरवावयाची आहे म्हणून माहितीकरिता वर्तमानपत्रांत दिलेलीहि सूचनाच; अेखादी गोष्ट स्थापनीय म्हणून अमुक अमुक स्वरूपांत स्थापित करावी म्हणून सभेपुढे मांडिलेली तीहि सूचनाच; शेवटीं संमत झालेलीहि सूचनाच; अशा रीतीने अेकाच शब्दाचा अतोनात आणि नाना ठिकाणीं अुपयोग होअून अगदी पिट्टा पडतो तसें न व्हावें हें अुचितच होय.

* * * *

आतापर्यंत जो विषयाचा अुपन्यास झाला त्यांत आता तीनच गोष्टींची थोडीशी भर घालावयाची राहिली. त्या तीन गोष्टी म्हटल्या म्हणजे: **शोधना** (किंवा शोधनिक) हें अेक प्रकरण; दुसरें चर्चेत्यादि सभाकार्य चालू असतां जे निरनिराळे **अन्तराय** (व्यत्यय[१] नव्हे) मध्येच अुपस्थित होअूं शकतात ते; आणि तिसरें छोटेंसें प्रकरण म्हणजे **शिष्टभंग**.

* * * *

येथे हें अेक सांगून ठेवणें अिष्ट वाटतें की प्रस्तुत लेख हा मुख्यतः परिभाषासंबंधीचा आहे. अर्थात् या ठिकाणीं सर्व शास्त्रार्थ सांगणें किंवा सभाशास्त्रांतील प्रकरणाप्रकरणावर ग्रंथांतरीं शोभण्यासारखा अूहापोहात्मक विस्तार करणें हा मुळीच हेतु नाही. हेतु अेवढाच धरिला आहे की या विषयांतील बहुतेक सर्व प्रकरणांत लागणारे मुख्य मुख्य पारिभाषिक शब्द सांगून व्हावे; ते सांगतांना होतांहोअीतों प्रत्येक पारिभाषिक शब्द आपापला स्वतःचा अर्थ विशद करीत करीतच पुढे यावा; आणि त्याचबरोबर तत्सदृश भासणाऱ्या परंतु वस्तुतः अर्थ आणि अुपयोग यांच्या दृष्टीने भिन्न असणाऱ्या अितर शब्दांनीहि आपापला पृथक्‌पणा स्पष्ट करावा. असा प्रस्तुत लेखकाचा परिभाषेपुरता मर्यादित हेतु असल्यामुळे शास्त्रार्थ कोठे कोठे सांगावयाचे राहिले, कोठे कोठे अर्धवटच सांगितले गेले असें होणें अपरिहार्यच मी समजतों. क्वचित् वाच-

१ व्यत्यय = त्रासदायक अडथळे, परिहार्य, आणि खोडसाळपणाचे. मध्येच अुपस्थित होणाऱ्या, अडथळ्यासारख्या वाटणाऱ्या, परंतु अपरिहार्य गोष्टींना मात्र अन्तराय म्हणावयाचें.

अनुक्रमणिका

काला असेंहि वाटण्याचा संभव आहे की अमुक अमुक हा परिच्छेद परिभाषेच्या अुपन्यासाला आवश्यक होता असें म्हणतां येत नाही; परंतु त्या ठिकाणीं वाचकानें अेवढेंच मनांत घ्यावें की अशा तऱ्हेचा जो भाग आलेला असेल तो अर्थवाद समजावयाचा; त्याचा अुपयोग लेख थोडासा वाचनीय करण्याकडे झालाच तर तेवढाच अिष्ट, म्हणून तो असूं द्यावा अितकेंच.

* * * *

## शोधना

अेखादा ठराव (स्थापनीय म्हणून) सभेपुढे येतो तेव्हा त्या ठरावाचा प्रस्तावक शक्य तोंवर असें पाहतो की त्याचें रूप बहुतेकांना संमत होण्यासारखेंच असावें. परंतु ही गोष्ट नेहमी शक्यच असते किंवा त्या दिशेने पूर्वप्रयत्न करूनहि ती साधतेच असा नेम नाही. निरनिराळ्या दृष्टींनी त्या ठरावाकडे पाहणारे लोक सभेंत असतात आणि त्यांच्याकडून मूळ ठराव सुधारण्याकरिता, कमीअधिक पालटण्याकरिता, निरनिराळ्या सूचनाहि पुढे येतात. यांनाच **शोधना** म्हणावयाचें. शोधना होतांहोअीतों अेकदम चटाचट् पुढे येतील, त्यांतून कांहींचा संक्षेप कसा सहज घडवून आणितां येअील, आलेल्या सूचना कोणत्या क्रमाने सभेपुढे ठेविल्या जाव्या अित्यादि गोष्टींत निवाहकाच्या साहाय्याने अधिष्ठाची पुष्कळच मार्मिकता आणि चातुरी दिसून येण्यासारखी असते. अर्थात् अधिष्ठाचा हेतु हा असतो की सभेचा वेळ तर कमींतकमी जावा आणि ठरावाचें शेवटचें स्वरूप तर शक्यतोंवर सर्वांना संमत, निदान बहुतेकांना संमत, असेंच घडून यावें. या दृष्टीने अधिष्ठाचें काम कसें चालतें, तो आपलें चातुर्य कसें प्रकट करतो हें जिज्ञासु सभासदानें मुख्य मुख्य धुरंधर अधिष्ठांच्या कामावर बारकाअीनें लक्ष्य ठेवून अवलोकन करण्यासारखें आहे. सभेचा स्वभाव कसा काय आहे, तिची अेकंदर वृत्ति प्रस्तुत प्रसंगीं आणि प्रस्तुत विषयासंबंधी कशी आहे, तिची अेकंदर नाडी मंद, शीघ्र, संथ, क्षुब्ध कशी चालली आहे या गोष्टी चतुरस्र आणि अनुभवी अधिष्ठाला सहज आकलन करितां येतात; आणि तदनुसार त्याचा कर्तव्यक्रम चटाचट कसा ठरत असतो हें पाहणें फार मनोरंजक आणि बोधप्रद असतें. असो. येथे आपल्याला अेवढेंच पाहावयाचें आहे की शोधना कोणकोणत्या निरनिराळ्या स्वरूपाच्या असतात.

(१) कांही शोधना मूळ ठरावाच्या वाक्यांत मध्येच अमुक शब्द अधिक घालावा असें म्हणणाऱ्या असतात– **अंतरागम.**

(२) कांही शोधना मूळ ठरावाच्या शेवटीं आणखी अमुक शब्द किंवा अमुक अेक वाक्य अधिक घालावें असें म्हणणाऱ्या असतात– **अध्यागम.**

(३) कांहींचें म्हणणें असें असतें की अमुक शब्द मूळ ठरावांतून गाळावे– **लोप.**

(४) कांहींचें म्हणणें पडतें की अमुक शब्द काढून टाकावे आणि त्यांच्या जागीं अमुक अेक दुसरे कांही शब्द घालावे– दुहेरी काम– **प्रत्यागम.**

(५) अेखादी शोधना अेखाद्या वेळीं अशीहि येअूं शकते की तिच्या म्हणण्याप्रमाणे मूळ ठरावांतील 'निर्धारित की' याच्या पुढील सर्वच्या सर्वच भाग गाळून त्याच्या जागीं दुसरेंच कांही वाक्य घालावें. अशी अेखादी सूचना आल्यास ती आदेय म्हणून ठरवावी की अपास्त म्हणून सांगून टाकावे; तसेंच आदेय म्हणून ठरविल्यास अेकंदर शोधना मांडण्यांत तिचा क्रम कोठे कसा लावावा हें ठरविण्याचें काम अधिष्ठाचें आहे. त्यांत त्याची कर्तबगारी

आणि चतुरता पुष्कळच कसोटीला लागणारी असते. परंतु तो विषय निराळा. आपण या प्रकाराला नांव अुत्प्रत्यागम असें देणार; कारण त्यांत 'की'च्या पुढचें सर्वच वाक्य (अुत्सार्थ म्हणजे) बाजूला टाकून त्याच्या जागीं (प्रति) निराळीच वाक्यरचना ठेवण्याचा (आगम) अिरादा स्पष्ट असतो- **उत्प्रत्यागम.**

शोधनांचा व्हावयाचा तेवढा सर्व संस्कार मूळ ठरावावर घडल्यानंतर मग ज्या स्वरूपांत ठरावाची विचारणा व्हावयाची त्याला **विशोधित** ठराव म्हणावयाचे.

* * * *

**अन्तराय**

सभेंत अेखाद्या विषयावर चर्चा चालू असतांना **अन्तराय** कोणत्या प्रकारचे येअू शकतात तें पाहा:—

(१) कोणी सभासद **कोनय** प्रश्न अुपस्थित करतो. अशा ठिकाणीं होतां होअीतों चटकन् सारासार विचार करून अधिष्ठाला आपला निदेश द्यावा लागतो.

(२) कोणी **किंमान** प्रश्नाकडे लक्ष्य वेधतो. किंमान आस्थित नसल्यास सभा **निर्यापित** करणें भाग पडतें.

(३) कोणी समासद अशी चारणा करतो की सभेने आतां पुढील विषयाकडे वळावें— **पुरश्चार.**

(४) कोणी समासद अशी चारणा करतो की प्रस्तुत प्रश्नाची आता अेकदम विचारणाच व्हावी. या चारणेला अनुमोदन मिळालें आणि ही संमत झाली तर, चालू भाषण पुरें होतांच चर्चा थांबवून अधिष्ठानें प्रस्तुत प्रश्नाची विचारणाच केली पाहिजे— **पिधान.**

(५) **अुदश्चन प्रश्न**—कोणी समासद अशी चारणा करतो की 'आज या प्रश्नाची विचारणा होअू नये'; म्हणजे आज हा प्रश्न धसाला लावू नये. सभेमध्ये अेखाद्या प्रसंगीं असें घडतें की अेखाद्या प्रश्नावर चर्चा थोडीबहुत होणें हें अिष्ट किंवा अपरिहार्य असतें. परंतु कांही कारणाने प्रश्नाचा निकाल मात्र, अस्तिपक्षीं किंवा नास्तिपक्षीं, कोणत्याच बाजूने प्रकट होणें तर व्यवहारदृष्ट्या अनुचित, अनुपयुक्त अथवा अपायकारक दिसतें; आणि अितकें बहुतेकांना वाटत असून देखील प्रस्तावक आपलें स्थापनीय (ठराव) परांचित तर करीत नाही, तेव्हा अशा प्रसंगीं वरील अुदश्चन प्रश्नाचा अुपयोग करतां येतो. अुदश्चन प्रश्न संमत झाल्यास चर्चाविषयक प्रश्न गलितच होतो; तो असंमत (निरस्त) झाल्यास चर्चाविषयक प्रश्नावर अधिक चर्चा किंवा अधिक कांही विशोधनहि न होतां अधिष्ठाने त्याची अेकदम विचारणाच करावी लागते (म्हणजे अेकदम सोक्षमोक्ष, अधिक चर्चा नाही).

(६) सभा **निर्यापण.** या चारणेने— अर्थात् ती संमत झाल्यास— सभेचें काम तेथेच थांबतें. पुढील सभेच्या दिवशीं पुढील अवशिष्ट काम पुढे चालू.

* * * *

१ प्रयापण म्हणजे कोणतीहि गोष्ट करण्याचें पुढे ढकलणें, दिरंगाअीवर टाकणें, दिनान्तर करणें, निर्यापण किंवा निर्यापित करणें याला विशेष अर्थ आहे. तो असा को कोणतीहि गोष्ट (अु० अेखादी सभा भरविणें किंवा अेखाद्या क्रमणिकेंतील क्रमणीयांचा विचार करणें) **थोडीशी किंवा अंशतः करून** झाल्यावर **अवशिष्ट गोष्ट,** आज लगेच करतां येत नाही म्हणून, पुढे अेखाद्या दिवसावर ढकलणें.

### शिष्टिभंग.

आता राहतां राहिली अेकच बाब, आणि ती म्हणजे शिष्टिभंग. अेकंदर सभेय चाल-चलणुकीच्या ज्या मर्यादा त्याच शिष्टि, किंवा त्यांची आदरपूर्वक संभाळणूक यालाहि शिष्टि[1] म्हणावें, अर्थात् तद्विरुद्ध वर्तणूक म्हणजे शिष्टिभंग.

शिष्टिभंगाचे प्रकार किंवा प्रसंगः—

(१) असभेय शब्द वापरणें; चुकून वापरले गेल्यास वेळींच त्यांचें परांचन करण्याचें नाकारणें किंवा सरळपणें क्षमागति करण्याचें टाळणें.
(२) अन्य समासदांविषयी अुपमर्दकारक भाषा बोलणें.
(३) जाणूनबुझून सभेच्या कामांत व्यत्यय करणें (बुद्धया खोडसाळपणाचें वर्तन).
(४) अधिष्ठाचा निदेश न पाळणें. अधिष्ठीय समाज्ञेचा (कायदेशीर, रास्त आज्ञेचा) अनादर किंवा भंग.

शिष्टिभंगाबद्दल शिष्टिभंजकाला **शासन** सभेच्या निर्धारणेने होअूं शकतेंः—
(१) निष्कासन (सभालय सोडावयास लावणें).
(२) दण्ड (आर्थिक).
(३) अवधारण (समासदत्व कांही काळपर्यंत काढून घेणें— ठरविलेल्या अवधीपर्यंत किंवा मनाजोगी क्षमागति होअीपर्यंत.

* * * *

### समिति आणि सदस्य

आता दोनच महत्त्वाचे शब्द सांगावयाचे राहिलेः **समिति** आणि **सदस्य.** कित्येक लोकांची अशी अेक समजूत असलेली दिसून येते की समिति हा शब्द नवानिर्मित आणि बाटगा आहे; आणि बहुधा याच कारणाने त्यांना असें वाटतें की कमिटी, कमेटी असा शब्द, वापरावयाचा झाल्यास, आपण वापरावा. या ठिकाणीं अशा मनःप्रवृत्तीचें अेखाद-दुसरें अुदाहरण दिलें तर तें वावगें होणार नाही. कित्येकांना पाहा, तिकिट शब्द चांगला सहज आपल्या तोंडीं जमेसा नि सफाअीने मराठींत साजून जाणारा असून, मुद्दाम टिकेट असे जीभ वाकडीतिकडी करून म्हटल्याशिवाय बरें वाटत नाही! तसाच दुसरा शब्द राकेल. खोबरेल, अेरंडेल यासारखा तो मराठींत चांगला सहज साजून जाण्यासारखा; परंतु बुद्धया ऑ अुचार त्यांत घालून रॉकेल असे म्हटल्याशिवाय किंवा लिहिल्याशिवाय कांही लोकांना ठीक वाटतच नाही! अितकें करून पुनः अिंग्रजींतलाच कां होअीना पण, शुद्ध शब्द तरी झाला म्हणावे तर तेंहि नाही! असो. प्रस्तुत मुद्दा अेवढाच की समिति हा शब्द पूर्णपणें आपलाच आहे. तो बाटगा, कमिटीपासून बनविलेला, असा नाही हें लक्ष्यांत घेअून न विचकतां त्याला योग्य तें स्थान आपल्या मराठींत आनंदाने देणें. समिति शब्द अशा ठिकाणीं वापरावा की ज्या ठिकाणीं साधारणतः थोडेसेच पण अर्थात् योग्य सदःस्थ निवडून त्यांच्याकडे अेखादें निश्चित स्वरूपाचें कार्य (मित्यर्थ) सोपविलें आहे. तें देखील बहुधा अशा स्वरूपाचें की 'हा अेवढा अवधि; हा अेवढा असा असा

१ अमरकोशांत शिष्टि शब्द ज्या पंक्तींत आला आहे तीहि जातां जातां लक्ष्यांत घेतल्यास शिष्टि शब्दाची व्याख्या करण्यास– आपापल्या मनाशीं ठरविण्यास– थोडीबहुत मदत होण्यासारखी आहे. ती पंक्ति अशी— शिष्टिश्चाज्ञा च संस्था तु मर्यादा धारणा स्थितिः.

मर्यादित प्रश्न (मित्यर्थ); याचे जें कांही वेदितव्य असेल तें सर्व गोळा करावें, विचारांत घ्यावें; आणि त्यावरून झालेला आपला निश्चित **अभिप्राय** आमच्याकडे आपण सादर करावा.' अितकें झालें म्हणजे समितीचें[1] काम संपलें. केव्हा केव्हा अेखाद्या विशिष्ट कार्यविभागाकरिता **स्थायी समिति** ही नेमतात; तेव्हा समितीच्या कार्याचा अवधि जरा मोठा वर्षसहामहिन्याचा अथवा अधिकहि असूं शकतो ही गोष्ट निराळी.

कांही कांही परिसंस्था अशा असतात की त्यांचें सदःस्थपण हें केवळ वर्गणी देण्याच्या पात्रतेवर किंवा नुसत्या अुच्च नागरिकपणावर अवलंबून नसतें. अेखाद्या विशिष्ट शास्त्राच्या किंवा व्यवसायाच्या किंवा कलेच्या प्रकर्षाला त्या परिसंस्था वाहिलेल्या असतात; आणि अशा परिसंस्थांचें घटकत्व विशिष्ट विद्वत्ता आणि अनुभव यांची विवक्षित पायरी दर्शविणाऱ्या असतात. अशा संस्थांची अगदी खालची पायरी देखील बरीच श्रेष्ठ आणि दुःसाध्य असते; आणि तिच्यावर अधिकाधिक प्रकर्ष दाखविणाऱ्या साधारणपणें दोन पायऱ्या तरी असतात. यांपैकी पहिल्या पायरीवर असलेला तो **सदस्य** (= सदसि साधुः) होय. त्याच्या वरच्या पायरीवर **प्रसदस्य** आणि सर्वोत वरिष्ठ पायरीवर **मान्यवर**. या शेवटच्या पायरीवर असलेला आपल्या व्यवसायांत किंवा शास्त्रांत वा कलेंत धुरीणत्व पावलेलाच असावयाचा; अितका की त्याने वर्गणी देअून परिसंस्थेचा घटक होण्याचें देखील कारण नाही. त्याने आपलें नांव परिसंस्थेच्या त्या वरिष्ठ श्रेणींत घालण्यास अनुमति द्यावी आणि त्याकारणें परिसंस्थेने धन्यता मानावी.

---

## सभाकार्यविपयक शब्दावलि*

Accepted स्वीकृत

Accommodation (Seating arrangement) सादनिक (व्यवस्था)

Accountant वैयायिक (वि+आय→वैयायिक) one whose profession it is to inspect and audit accounts

Account, Accounts गणनिका, संव्यय

Add आगम करा

Add at the end अध्यागम करा

Adjourn a question प्रश्न निर्यापित करणें to put off till another day; to to postpone

Adjourn a meeting सभा निर्यापित करणें to postpone its further proceedings; to put an end to its activities for the day in order to resume and continue them at another time.

Adjournment निर्यापण, निर्यापित

Adjourned निर्यापित

Administrative duties अवस्थापकीय कार्य, अवस्थापकीय, वस्थापकीय

Advertisement आघोषण, आघोषणा, आघोप

---

[1] समिति हा शब्द व्युत्पादिलेला आहे तो असा:— संयंति अस्यां अिति. परंतु या निर्वचनाशिवाय स + मिति अशीहि फोड आपल्या सोयीसाठी आपण करूं शकतों. वर मित्यर्थ हा शब्द वापरून दाखविलेला आहेच. समितीकडे नेमका, मर्यादित असा करून दिलेला प्रश्न किंवा विषय हा त्याचा अर्थ.

* ही शब्दावलि म. सा. परिषदेच्या परिभाषा-चर्चा-मंडळाने मान्य केली असून याविषयी अधिक चर्चा व्हावी व सूचना मिळाव्यात या अुद्देशाने ती प्रसिद्ध करण्यांत येत आहे. —संपादक.

Advertise आघोषणा करणें
Advisory Council अनुशासक मंडळ, समुपदेशक मंडळ
Member of Advisory Council अनुशासक, समुपदेशक
Against, Opposed, 'not in favour' प्रतिकूल, विरुद्ध
Agenda paper क्रमणिका
To amend शोधना करणें, विशोधन
Amended विशोधित (Substantive)
Amendment शोधना
Apology क्षमा (क्षमागति)
Apologize क्षमा मागणें, क्षमागत होणें
Assembly मण्डळ
Those in arrears शेषित (सदस्वी)
Those who have paid their dues fully अशेषित (सदस्वी)
Assembly Hall समालय.
Audit : अधीक्षण करणें; अधीक्षण to make an official scrutiny and testing of accounts esp. with the help of skilled professional accountants.
Auditor अधीक्षक one who audits accounts
Audited अधीक्षित
Audit notes अधीक्षा
Ayes होकार, होहो
General Body Meeting निकाय-सभा
General Body निकाय
Local Body संकाय
Budget निकल्प
Building वेश्म (वेश्मा), वेश्मिका, वेश्मागार, अगारिका
Building work वेश्मागारिक, वेश्मरचना, बांधकाम, अगारिक रचना.
Call upon पाचारण करणें (प्राचारण)
Candidate (for office, in election) पदार्थी, आशंसुक, पदार्थिक
Carried संमत
From the Chair अधिष्ठेवरून
The Chair अधिष्ठा; अधिष्ठपद, अधिष्ठ
(*a*) Seat occupied by person presiding at an organized public or private meeting.
(*b*) Office, status, dignity of one who presides.
(*c*) The person presiding. The person who presides or takes the chair at a meeting of a deliberative or executive body.
Closure पिधान
Committee समिति
A Committee of the whole सर्वसमिति
Conference संमन्त्र, संभाषा
Confirmed (minutes) स्थिरायित
Congress, Conference परिषद्
Constitution घटना
Co-opted स्वीकारित
Municipal Corporation संनिकाय
Council : मण्डळ A body of persons specially designated or selected to act in an advisory, administrative or legislative capacity
Municipal Council संपालिक मण्डळ
,, Councillor संपालिक
Declare (the result) प्रघोषणा करणें
Delete लोप करा
Digression व्यवचार, वेवचार.
Discipline शिष्टि
Division विभाजन
Election, Electing, To elect उद्वरण
Elected उद्वरित
Estimate निमान
Executive Body चालकमंडळ, चालकवृन्द
Member of... चालक
Executive Council कारणिक मण्डळ
Ex-officio पदसिद्ध, पदतः, पदागत

Ex-officio member पदसिद्ध घटक. (सामान्य संज्ञा सदस्वी किंवा 'घटक'; विशेष संज्ञा मात्र व्यवस्थापक अि० पैकी कोणतीं तें मंडळावरून ठरणार)
Fellow of (a learned) institute मान्यवर
Associate member...सदस्य
Member...प्रसदस्य
Field-work निःसद्मकार्य, निःसद्मिक
Fine दण्ड
'For', 'In favour' अनुकूल
Furniture अुपस्कर
Governing Body or Council प्रशासक मण्डळ
Member of Governing Body of Council प्रशासक
Hall आलय
Item क्रमणिक, करणीय
Legislative Assembly विधिमण्डळ
Legislator विधिदर्शी
Assembly Hall सभालय, आस्थानी, आस्थान
The Honourable Member सभासद्वर्य
Insert अंतरागम करा
Insertion अन्तरागम
Institute: (1) परिसंस्था Formal organization or society established with a scientific, social, educational or other object.
(2) प्रवेश्म Building forming the headquarters of such a society
Institution संस्था
(1) Act of instituting स्थापन, स्थापना
(2) Something that has been instituted, established custom, order, principle, system, law etc. संस्था
(3) Institute परिसंस्था

Interruption अन्तराय
Institute, Institution, Society, Association परिसंस्था (समाज,संघ अि.)
Those interested आस्थायित (अु० आस्थायितांनी अवश्य यावें)
Lapsed (motion, proposition) गलित
Lapse गलित होणें
League (union) संघ
Loud speaker महावक्त्र
Majority बहुमत, भूयिष्ठ, भूयसी (संख्या)
Managing Council व्यवस्थापक मंडळ
Member of Managing Council व्यवस्थापक
Meeting सभा, मिलित
Member घटक / सदःस्थ / सदस्वी — मण्डळाच्या किंवा सदसाच्या पटावर नांव असलेला
**सभासद**: प्रत्यक्ष सभेमध्ये अुपस्थित असून सभाकार्यामध्ये (मतदान अि.) भाग घेण्याला अधिकार असलेला तो
**सभास्तार**: सभास्थित परंतु मतदानादिकांत भाग घेण्याला अनधिकारी तो
Member of (a learned) institute सदस्य
Member of Staff स्थापक, स्थापकीय (Founder संस्थापक)
Membership (१) घटकत्व (२) वर्गणी घटकसंख्या, घटकता, घाटक्य
Microphone कर्णिका, श्रोत्र
Minutes of the last meeting पूर्वसभेचें सारांशिक Summary, notes made, record taken, of proceedings at a meeting
Dissenting minute (minute: a short draft, note or memorandum) विमतिक, विमतिका
Motion चारणा
Mover प्रस्तावक, प्रसूचक, चारणा करणारा

(A motion is brought forward, proposed चारणा करणें, प्रस्ताव होणें, करणें, प्रस्ताव)
Municipal Council संपालिक मंडळ
Municipality नगरपालिका
Member of...संपालिक, संपालिका
Nem Con वैमत्यरहित
Noes, Nays नो नो, नोकार, नकार
Nominated (१) नामोक्त (२) स्थापित
Notice (of a motion) सूचना
Obstruction व्यत्यय
Office (१) सद्म, (कार्यसद्म, कार्यालय) (२) पद
Office work सद्मकार्य, सद्मिक
Officer अधिकारी, पदधारी, पदस्थ, कार्मिक
Office-bearer अधिवाहक
Office-staff सद्मस्थापकीय
Order ! Order ! आदेश ! आदेश !
In order अनुशिष्ट; आदेय
Out of order प्रतिशिष्ट, बाधित, नादेय, न आदेय, अपास्त (rejected as being out of order)
Permission अनुज्ञा
Permitted अनुज्ञात
Plot of land वास्तुभाग
Present आस्थित
Present, list of those आस्थितनामावलि
Postpone प्रयापित करणें, प्रयापण
Preside : अधिष्ठा करणें to occupy the place of authority, control or chief importance esp. at meetings of a deliberative assembly of any kind.
President : अध्यक्ष. प्रष्ठ; the title of various persons holding an official position of authority or control.
Previous question अुदंचन प्रश्न
Proceedings अुपाक्रम, वृत्तान्त
Propose प्रसूचन करणें, प्रसूचित करणें
Proposer प्रसूचक
Punishment शासन
'Putting' the question विचारणा, प्रश्नाची विचारणा करणें, मताला टाळणें
Quorum किंमान; किंमानप्रश्न
Record (१) कागदिक (२) कागद्म
Reconsideration पुनर्विचार
Terms of Reference मित्यर्थ
Regulating Council नियामक मंडळ, नियंत्रक मंडळ
Member of Regulating Council नियामक, नियंत्रक
Reject निरस्त करणें
Rejected निरस्त
To be rejected असंमत होणें, निरस्त होणें
Report (of a committee, submitted to) अभिप्राय (समितीने सादर केलेला)
Rescinded पर्यस्त
Resolution निर्धारित
Resolved that निर्धारित की
Rise to a point of order कोनय प्रश्न काढणें, कोनय करणें
Ruling निदेश
Sanction (approval) अनुमति
Sanctioned (approved) अनुमत
Scrutineer, scrutinizer अैक्षणिक
Secretary निवाहक
To second a motion अनुमोदन (करणें, देणें)
Seconder अनुमोदक
Select body प्रकाय
Senate संसदा
Sense of the meeting सभेचा आशय
Show of hands अुद्दर्शन
Standing orders and Rules शिष्टि, नियम, समाज्ञात, विनय-नियम
Standing Committee स्थायी समिति

Stating the question प्रवेदन; प्रश्नाचें प्रवेदन करणें
Stationery कागदादिक, कागद्य
Store-room निलय
Substitute प्रत्यागम करणें
Substitution प्रत्यागम (अुत्प्रत्यागम 'कीं'-च्या पुढील सर्वच काढून दुसरे शब्द बदली घालणें)
Superseded अपसारित
Suspended अवधारित
Suspend अवधारित करणें
Suspend : अवधारण करणें to prohibit temporarily from exercise of privileges or functions
Syndicate संप्रकाय
Treasurer नैधिक : officer in charge of the funds and one who manages the finances of a society, institution etc.
Trustee : विश्वस्त*; वैश्वस्तिक one to whom a trust is committed
Un-parliamentary असभेय
Parliamentary सभेय
Unanimous अैकमतिक
Unanimity अैकमत्य
'Voice' संघोष
Vote मत
Withdrawn परांचित
Withdrawal परांचन

---

## स्त्रियांच्या म्हणी

( १३४ व्या पानावरून पुढे )

(५९७) घाम गाळल्याशिवाय दामाची किंमत कळत नाही.
(५९८) आणा तसा ताणा (कोष्ट्याला अुद्देशून).
(५९९) समुद्रांत मासा तडीस मोल.
(६००) अुडत्या बैलास दुडती गोणी.
(६०१) गहाण ठेवायचं सोनं, मग मामा कशाला जामीन ?
(६०२) दैव फळफळलें, अेरंडाला जायफळ आलें.
(६०३) पाहुणा आला घरीं, भीक मागावी लागते दारीं.
(६०४) ज्याचा माल त्याचे हाल, कोल्हेकुत्रे झाले लाल (खाअून खाअून लालबुंद).
(६०५) पाहुण्याला पाहुण्याचा राग, घरधन्याला दोघांचा राग.
(६०६) अेक पाहुणा तर घर पाहुणा.
(६०७) मुकेला राजा कडबोळ्याला राजी.
(६०८) नणदेच्या कुंदुले आज छळशील मला, अुद्यां गेलीस सासरीं की मला तेंच तुला.

---

* Trust : something committed to one's charge and care, to be used for the benefit of another specifically the vesting of the legal ownership of property in a person or persons, "trustees", for the benefit of another or others, "cestui que trust" विश्वस्ति.

# कोंकणांतील 'लिंबाचीं गाणीं'[1]

(लेखिका — कु. दुर्गा भागवत)

कोंकणप्रांत अनेक दृष्टींनी वैशिष्ट्यपूर्ण आहे. विशेषतः कोंकणचे लोकसंप्रदाय तर फारच मजेचे आणि अितर सर्व प्रांतांपेक्षा निराळे असे आहेत. अजून समाजशास्त्राच्या किंवा वाङ्मयाच्या दृष्टीने कोकणच्या चालीरीतींचा किंवा बोलभाषांचा अभ्यास व्हावा तसा झाला नाही, किंबहुना अजून अशा तऱ्हेच्या संशोधनाला अद्याप शिस्तवार सुरुवात झाली नाही, असें म्हणणें अतिशयोक्तीचें होणार नाही.

कोंकण लोकभ्रमांचें आगर आहे. चांगल्या व वाअीट कल्पकतेबद्दल कोंकणी लोक कोणाला हार जायचे नाहीत. भुतांखेतांच्या गोष्टी अैकाव्या कोंकणांतच. गाणीं गावीं त्यांनीच. कोंकणांतलीं गाणीं अजून जिवंत आहेत. नुसत्या ओव्याच नव्हे तर नानातऱ्हेचे गीतप्रकारहि प्रचलित आहेत. गोष्टींचेहि नानाप्रकार आहेत. त्यांसंबंधाने लिहावें तितकें थोडेंच होअील. 'लिंबाचीं गाणीं' हीं कोकणच्या कुणबी व मराठा जातींत म्हटलीं जातात. अनेक दृष्टींनी हीं गाणीं फार महत्त्वाचीं आहेत. अुपलब्ध असलेल्या लोकगीतांत (केवळ महाराष्ट्रांतच नव्हे तर सर्व हिंदुस्थानांतील लोकगीतांत) ह्या गाण्यांचें स्थान स्वतंत्र आहे. लग्नापूर्वी मुलगी वयांत आली म्हणजे अेक विधि करतात—त्याला 'कुंवाराचा लिंब' असें म्हणतात—त्या प्रसंगीं कुटुंबांतील स्त्रिया म्हणतात.

ऋतुप्राप्ति ही स्त्रीच्याच आयुष्यांतील नव्हे तर मानवजातीच्या लैंगिक विकासांतील अेक अत्यंत महत्त्वाची बाब आहे. ऋतुप्राप्तीच्या विधींना कौमार्यविधि असें नांव देतां येअील. कौमार्यविधीची अुभारणी स्त्रीपुरुषांतील स्वाभाविक आकर्षण, कौमार्याचें महत्त्व, लैंगिक व्यवहाराचें प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष ज्ञान, यांवर झालेली असते.

कौमार्यविधि हिंदूंमध्ये मुलगी वयांत आली की करण्यांत येतो. मुलगी विवाहित असल्यास त्या विधीला गर्भाधान[2] म्हणतात. हा प्रकार सार्वत्रिक रूढ आहे. हा विधि लग्नानंतर मुलगी वयांत आल्यानंतर करतात किंवा ती अगोदर वयांत आल्यावर करतात किंवा ती अगोदर वयांत आली असल्यास पहिल्या पाळीनंतर करतात. हा विधि व त्याला आनुषंगिक अशीं 'न्हाणोलीचीं गाणीं' सर्व जातींत रूढ आहेत. परंतु कौमार्यविधीचा दुसरा प्रकार, म्हणजे कुमारिकेच्या बाबतींत करण्यांत येणारा विधि, फार दुर्मीळ आहे. वर वर्णन केलेल्या कल्पना कौमार्यविधींशीं संलग्न असल्यामुळे बहुतेक जातींतून त्याची हकालपट्टी झालेली दिसते. आदिवासी जातींत देखील हा विधि पाळलेला दिसत नाही. ऋतुसंभवानंतर लग्न हा ह्या जातींचा शिरस्ता असतो. त्यामुळे मुलगी वयांत आली की ती तरुणाशीं विवाहबद्ध होण्याच्या अिच्छेने नाच,

---

१ कोंकणप्रांताविषयी समाजशास्त्रदृष्ट्या जें कांही लिखाण झालें आहे त्यांतील महत्त्वाचें म्हणजे जॅक्सन् यांचें Folk-lore of Konkan हें पुस्तक, सरकारी गॅझेटीअरमध्ये आलेले कोंकणच्या लोकांविषयींचे अुल्लेख, डॉ. केतकरांच्या ज्ञानकोशांतील कांही माहिती, रा. ब. पु. बा. जोशी यांचा अुत्तर कोंकणचा प्राचीन अितिहास, ग्रीअर्सन यांच्या Linguistic Survey of India मध्ये आलेले कोंकणी बोलभाषांचे कांही नमुने, मुंबअीच्या रॉयल अेशियाटिक सोसायटीच्या पत्रिकेंत आलेले लोककथांबद्दल दोन तीन लेख आणि अितर मासिकांत प्रसिद्ध झालेले कांही फुटकळ लेख अेवढाच कोंकणबद्दलचा आमचा अभ्यास.

२ हिंदींत ह्या विधीला 'गौना' किंवा 'गोद भरना' असें म्हणतात. मराठींत त्याला गर्भाधान, फलशोभन, सोहळा, ओटी भरणें, पदर येणें, फुल भरणें, वाडी भरणें, नहाण अित्यादि नांवें आहेत.

गाणीं अित्यादि प्रकारांत प्रामुख्याने भाग घेअूं लागते, व ह्या साधनांच्या द्वारा आपल्या जोडीदाराची निवड करते.

अेकंदरींत पाहतां कुमारिकेच्या कौमार्यविधींबद्दल हिंदुस्तानांत काय चाली प्रचलित आहेत ह्याबद्दल जवळ जवळ कांहींच माहिती अुपलब्ध नाही. परंतु आफ्रिका, दक्षिण समुद्र व दक्षिण हिंदुस्तान यांत अुपलब्ध असलेल्या विधींची छाननी केली तर असें आढळून येतें की ह्या विधींचीं मुख्य अंगें (१) प्रत्यक्ष धार्मिक विधि, नाच, गाणीं इत्यादि[१], (२) विधिपूर्वक प्रत्यक्ष कौमार्यभंग[२], (३) रूपकात्मक कौमार्यभंग, आणि (४) लग्नाची बतावणी[३] हीं होत.

मुंबअीलगतच्या कांही शेतकरीवर्गांत लग्नापूर्वी मुलगी वयांत आल्यास तीं गोष्ट कोणास न कळवतां चवथ्या दिवशीं तिला स्नान घालून तिच्यावरून नारळ ओवाळून टाकतात. ह्या विधीला 'चोरटें पाणी' असें नांव आहे. 'आदिवासीयां'मध्येहि चार दिवसांच्या अस्पर्शते-शिवाय मुलीचा कौमार्यविधि किंवा गर्भाधान देखील प्रचलित नाही. त्यामुळे कोकणांतला ह्या 'कौमार्यविधि' फार महत्त्वाचा आहे. हा विधि पुढीलप्रमाणे करतातः—

मुलगी पहिले चार दिवस जें वस्त्र नेसली असेल त्या वस्त्रानिशीच मामाच्या मांडीवर बसते. मामा वस्त्रहीन होअून घोंगडी पांघरून तिला तोरणीच्या मांडवाखाली मांडीवर घेतो. त्याच्या हातांत तोरणीची काठी असते. जमलेल्या स्त्रियांच्या हातांत निंबाच्या (कडु निंबाच्या) डहाळ्या असतात. त्यांनी त्या मामा-भाचीवर पाणी शिंपडतात. मग मामा भाचीला कडेवर घेअून नदीवर जातो व तेथे दोघें स्नान करतात.

'लिंब' व 'कडुनिंब' ह्यांमधील नामसादृश्यामुळे ह्या विधींत लिंबाच्या फांद्या दुर्मीळ असल्याकारणाने कडुनिंबाच्याच डहाळ्यांचा अुपयोग केलेला आढळतो.

त्याचप्रमाणे मामा-भाचीचा हा संबंध वैवाहिक नसून कौमार्यभंगाविषयीचें रूपक असावें असें वाटतें.

पुढे दिलेल्या गाण्यांत वयांत आलेल्या त्या मुलीला बहरूं पाहणाऱ्या लिंबाच्या शोभिवंत झाडाची अुपमा दिलेली असून ऋतुप्राप्तीच्या प्रसंगाचें वर्णन रूपकात्मक दिलेलें आढळतें.

(१) आमा गडगडे आभावरी
पाअुस पडतो रोयणीचा[४]

---

१ हे विधि आफ्रिकेंत व दक्षिण समुद्रांत सर्वत्र पाळले जातात; अुदाहरणार्थ, Junod, *Life of a South African Tribe, Baranga*, Vol. I, p. 71; Stayt, *The Bovenda* p. 106; Roscoe, *The Bakitara* p. 175, *Banyankola*, p. 117; Talbot, *The Tribes of the Niger Delta*, p. 175; Lindblom, *The Akamba*. pp. 39, 42, 71; Ruth Benedict, *Patterns of Culture*, pp. 25 ff.

२ लिंगायतांतील शिवालयांत जाअून तेथील विशिष्ट धारेच्या दगडाने कौमार्यभंग करण्याची पद्धत Barbose ह्याने The Book of Duert Barbose, Vol. I pp. 221-223 ह्या ग्रंथांत वर्णन केली आहे. रोमन लोकांत म्यूटिनस ह्या देवाच्या मांडीवर बसवून नवऱ्या मुलीचा कौमार्यभंग करीत असत. सामोआ बेटांत कौमार्यभंग लाकडाच्या दांड्याने करतात. आफ्रिकेंत नीग्रो लोकांत मुख्य अुपाध्याय मुलीचा कौमार्यभंग करतो; अुदा० - Ploss and Bartells, Woman II p. 40. Rivers, Psychology and Ethnology pp. 71ff.

३ Thurston, Castes and Tribes of Southern India, Vol. IV, मुलीचें आजोबाबरोबर लग्न (पृ. १७९), मुलीचें पड्याबरोबर लग्न (पृ. ४४२).

४ रोहिणी नक्षत्रांत आकाशांत ढग दाट भरून पाअूस येण्यास सुरवात होते.

आला पाऊस मीरगाचा[1]
थेंब पडतो मोतीयाचा
काळ्या काढाव्या तोरणीच्या
लिंब जातो तो कुंवाराचा[2]
लिंब गेला तो मावळयाच्या मांडीवर
कधी लिंबा तूं रे जाशी
कुठे लिंबा तूं रे रहाशी
लिंब राहिल नअिच्या ओरावर
लिंब गेला तो कुंवाराचा

(२) आमाळ गडगडलं[3] भाअूजी (भाअुजयी)
मेघाचं वर्षलं ग भाअूजी
नदीला पूर[4] गेला ग भाअूजी
भुजंग[5] वावला ग भाअूजी
कालानं[6] फाडला ग भाअूजी
पक्ष्यानं[7] पाहिला ग भाअूजी
गगनीं पक्ष्या पिडे ग भाअूजी
अशी गडवडा पोलला ग भाअूजी
टोंचींत अुचलला ग भाअूजी
घरट्यावरी गेला ग भाअूजी

(३) तेव्हा मातेने शोक मांडिला[8]
नारदाने तेव्हा अिचार केला
सर्व देवांना सांगूं लागला

१ मृग नक्षत्रांत देखील पावसाच्या सरी प्रारंभींच्या असून थेंब मोठे व टपोरे असतात. ऋतुप्राप्तीच्या प्रसंगाला पावसाच्या प्रारंभींची दिलेली अुपमा सूचक आहे.

२ कुंवार म्हणजे ऋतुप्राप्ति— विशेषतः कुमारिकेच्या बाबतींत.

३ मेघगर्जनेचा व ऋतुप्राप्तीचा संबंध असा की गडगडाट जसा पावसाळ्याचा आरंभ सूचित करतो. त्याप्रमाणे ऋतुप्राप्ति यौवनाचा आरंभ सूचित करते. दोन्ही गोष्टी मानवी मनोवृत्तींत खळबळाट घडवून आणतात.

४ नदीला पूर येणें म्हणजेच गर्भाशयाची पूर्ण वाढ होअून त्यांतून रजःस्राव होणें.

५ रजःस्रावालाच भुजंगाची अुपमा दिलेली आहे.

६ 'काल' ह्या शब्दावर श्लेष आहे. काल म्हणजे कालमान ह्या अर्थी घेतलें तर गर्भाशय पक्व होण्यास लागतो तो अवधि असें समजण्यास हरकत नाही. 'काल' म्हणजे 'शत्रु', 'पीडा करणारा' ह्या अर्थी घेतल्यास कौमार्यभंग ध्वनित होतो.

७ पक्षी म्हणजे गरुड पक्षी. त्याचें व भुजंगाच हाडवैर. काव्यांत अर्थात हें वैर केवळ अलंकारिक आहे. पक्षी म्हणजे पुरुष. स्त्रीने यौवनांत पदार्पण केल्यानंतर ती पुरुषाच्या मनांत अस्वस्थता निर्माण करते. तिचा अुपभोग हेंच काय तें त्याच्या मनास शांति देअूं शकतें. ह्या ओळींत कौमार्यभंग सूचित केला आहे.

८ हें गाणें अपूर्ण व कांही ठिकाणीं क्लिष्ट वाटलें तरी मागील गाण्याच्या नंतरचें आहे. ह्यांत गर्भसंभवाबद्दल रूपक आहे. 'मातेचा शोक' कशाला अनुलक्षून म्हटलें आहे तें कळत नाही: कदाचित् कौमार्यभंगाच्या वेळीं स्त्रीला झालेल्या वेदनांचें प्रतीक असूं शकेल; कारण पुढे जें 'पाप' म्हटलें आहे तें त्यासंबंधीच असावें असें वाटतें. गर्भसंभवाने तें पाप नष्ट होतें.

शंकराने अिग्रा तेव्हा काढला
बाण जोडुनी समुद्र केला
समुद्रांत अेक मासा सोडिला
सर्व देवांचा पाप फिटला
कोठच्या देवाला पाप राहिला
पाप राहीला अिचारतों तुला
देवमासा[1] म्हनतात त्याला
अिचार करून मगर झाला
मगराचा वेद[2] करतो त्या वेला
त्या परमान चार वेद केलेल्या वेला
चार वेचाच्या चार वेला
कुणब्याच्या बाळानं अिचार केला
कुणब्याच्या बाळानं बोंदास[3] केला
तेव्हा बाळांनी अिचार केला
तेव्हा बाळांनी मासा अुचलिला
(४) सोन्याचा नांगर रुप्याचा फाळ
कुणब्याच्या बाळांनी अिचार केला
पाचव्या तासांत लिंबी पेरली
लिंबी पेरली अेकपानी झाली
अेकपानी झाली दोनपानी झाली
दोनपानी झाली तीनपानी झाली
तीनपानी झाली चारपानी झाली
पांचव्या पानास रंगरूपा आली
तेव्हा लिंबाला तिढा[4] चढली
शीण चढली मांडवा विस्तारली
तेव्हा ती लिंबी फुलूं लागली
तेव्हा ती लिंबी पाना धरली
तअिं मीं हाती परडी धरली
तेव्हा लिंबा हीं काढूं लागलीं
बाजारामंदीं विकाया गेलीं

---

१ गर्भाला देवमाशाची अुपमा दिली आहे. २ वेद म्हणजे 'वेध' किंवा 'वेद'. 'मगराचा वेद' काल्पनिक आहे. पारध मात्र वास्तविक आहे. पण मगराच्या वेधाचा संबंध ह्या गाण्यांत चांगल्या तऱ्हेने स्पष्ट होत नाही.

३ मासे पकडण्याचें जाळें. हें गाणें कुणब्याचें असल्यामुळे कुणब्याच्या मुलाची महती अधिक गाअीली आहे. ह्या गाण्यांत कोंकणी कुणब्याच्या सृष्ट्युत्पत्तीबद्दलच्या आणि माणसाच्या जन्माबद्दलच्या कांही कल्पना प्रतिबिंबित झाल्या असून सृष्टीच्या रचनेंत कुणब्याचें महत्त्व अधिक स्पष्ट केलें आहे.

४ तिढा या शब्दावर श्लेष आहे. तिढा म्हणजे झाडाला आधार देण्याकरिता काठी बांधतात ती. आणि 'तिढा' म्हणजे ओटीपोटांतील वेदना (किंवा वेणा).

# मराठींतील समुदायवाचक अंक

(लेखक– श्री. गोविंद कृष्ण मोडक)

(१) **प्रस्ताव**— या विषयावर रा. विठ्ठल गणेश ताम्हणकर यांनी साहित्य-पत्रिकेच्या अंक ६१ मध्ये लेख लिहिला आहे. यांचा अंकविषयक अभ्यास त्यांच्या लिहिण्याप्रमाणे दीर्घ-कालीन आहे. अर्थात् त्यांचा प्रस्तुत लेख विशेष प्रशस्य व संमननीय असाच असला पाहिजे. तरी पण त्यांस भूषण आहे की या विषयावर ते अुद्बोधक चर्चा मागवितात. यावरून त्यांचें मत या विषयावरील अंतिम निश्चय असूं शकत नाही हें त्यांनी सविनय सुचविलें आहे. या सूचनेवरून मी पुढे चर्चा लिहीत आहें; मात्र ती अुद्बोधक कीं अन्यथा आहे हें वाचकच ठरवितील.

(२) **समुदायवाचक अंक** म्हणजे काय ?– याचा अर्थ प्रथम विशद करणें अवश्य आहे. हें केल्याने वाचकांचा अप-समज बराच कमी होअील. चार मुलगे, तीस मुली, यांचा अर्थ संस्कृतांत (१) चत्वारः कुमाराः। (२) त्रिंशत् कुमार्यः। असा व्यक्त केला जातो. यांच्या स्थानीं क्रमाने (३) कुमाराणां चतुष्कं, चतुष्टयं (४) कुमारीणां त्रिंशत्। असेंहि म्हणतां येतें. यांत १ मध्ये समुदायाचा बोध नाही; व्यक्ति पृथक् गणल्या आहेत. अितर तिन्ही ठिकाणीं समुदायाचा बोध आहे. त्यांत अंक ४ मध्ये समुदाय स्पष्ट बोधित होतो. अंक ३ मध्येहि तो बोधित होतो. पण यांतील चतुष्क किंवा चतुष्टय हे साक्षात् संख्यावाचक शब्द नसून त्यावरून बनलेले **साधित** शब्द आहेत. अंक २ मध्ये समुदाय या कल्पनेला महत्त्व नाही. त्रिंशत् हा शब्द केवळ समानाधिकरण म्हणून विशेषणादाखल आला आहे. यावरून काय सिद्ध होतें ?

समुदायवाचक अंक तो होय जो (घटकीभूत-) वस्तुवाचक नामाच्या अनेकवचनाच्या **षष्ठीनंतर** येअूं शकतो आणि अशा ठिकाणीं कोणतेंहि वचन घेअूं शकतो; जसें– कुमारीणां त्रिंशतौ (= साठ मुली), कुमारीणां त्रिंशद्भिः (= नव्वद मुलींनी). यावरून जाणावें की समुदायवाचक संख्याशब्द कोणत्याहि वचनांत येतो,– मात्र तो वस्तूच्या षष्ठीनंतर. अेकवचनांत योजिल्यास तो पूर्वीहि येअूं शकतो. येथील सर्व अुदाहरणांचे प्रकार पुढील ओळींत ग्रथित आहेत—

**सरितां शतं, शते वा, शतानि** अपि, स्यात् अथो **शतं सरितः**।

यांचा अर्थ क्रमाने शंभर नद्या, दोनशें नद्या, तीनशें नद्या, शंभर नद्या असा आहे.

(३) **पृथक् शब्दांचें महत्त्व**— संख्यावाचक शब्द (१) कितीहि व्यक्ति आणि (२) तद्-घटित समुदाय यांचा बोध करण्यास वेगवेगळे असल्यास, तें भाषेच्या प्रगल्भतेचें लक्षण आहे, असें लेखक म्हणतात. पण या कसोटीस अिंग्रजी किंवा संस्कृत यांतील कोणीच अुतरत नाही. संस्कृतांत अेकपासून नवदशन्पर्यंत संख्याशब्द पृथक् व्यक्तींचाच बोध करितात म्ह० **व्यष्टिबोधक** आहेत; आणि विंशतिपासून पुढील सर्व शब्द समुदायबोधक किंवा **समष्टिबोधक** आहेत. पंक्ति (=१०), मनु (=१४), अग्नि (=३) अित्यादि अनेक शब्द लक्षणेनेच समुदाय बोधितात. अर्थात् यांस संख्या-शब्द म्हणतां यावयाचें नाही. तत्कृत संख्याबोधन गौणच होय.

अिंग्रजीमध्ये पाहतां बारा या संख्येचा बोध twelve या व्यष्टिवाचक आणि dozen या समष्टिवाचक शब्दाने होतो. Hundred याचा अुपयोग द्विविध आणि score चा समष्टि-बोधक आढळतो. A score of runs, two hundreds of men या शब्दप्रयोगांत यांचें समुदायवाचकत्व स्पष्ट होतें. या शब्द प्रयोगांत of चा अुपयोग आहे. Twelve पुढे of योजीत नाहीत. **सारांश**– समुदायवाचक संख्येपुढे of येणें ही गोष्ट 'सरितां शतं' यांतील षष्ठीच्या अुपयोगास संवादी अशीच आहे. या दृष्टीने अिंग्रजींतहि वस्तूंची व्यष्टि व समष्टि सूचित करण्यास वेगवेगळे शब्द फारसे आढळणार नाहीत. नांवाजलेल्या संस्कृत व अिंग्रजी या भाषांची ही स्थिति असल्यामुळे, वरील भिन्न-भिन्न कार्यास मराठींत वेगवेगळे शब्द नाहीत म्हणून आपण खेद करण्याचें कारण नाही;– मात्र असे वेगवेगळे शब्द आढळल्यास त्यांत आनंदच होअील.

(४) **पाढ्यांची साक्ष**— अंकांचे समुदायवाचक या नात्याने अुपयोग ठरविण्यास पाढेहि विशेष अुपयोगी नाहीत. पाढे घोकण्याचा व तोंडपाठ करण्याचा विषय असल्यामुळे, त्यांतील शब्दयोजना फारच हात राखून करण्यांत येते. 'साती आठी छप्पन' याने 'सात आठ वेळां घेतल्यास छप्पन होतात' हा **अर्थ** अुक्त होत नसून केवळ **सूचित** होतो. अर्थात् त्यांत आपली कसोटी 'वस्तुवाचक नामाच्या षष्ठीचा अुपयोग' ही मुळींच आढळणार नाही. 'हें वातींचें अकरें कोणीं मोजिलें?' या वाक्यांत समुदायास आवश्यक असलेली अेकत्वाची कल्पना चार प्रकारांनी प्रकटली आहे. वाती अकरा म्हणजे अनेक असल्या तरी त्यांचा **समुदाय अेकच** असणार. हें अेकत्व (१) **हें वातींचें अकरें मोजिलें** या चार शब्दांच्या अेकवचनानें दर्शित होतें. (२) वस्तूच्या षष्ठीप्रमाणे सर्वनामाचें व (३) क्रियापदाचें अेकवचन यांनीहि समुदाय सूचित होतो. (४) स्वतः संख्यावाचक शब्दाचें अेकवचनहि हेंच कार्य करितें. पण यांपैकी कोणत्याच प्रकारास पाढ्यांच्या रचनेंत स्थान नसल्याने पाढ्यांची साक्ष या संबंधांत व्यर्थ होय. 'सत्तावीस अट्ठे सोळेदोन' यांत सोळाच्या पुढे अुत्तर शब्द नाही किंवा दोनच्यापुढे शें नाही. 'सोळोत्तर-दोनशे' अशी यथासांग रचना यांत आढळत नाही. **संक्षेपप्रधानता** हीच पाढ्यांत सर्वत्र आढळून येते. सप्तन्, अष्टन् यांपासून प्रथम सत्त, अठ्ठ व नंतर सात, आठ अशीं रूपें बनली आहेत. यांचे अंत्यस्वर पाढ्यांत बदलतात ते केवळ पाठसौकर्यासाठी. त्यांत समुदाय-बोधकत्व अथवा दुसरें अेखादें अेकच तत्त्व आहे असें म्हणणें कठीण आहे. 'चार दुणे आठ, चार त्रिक बारा, चारा पंचे वीस' यांचे क्रमाने अर्थ चार **द्विगुण** केल्याने आठ होतात, चार **त्रिकुटें** घेतल्यास बारा संख्या होते, चार **पांच** वेळां घेतल्यास वीस होतात. येथे दुणे हें सामान्य विशेषण आहें, त्रिक हें समुदायनाम आहे, पंचे हें व्यष्टिवाचक संख्याविशेषण आहे. अशा रीतीने पाढ्यांमध्ये त्या-त्या ठिकाणीं सोअीवार पडली ती-तीं घटना करण्यांत आली आहे. त्यांत अेकच तत्त्व पाहूं जाणें फुकट आहे.

(५) **व्युत्पत्ति व व्यवहार**— पंचा, सत्ता, अट्ठा अित्यादि शब्दसमुदायनामें ठर-विण्यासाठी लेखकाने वररुचिप्रभृति पुराण्या लेखकांचा आश्रय घेतला आहे. पण हा आश्रय येथे व्यर्थ आहे. सत्ता हा शब्द समुदायवाचक म्हणून जरी वेळीं व्युत्पत्तीने ठरविला तरी 'घोड्यांचा अेक सत्ता, घोड्यांचे दोन सत्ते' असे प्रयोग जोंपर्यंत भाषा करीत नाही, तोंपर्यंत येथील व्युत्पत्तीला ती शुद्ध मानिली तरी व्यवहारांत लवमात्र किंमत नाही. वस्तुतः दहा तसेंच हे शब्द सप्तक अित्यादिक क-प्रत्ययान्तापासून आलेच नाहीत; तसे येते तर मुळांचे अर्थानुसार (अवताराणां दशकं) अवतारांचा दहा (अेकवचनी) असा प्रयोग होता. पण तसा होत नसल्याने

हे शब्द समुदायवाचकापासून आले नाहीत हें अुघड आहे. शिवाय, **अन्य** (दुसरा) या सर्वनामाचेंच रूपान्तर **आणि** असें झालें आहे. पण **आणि** हें **सर्वनाम नसून अव्यय** आहे. अर्थात् व्याकरणांत व्युत्पत्तीला कोण विचारणार? व्युत्पत्तीनुसार 'दुसरा देश' अशा अर्थी 'आणि गांव' असा प्रयोग कोणींहि करणार नाही; कोणीं केल्यास तो मान्य होणार नाही.

**(६) अपुष्ट विधान—** छत्तिसाशे, अैसा-शे, शाण्णवा-शे अित्यादि ठिकाणीं छत्तिसा, अैसा, शाण्णवा हे समुदायवाचक शब्द आहेत असें लेखक म्हणतात. यास काय प्रमाण? 'फुलांचा अेक अैसा', 'फळांचे दोन शाण्णवे' अशीं अुदाहरणें जोपर्यंत मिळत नाहीत तोपर्यंत हे छत्तिसा अित्यादि शब्द समुदायवाचक ठरत नाहीत. हींच स्थिति दहा-ची होय.

**(७) नियम व अुदाहरण यांचा विसंवाद—** '१ ते १८ अंकांच्या समुदायवाचक नामानंतर **अुद्र** या शब्दाचा अुपयोग केला जातो; जसें—पंचोदरशे,...विसाशे...चोविसाशे—' येथील कांही अुदाहरणांत अुदर हा शब्द मुळींच आढळत नाही. या व अन्य रीतींनी नियमाशीं अुदाहरणांचा मेळ नसणें अथवा अुदाहरणेंच कमी असणें किंवा मुळींच नसणें हा दोष वरील लेखांत वारंवार आढळतो. 'अकारान्त संख्यावाचक नामांचीं समुदायवाचक रूपें आकारान्त होतात' असा नियम लेखकानें दिला आहे. याचीं समर्थक अुदाहरणें लेखकानें दिलीं नाहीत. त्रीक, चोक, छक या शब्दांचीं अनेकवचनें क्रमानें त्रिका, चोका, छका अशीं होतात ही लेखकाची विवक्षा आहे काय? विधानाचें समर्थन भरपूर अुदाहरणांनीं करणें यांत लेखकाची कसूर झालेली दिसते. असेंच आकारान्ताचें अनेकवचन अेकारान्त होतें, या म्हणण्याचें अुपपादन सत्ता, सत्ते; अठ्ठा, अठ्ठे अशा अुदाहरणांनी होतें, असा लेखकाचा आशय आहे काय? या द्विविध रूपांचीं अुदाहरणें लेखकानें देणें अवश्य होतें; तसें होतें तर वाचक वरील प्रकारच्या शंकांच्या जाळ्यांत पडते ना.

**(८) साध्याची असिद्धि—** लेखाच्या अन्ताकडे लेखक म्हणतात, 'व्यवहारांत समुदायवाचक संख्या-शब्द स्वतंत्र आहेत;' अेवढेंच नव्हे, तर मला वाटतें, अेकपासून शंभरापर्यन्त समुदायवाचक संख्या-शब्द मराठींत व्यवहारांत आहेत.' यावरून प्रस्तुत लेखानें हा सिद्धान्त सिद्ध झाला आहे असें त्यांस वाटतेंसें दिसतें. मी त्यांना अेवढीच विनंती करतों की '(घटक-बोधक) नामाच्या अनेकवचनी षष्ठीच्या पुढे ज्या संख्यावाचक नामाचा अेकवचनांत प्रयोग होअील तेंच **समुदायवाचक** संख्यानाम समजावें.' 'त्याची (वयाच्या **वर्षांची**) बहात्तरी अुलटली' या ठिकाणीं बहात्तरी हें समुदायनाम आहे. पण या धर्तीवर केलेला 'वर्षांची अैशी' असा प्रयोग कानांस बोचतो. अर्थात् तो मराठीस संमत नाही. बहात्तर, अैशी यांचीं मुळें संस्कृतात जरी समुदायवाचक आहेत तरी मराठी भाषा अैशी, बहात्तर यांस समुदायवाचक नामें म्हणून योजीत नाही. मराठीनें समुदायवाचक प्रत्यय स्वतःसाठी (दस्य असा) **अी** हा स्वतंत्र कल्पिला आहे. शंभर या व्यष्टिवाचक नामावरून शंभरी हें नाम मराठींत झालें आहे. विशी, तिशी, चाळिशी, पन्नाशी, साठी, सत्तरी अित्यादि शब्दच समुदायार्थक आहेत. पण अैशींमध्ये अी हा प्रत्यय लाविला तरी तो **दृश्य** होत नाही; म्हणूनच अैशी ला समुदायबोधकत्व नाही. तें कालांतरानें रूढींत आल्यासच त्याचाहि अुपयोग शास्त्रमान्य होअील.

**सारांश—** समष्टिवाचक म्हणून संख्या-शब्दांची चर्चा व्युत्पत्तीवर अधिष्ठित न करतां, ती व्यवहारावरच आधारावी. अेवढें लिहून आणि प्रस्तुत अुपयुक्त विषयाच्या चर्चेस तोंड पाडल्याबद्दल रा. ताम्हणकर यांचे आभार मानून आपला निरोप घेतों.

---

# लिपिसुधारसमितीचे विचारार्थ

(लेखक— श्री. गोविंद कृष्ण मोडक)

साहित्य-पत्रिकेच्या अंक ६१ मध्ये या समितीचे निर्णय दिले आहेत. त्यासंबंधांत पुढील गोष्टी मी या समितीपुढे मांडूं अिच्छितों.

सामान्यतः अक्षर हें व्यंजनाचें कुटुंब होय. कुटुंबनायकाचें स्थान प्रायः पोष्यजनांच्या मध्ये असतें. घराचें दारसुद्धा भिंतींत मध्यभागीं असून, त्यांतून प्रवेशल्यावर मनुष्यास डावी-अुजवीकडे जातां येतें. या साम्यानें पाहतां अक्षराची वाढ व्यंजनाच्या केवळ अुजव्याच बाजूस असावी हें म्हणणें अत्याग्रही दिसतें. शिवाय या पद्धतीमध्येहि अेकार, औकार अित्यादि दर्शविण्यास अक्षराची वाढ (जशी अुजवीकडे तशी) वरहि करावीच लागते. अर्थात् अुच्चारक्रम हे समितीने स्वीकृत मूर्धन्य तत्त्व मात्रांच्या लेखनांत पाळलें जात नाही. अर्थात् मात्रांपुरती या तत्त्वास मुरड पडत आहेच. अशीच मुरड अिकारासंबंधांतहि घालून कि, की, खि, खी, अित्यादि अक्षरें पूर्वागत पद्धतीनुसारच लिहावीं, हें समितीचें म्हणणें सर्वथा स्वीकार्य आहे.

अंक ५ मध्ये म्हटलें आहे— 'अनुस्वार व अनुनासिक यांकरिता केवळ अनुस्वारच ठेवावा' हें अनुसरल्यास संवत्सर आणि संवय या दोन्ही शब्दांतील नासिक्य अुच्चाराचा भेद कसा कळणार? या दोन्ही शब्दांत अुच्चारभेद नाही असें समितीचें म्हणणें आहे काय?

अंक ९— प्रत्येक वर्गातील दुसऱ्या व चौथ्या अक्षरांकरिता क्रमानें पहिल्या व तिसऱ्या अक्षरास ह् जोडावा— जसें ध्-बद्दल द्ह्— असें रा. लक्षणस्वरूप म्हणतात. हें पत्करिल्यास सद्ध्वानम् या लेखाचे घटक सध्वानम् की सद्ह्वानम्? हा संदेह अुत्पन्न होणार.

अंक १३— 'संयोजक चिन्ह मागील अक्षरास जोडून असावें; जसें— विठ-ठल, उड-डाण.' ही रीत स्वीकारल्यास (क) मदरागः आणि मद्रागः या दोहोंचें लेखन मद-रागः असें अेकच होअील; कारण, समासावयवांत स्पष्टतेसाठी संयोगचिन्ह घालणें वारंवार अिष्ट असतें. शिवाय (ख) पहिल्या शब्दांत जोडाक्षराचा पहिला घटक ठ् असणें शक्य आहे काय?

अंक ७— 'पूर्णविरामाचें चिन्ह दंड असावा.', या दंडाची योजना पद्यचरणांत तर नेहमी होते. पूर्णविरामस्थानींहि दंड योजिल्यास तें वाक्य पद्यभाग मानलें जाण्याचा संभव आहे.

अंक ६— दंततालव्य च् यांच्या खालीं टिंब दिल्यास त्या च ला जरूर पडल्यास अुकार कोठे जोडावा?

अंक ५— 'जेथे प्रतिकूलता नसेल तेथे अनुस्वारच लिहावा.' या वाक्यांत अनु-स्वाराचा प्रसंग सांगणारी भाषा फारच शिथिल आहे. अशी शिथिलता शास्त्रीय भाषेंत राहूं देणें योग्य नाही.

परिशिष्ट १— 'रेफ-चिन्हाच्या ठिकाणीं कांही शब्दांत सुऱ्यास या शब्दांतल्याप्रमाणे लेखन करावें. यांतील भाषाहि वरच्याप्रमाणे पोकळ आहे.

अंक १३— 'संयोजक चिन्ह मागील अक्षरास जोडून असावें; जसें विठ-ठल.' येथे मागील (म्हणजे पहिला) ठ अक्षर आहे कीं व्यंजन आहे?

याप्रमाणे समितीच्या विचारासाठी येथे शंका मांडल्या आहेत;— हेतु हा की याचा विचार होअून नियमांची भाषा संदेहरहित, रेखीव आणि सर्वथा शास्त्रीय अशी व्हावी.

---

अनुक्रमणिका

# जुन्या कागद-पत्रांतील ७४॥



(लेखक— श्री. ना. गो. चापेकर)

पटवर्धनांचे जमाखर्च पाहत असतां खतावणींतील प्रत्येक खात्याच्या आरंभीं त्याचप्रमाणे रोजनाम्यांत प्रत्येक नवीन दिवसाच्या जमाखर्चाला आरंभ करतांना ७४॥ आंकडा घातलेला आढळला. तेव्हा हा आंकडा कशाकरिता घालतात; तो कशाचा द्योतक आहे; श्रीप्रमाणे मांगल्यार्थी त्याचा अुपयोग करतात कीं काय अित्यादि अनेक प्रश्न अुद्भवूं लागले. त्यांचीं समाधानकारक अुत्तरें मला अद्यापि मिळालीं नाहीत. तथापि शोधाअंतीं दुसऱ्याहि अनेक गोष्टी समजल्या.

नागपुरास ७४॥ च्यां अैवजीं ७४॥= लिहिण्याचा प्रघात असल्याचें समजलें. त्यानंतर वाअीचे शंकरराव वैद्य यांच्या वह्यांत निराळेच आंकडे मीं पाहिले. अु० ४२; ४७; ७२; ७४. अेवढेंच नव्हे तर अेकाच वहींत ७२, ७४ असे निरनिराळे आंकडे असल्याचें आढळलें. वैद्यांच्या वहींत या आंकड्यांच्या मागे व पुढे बहुधा अुभ्या रेघा काढल्या असल्याचें दृष्टोत्पत्तीस आलें. अु० ॥४२॥; ॥७४॥; ॥४७॥; ॥७२॥. बहुधा म्हणण्याचें कारण अेके ठिकाणीं रेघांशिवाय ७४ आंकडा घातलेला आढळला.

वैद्यांच्या वह्यांतील ह्या प्रकारच्या लिहिण्यावरून असा संशय येतो की, पटवर्धनी वह्यांतील आंकडा ७४॥ नसून ७४ च आहे. आंकड्याच्या मागील अुभ्या रेघा पटवर्धनी वह्यांत गाळलेल्या दिसतात. ७४ हा अंक पत्रांच्या आरंभीं लिहिण्याची वहिवाट अुत्तर हिंदुस्थानांत असल्याचें क्रूक साहेबानें आपल्या ग्रंथांत नमूद केलें आहे. त्याचप्रमाणे मला असें सांगण्यांत आलें की, गुजराथेंत पत्रिकेच्या आरंभीं ७४ आंकडा घालीत असत. वैद्यांच्या वहींत अेके ठिकाणीं ४७ आंकड्याच्या पुढे दोन रेघा असून मागल्या रेघा गाळल्या आहेत. पटवर्धनांच्या वह्यांतून ह्याचप्रमाणे आरंभींच्या रेघा गाळलेल्या असाव्यात. सारांश, आंकडा निश्चित करतांना अुभ्या रेघा विचारांत घेअूं नयेत असें म्हणतां येअील. आणि असें करून ७४ आंकडा निश्चित केला तरी वैद्यांच्या वह्यांत ४२;४७;७२ व ७४ असे निरनिराळे आंकडे कां यावे हें गूढ अुकलत नाही.

कित्येकांच्या मतें ७४॥ हा आंकडा श्रीचेंच लिहितां लिहितां झालेलें रूपांतर आहे. श्रीकाराचें विकृत स्वरूप म्हणजे ७४॥ चा आंकडा हें मला पटत नाही. ह्याचें मुख्य कारण असें की श्रीकार असूनहि ७४॥ हा आंकडा काढलेला असतो. शिवाय श्रीकाराची व या आंकड्याची जागा निराळी आहे; जसें:— ७४॥ खातें त्रिंबक नाईक गडकरी.

दुसरे कित्येक खुलासा करतात तो असाः सोमनाथ पाटण येथे गझनीच्या महंमुदाने स्वारी केली त्या वेळीं ७४॥ मण वजनाचीं यज्ञोपवीतें धारण करणाऱ्या ब्राह्मणाची कत्तल केली त्याचे स्मरणार्थ हा आंकडा लिहिण्याचा परिपाठ आहे.

अनुक्रमणिका

क्रूक साहेबाने या आंकड्याचें वेगळेंच स्पष्टीकरण केलें आहे. चितोडच्या वेढ्यांत मेलेल्या रजपुतांच्या अंगावरील सोन्याच्या दागिन्यांचें ७४ मण वजन भरलें. तो हा आंकडा आहे.

Hindoos head their letters with the figures 74 of which not very probable explanation is that they represent the weight in maunds of the gold ornaments taken from the Rajput dead at the famous siege of Chithor — Folklore of Northern India by W. Crooke Vol. II, page 39.

अशाचसारखें पण याहून थोडें भिन्न दुसरें स्पष्टीकरण येणेंप्रमाणे:— रजपूत स्त्रियांनी अब्रू राखण्याकरिता आपणांस जाळून घेतलें. तेव्हा त्यांच्या राखेचें वजन अेवढें भरलें. त्या वेळे-पासून रजपुतांनी शपथ घेअून हा आंकडा लिहिण्याचा प्रघात पाडला आहे. वरील आख्यायिका अेका हिंदी अितिहासाच्या पुस्तकांत दिली असल्याचें समजतें.

अेका गुजराने जें स्पष्टीकरण सुचविलें तें मला सर्वांत ग्राह्य वाटतें. त्याच्या म्हणण्या-प्रमाणे सात म्हणजे सतद्वीपा वसुंधरा आणि चार म्हणजे चार वेद. सर्व जगाची व वेदांची शपथ घेऊन जमाखर्च लिहीत आहें असें ७४ ह्या आंकड्याने ध्वनित केलें जातें. सारांश, ७४ आंकडा लिहिणें ही अेक प्रकारची शपथ आहे. ज्याने मला हा अर्थ सांगितला तो त्याच्या पदरचा नव्हता. वृद्धांच्या तोंडून अैकलेलें त्याने सांगितलें. हें खरें मानलें तर वैद्यांच्या वह्यांत ४२; ७२ ह्या आंकड्यांतील २ चा अर्थ काय करावयाचा हा प्रश्न अुद्भवतो. मला वाटतें २ ह्या आंकड्याने सूर्यचन्द्र समजावे. २; ४; ७ हे आंकडे पुढे मागे घालून कसेंहि लिहिलें तरी अर्थ अेकच. मात्र ह्या तीन आंकड्यांपैकी कोणते तरी दोन लिहिण्याचा प्रघात दिसतो.

सारांश, निश्चित आंकडा कोणता हें अद्यापि संशयावस्थेंत आहे. यासंबंधी कोणास निश्चित माहिती असल्यास ती समजावी या हेतूने हा लेख लिहिला आहे.

क्रूकचा अुतारा येणेंप्रमाणे :—

प्राचीन युरोपियन अितिहासांत ७४ आंकडा प्रसिद्ध आहे त्याची येथे आठवण होते. स्वातंत्र्यासाठी स्पार्टयाकसला बलाढ्य अशा रोम साम्राज्याशीं जेव्हा लढावें लागलें तेव्हा त्याला साहाय्य करणारे फक्त चवऱ्याहत्तर अिसम होते. ह्या ७४ गुलामांनी रोमन सैन्याशीं टक्कर देअून तीन वर्षें तरी स्वातंत्र्य अुपभोगिलें. अि. स. पूर्व ७३ सालचा हा अितिहास आहे. स्पार्टयाकस हा थ्रेतच रहिवाशी असून रोममध्ये गुलाम म्हणून गेला होता.

# जेथे देखें तेथे उभा....



(लेखक– श्री. त्र्यं. गो. ढवळे)

हिंदी पुराणांतल्या ज्या कित्येक अद्‌भुतरम्य कथांचा परिचय घरोघरीं लहानथोरांना झालेला असल्याचें आपण पाहतों त्यांतलीच अेक कथा प्रल्हाद-हिरण्यकशिपूची आहे. आतापर्यंत आपण बहुधा प्रल्हादाच्या अेकनिष्ठ अंधश्रद्धेचेंच कौतुक मुक्तकंठाने करीत आलों आहोंत; पण ज्ञानसंपादनाच्या– विशेषतः शास्त्रीय ज्ञानसंपादनाच्या– मार्गावरचीं बहुतेक सर्व पावलें आपल्याला हिरण्यकशिपूच्या चालीनेच टाकावीं लागलेलीं आहेत.

असाच अेक हिरण्यकशिपूचा अवतार अगदी अलीकडे, विसाव्या शतकाच्या आरंभीं, भौतिक शास्त्राच्या अेका लहानशा दालनांत सुरू झालेला आहे. या अवताराचें कार्य कोणा अेका विवक्षित व्यक्तीच्या द्वारा चालू राहिलेलें नाही; तें प्रचंड, सामुदायिक स्वरूपाचें आहे. मधाचें पोवळें बांधलें जात असतांना शेकडो मधमाश्यांनी जसा दूरदूरच्या फुलांमधून थेंबाथेंबाने मध गोळा करून आणावा आणि कणशः, क्षणशः, आपापली सर्वांची कामगिरी अेकत्रित करून सर्वांच्या बुद्धिचातुर्याचा परिपाक म्हणून अेक सुंदरशी रचना तयार करावी, तसाच कांहीसा प्रकार येथेहि झालेला आहे. मात्र या गवेषणाचा विषय परमेश्वर हा नाही. येथील विषयाचें स्वरूप अगदी वेगळें, त्या मानाने फार मर्यादित, असें आहे. तरी देखील त्याचा व्याप, अेका अर्थी, साऱ्या विश्वाला कवळण्याअेवढा मोठा आहे. प्रयोगाअंतीं शास्त्रज्ञांना असें आढळलें आहे की अत्यंत वेधिष्ठ असें कांही तरी तेज आपल्या या पृथ्वीवर सर्वत्र वावरत आहे, त्या तेजःप्रवाहांत आपली पृथ्वी आणि आपण सतत नहात, डुंबत, राहिलों आहोंत. या तेजःकिरणांचा उगम दूरवर कोठे तरी, ताऱ्यांताऱ्यांमधल्या अवकाशांत, विश्वाच्या गाभाऱ्यांत, होत असून तेथून ते सर्वत्र फैलावत असावेत. 'आम्ही कांही असे तसे गांवठी असामी नाहीं, विश्वसंस्थेच्या गाभाऱ्यांत आमचा जन्म, अखिल विश्वांत आमचा संचार' असेंच जणू काय हे किरण शास्त्रज्ञांना बजावीत राहिले आहेत. म्हणूनच त्यांना **वैश्वकिरण** अशी संज्ञा शास्त्रज्ञांनी दिली आहे. या किरणांविषयीं कांही थोडीशी माहिती प्रस्तुत लेखांत द्यावयाचें योजिलें आहे.

केवळ रुपये-आणे-पैच्या मापेंत विचार करावयाचा म्हटल्यास आज तरी निदान या

---

१ शास्त्रीय परिभाषा-चर्चा-मंडळाच्या अेका बेठकींत प्रा. रा. ना. जोशी यांनी 'वैश्वकिरणां'वर अेक माहितीपूर्ण व्याख्यान दिलें होतें. त्यावरूनच प्रस्तुत लेख लिहिण्याची कल्पना सुचली.

लेखासाठी पुढील पुस्तकांचा अुपयोग करावा लागला आहे. (1) Cosmic Rays and, (2) Electrons, Protons, etc., by Millikan, (3) Nature of Cosmic Radiation by T. H. Johnson, (4) Cosmic Radiation.— P. M. S. Blackett, (5) मिलिकानचीं अेतद्विषयक कांही व्याख्यानें, लेख अि० अि०.

परिभाषा वगैरेसाठी प्रा. स. वि. आपटे यांचेहि आभार मानणें अुचित होअील.

वैश्वकिरणांचा कोणताहि व्यावहारिक अुपयोग आढळलेला नाही. मात्र त्यांच्यामुळे मानवी आलोकाचें क्षेत्र अत्यंत विस्तृत असें झालेलें आहे. रात्रींच्या निरभ्र आकाशांत लुकलुकणाऱ्या ताऱ्यांच्या प्रकाशांतून जेवढें तेज पृथ्वीवर येत असेल त्याच्या अेकसहस्रांश, किंवा सूर्यप्रकाशाच्या अेकमहापद्मांश, अेवढ्या अल्प प्रमाणांत हें तेज पृथ्वीवर वावरत असलेलें आढळतें. अशा रीतीने अून आणि प्रकाश यांच्या मानाने वैश्वकिरणांचें प्रमाण अल्प भासलें तरी त्यांची वेधकता मात्र अत्यंत मोठी असते. ज्ञात अशा सर्व प्रकारच्या किरणांमध्ये त्यांचा क्रमांक वेधकतेच्या बाबतींत पहिला म्हणूनच त्यांना वेधिष्ठ किरण म्हणतात. आपल्या शरीराच्या अेखाद्या भागाला टाचणी टोचली तर तिचें संवेदन आपल्याला चटकन होतें. टाचणीची टोच जाणवणारें अिंद्रिय जसें आपल्याला आहे तसें वैश्वकिरणांचे वेध जाणविणारें अिंद्रिय आपल्याला असतें तर शरीराच्या कोणत्या ना कोणत्या तरी भागांतून, आरपार, वैश्वकिरणरूपी सूक्ष्म, महावेधक बाणांचे वेध विपळागणिक निदान वीस तरी होत असल्याचें आपल्या प्रत्ययाला आलें असतें. असें अेखादें अिंद्रिय निसर्गतःच जरी आपल्याला मिळालेलें नसलें तरी शास्त्रज्ञांनी आता अशीं कांही बाह्य साधनें निर्माण केलीं आहेत की ज्यांच्या योगें वैश्वकिरणांची वेधकता मोजतां येते. अेवढेंच नव्हे तर विवक्षित ठिकाणामधून प्रत्येक विपळागणिक वैश्वकिरण किती वेळां सटकून निघून गेले हेंहि या साधनांच्या द्वारा मोजतां येतें, दिसूं शकतें.

हें ज्ञान कसें होअूं शकतें ही गोष्ट ध्यानांत येण्यासाठी आजकाल पुण्यामुंबअींतून शत्रूचा वैयानिक हल्ला होअूं नये म्हणून जें प्रकाशनियंत्रण आपण पाळतों त्याचेंच अेक लहानसें अुदाहरण देतां येण्याजोगें आहे. आपल्या घरीं जे विजेचे दिवे आपण वापरतों त्यांच्या बाबतींत सरकारची अपेक्षा आहे ती अशी की या दिव्याभोवती अेखाद्या धातूच्या पत्र्याचें, तगडाचें, पुष्टिपत्राचें, वा कागदाचें, आवरण अशा बेताने घातलेलें असावें की या आवरणाच्या आंतल्या दिव्याचा अुजेड त्या आवरणांतून आजूबाजूला बाहेर आलेला दिसतां कामा नये; प्रकाशाचा झोत फक्त अधोमुख, जमिनीकडेच जावा; अन्यतोमुख यत्किंचितहि प्रकाश दिसूं नये. आता समजा, आपला दिवा १५ ते २० दीप्तीचा—कँडल पॉवरचा—असला तर त्याच्यासाठी 'केसरी'सारख्या वर्तमानपत्राच्या ६-७ अेकेरी कागदांची चवड करून ती अेकत्रित, अेकावर अेक, डकवावी लागेल तेव्हा कोठे अेखादी समाधानकारक झापड बनवितां येअील. कागदांच्या चवडींतला अेकेक कागद कमी केला किंवा निराळ्या शब्दांत, झापडीची जाडी कमी केली— तर अधिकाधिक तीव्रतेने प्रकाश बाहेर येअील. अुलटपक्षीं, झापड तशीच ठेवून तिच्या आंत २५, ५०, ७५ दीप्तीचे दिवे ठेवले तरीहि अुत्तरोत्तर अधिकाधिक तीव्रतेचा प्रकाश बाहेर येअील. म्हणजे मग कागदाची— किंवा अितर कसलीहि सोअीस्कर अशी— झापड हें अेक प्रकाशाच्या वेधकपणाचें, तीव्रातीव्रतेचें, मापकच झालें. अशीच अेखादी झापड घेअून ती दिव्यावर न बसवितां वेधकपणाचें मापनलेखन करणाऱ्या अेखाद्या साधनाभोवती ठेवली आणि बाहेरच्या अंगाला दिवा ठेवला तर हीच माहिती सहज, अधिक सोअिस्करपणें, मिळेल हें अुघडच आहे.

असाच कांहीसा प्रकार शास्त्रज्ञांनी केला. त्यांना गेल्या शतकाच्या— म्हणजे १९ व्या शतकाच्या— अखेरीपासून युरेनियम्, थोरियम्, रेडियम्, अॅक्टिनम् अशांसारखीं अनेक प्रारक द्रव्यें— म्हणजे ज्यांच्या अंतरंगांतून अत्यंत प्रभावी अशा तेजाचें सतत अेकसारखें सर्वत्र विसारण होत आहे अशीं द्रव्यें— सांपडूं लागलीं. रेडियमचें नांव आता अनेकांनी अैकिलेलें आहे.

घड्याळाच्या तबकडीवरील आंकड्यांवर किंवा कांट्यांवर रेडियमचा थोडासा हात फिरविलेला असला म्हणजे ते अंधारांत चकाकत असलेले दिसतात हें आपल्यांपैकी अनेकांच्या परिचयाचें झालेलें आहे. हीं सर्व स्वयंप्रारक द्रव्यें म्हणजे निसर्गाने आपल्या हातीं दिलेले अल्लाउद्दीनाचे दिवेच ठरलेले आहेत. त्यांच्यापासून बाहेर पडणाऱ्या किरणांचे तीन प्रकार— (१) पीलुक (अल्फा–धन), (२) वीजुक (बीटा–ऋण), (३) गामुक (गामा–नेतिल)— सिद्ध झालेले आहेत. साधारणपणें पहिल्यापेक्षा दुसरे किरण शंभरपटीने वेधक असून त्यांच्याहि शंभरपट वेधक गामा किरण असतात. दोन अिंच जाडीच्या शिश्याच्या पत्र्यांतून देखील गामा किरण आरपार जाअू शकतात. 'गामुक'च ते !

ही जी या किरणांची वेधकता शास्त्रज्ञांनी अजमावली तिच्या मापनासाठी त्यांनी वापरलेलें साधन आपलें कार्य कसें करतें हें ध्यानांत येण्यासाठी अेक साधासा अनुभव प्रथम घेअून पाहावा. हिवाळ्यांत अेखाद्या दिवशीं थोडा वेळ आपल्या अुघड्या अंगाभोवती शाल लपेटून बसावें, आणि मग झटकन् ती काढून टाकावी. अशा वेळीं आपल्या छातीवर चार दोन जरा लांबसे केस असतील तर ते, शालजोडी काढून टाकतांच, थरारून पिंजारून ताठ अुभे राहिलेले दिसतील, आणि मग हळूहळू लुले होतील. शास्त्रज्ञांच्या भाषेत सांगावयाचें झाल्यास त्या केसांवर विजेचा अुचय झाला म्हणून ते ताठावले. पुढे भोवतालच्या हवेंतील वैजिक चोरांनी तो सुगावा लागून त्यांनी तो अुचय पळवून नेला, म्हणून केस पूर्ववत् अंगाशीं येअून बिलगले. हवेंतील या वैजिक चोरट्यांची गर्दी ज्या प्रमाणांत अधिक असेल त्या प्रमाणांत केसांचा अुचय नाहीसा होण्याचा झपाटाहि अधिक.

शास्त्रज्ञांनी या वैश्वकिरणांच्या वेधिकपणाच्या मापनासाठी कांहीशा अशाच प्रकारच्या युक्तिसाधनाचा अवलंब केला. त्यांनी निरनिराळ्या जाडीच्या शिश्याच्या पत्र्याच्या पेट्या बनविल्या. त्यांमध्ये काचेची हंडी अुपडी करून ठेवली. तिच्या शिरोभागांतून आंत हंडींत लटकणाऱ्या तांब्याच्या तारेला सोन्याचा अेक पातळ दुमडलेला पत्रा लटकावून दिला आणि हंडी तुस्तबंद करून टाकली. या पत्र्यावर विजेचा कांही निश्चित अुचय करून ठेवल्यावर ज्या प्रमाणांत त्या पत्र्याची मिटणूक झपाट्याने वा रेंगाळत होअील त्या मानाने त्या पत्र्याभोवताली वैजिक चोरट्यांची गर्दी अधिक वा कमी असेल. अशा रीतीने विजेचा अुचय कसकसा कमी होत जातो हे दाखविणाऱ्या या साधनाला वीजादर्श म्हणतात.

वर जीं तेजःप्रारक द्रव्यें म्हणून सांगितलीं तीं जवळपास कोठे ठेवलेलीं नसतांना, किंवा त्यांचा प्रभाव मारून टाकण्यासाठी भरपूर जाडीचा शिश्याचा पत्रा घेअून त्याच्या पेटींत वरील वीजादर्श ठेवला तरी देखील, विजेचा अुचय कमी होत असल्याचें शास्त्रज्ञांना आढळलें. याचा अर्थ असा की या पेटींत 'चोरटे' निर्माण झालेले होते, ते अुचय खाअून टाकीत होते. ज्यांच्यामुळे

---

१ पारायणी (अक्स) किरणांच्यासारखे वेधक किरण जेव्हा हवेंतून जातात तेव्हा हवेच्या रेणूंचें विदलन होतें. अेकेक रेणु दुभंगून त्याचीं दोन दलें–, हरभऱ्याच्या दाण्याच्या दोन डाळिंब्या व्हाव्यात तशीं– होतात. अेक ऋण, दुसरें धन. अशीं दलें हवेमध्ये अुत्पन्न झालीं की विजेचा अुचय पदार्थावर टिकूं शकत नाही. हीं दलें म्हणजे वीज लुटणारे लुटारूच होत. पारायणी किरण किंवा वैश्वकिरण आपापल्या मार्गावर विदलनच करीत चाललेला असतो. या वैजिक दलांचें आणि बाष्पतुषारांचें फारच सख्य. द्रवतुषार आता टाकणार रे टाकणार अशा स्थितींत हवा असावी आणि तेथे विदलन झालेलें असावें, की मग विचारावयास नको. तुषार बनतो तो लगेंच दलावर गप्पादिशीं बसलाच. किरणमार्गाच्या निकाशावरून हेंच दिसतें.

ही चोरट्यांची लागण पैदा होते अशीं सर्व ज्ञात किरणें पेटींत शिरूं न दिलीं तरी देखील ज्या अर्थी चोरटे आढळतातच त्या अर्थी अेखादें अज्ञात स्वरूपांतलें तेज पेटींत शिरत असलें पाहिजे. तसें असेल तर तें खरोखरीच बाहेरून येतें हें पाहतां व दाखवतां आलें पाहिजे.

हें नवें तेज पाहण्याची व दाखविण्याची सोय आकृति १ मध्ये दाखविलेल्या साधनाने झालेली आहे. हें साधन म्हणजे अेक प्रकारचा घुशीचा सापळाच आहे. रात्रीच्या वेळीं आपल्या बागेंतलीं झाडें कोणी तरी अुपटून टाकीत असलें तर ओल्या मातीवर अुमटलेल्या पावलांवरून आपण खात्री करून घेअूं शकतों की तीं पावलें अुंदराघुशीचींच असावींत. मग त्या घुशीला पकडण्यासाठी पावाच्या तुकड्याचें किंवा दुसरे अेखादें आमिष असलेला पिंजरा आपण बागेंत ठेवतों. असाच प्रकार येथेहि होतो. आकृति १ मध्ये अुजव्या हाताला काचेचा चंबू आहे त्यांतील हवा काढून टाकतां येते. शिरोभागीं असलेल्या अुमट काचेच्या कोठडींत दमट हवा असते. चंबू आणि कोठडी यांच्या मध्यंतरीं अेक झापड असते. कोठडीचा संबंध विजेच्या सरणीशीं जोडून दिला आणि झापड अुघडविली की आंतली हवा चंबूंत शिरते, अर्थात् अेकदम पुष्कळ वाव मिळाल्यामुळे ही दमट हवा विस्तार पावते, आणि तिच्यांतील जलांश द्रवतुषाररूपाने बाहेर



सुप्रसिद्ध 'विल्सनची कोठडी'. समोरच अुभी आहे ती दमट हवेची कोठडी. अुजव्या हाताला आडवा चंबू आहे. दोहोंना सांधणाऱ्या जागीं झापड आहे, ती चित्रांत दिसूं शकत नाही.



वैश्वकिरण आपल्या मार्गाने जाअूं लागला म्हणजे त्याच्या मार्गावर वैजिक दलांची झुंबड कशी लागते हें चित्रांत दाखविलें आहे. डाव्या हाताला दिसतें तें कोठडींतील दृश्य तिच्या जवळच असलेल्या आरश्यांतून दिसणारें दृश्य अुजव्या हाताला आहे. दोहोंच्या साहाय्याने वैश्वकिरणाची वेधिकता ठरवितां येते.

पडतो. अशा वेळीं जवळ एखादा निकाशकोटर-कॅमेरा-लावून ठेवलेला असला म्हणजे या अज्ञात किरणांचा मार्ग, चोराचीं पावलें अुमटावींत तसा, कोठडींतील हवेंत अुमटलेला निकाशा-वर दिसून येतो. आकृति २ मध्ये अशा तऱ्हेच्या किरणसरणींचें अेक चित्र दाखविलें आहे.

अशा रीतीने अेका नव्याच, आतिवेधक अशा प्रकारच्या, तेजाचें अस्तित्व अेकदा सिद्ध झाल्यावर शेकडो जिज्ञासूंनी निरनिराळ्या परिस्थितींत निरनिराळे प्रयोग करून पाहिले. परिणामीं असें आढळून आलें की डोंगरमाथ्यावर, दऱ्याखोऱ्यांत, पृथ्वीच्या पाटीवर सर्वत्र, पूर्वेकडे पश्चिमेकडे, दक्षिणेला अुत्तरेला, जेथे जावें तेथे, या किरणांचें अस्तित्व भूगोलावर सर्वत्र जवळ जवळ सारख्याच तीव्रतेचें आढळतें. अर्थातच हें तेज पृथ्वीवर सर्व बाजूंनी सारख्याच तीव्रतेने येतें असें मानणें भाग पडतें. पृथ्वीच्या पोटांतून तें बाहेर येत असेल म्हणावें तर जसजसें भूपृष्ठाच्या किंवा समुद्रसपाटीच्या खाली जावें तसतशी त्याची तीव्रता कमी आढळते. अुलटपक्षीं वातावरणाचा ठाव घेण्यासाठी विमानांच्या किंवा फुग्यांच्या साहाय्याने वर वर जाऊं लागल्यास सुमारें १८-१९ मैलांवर त्याची तीव्रता भूपृष्ठाच्या २०० पट अधिक झालेली आढळते. तर मग तें वरून खालीं, आकाशांतून पृथ्वीकडे, येत असावें हें अुघडच झालें. सूर्यापासून पृथ्वीकडे हें तेज येत असेल म्हणावें तर दिवसाप्रमाणेच रात्रीहि त्याची तीव्रता आढळते. खग्रास ग्रहणांतहि तें पृथ्वीचा पिच्छा सोडीत नाही. तर मग हे किरण ताऱ्यांपासून निघून अिकडे येत असतील म्हणावें तर तसेंहि नाही. कारण, अिकडे, हें तेज पृथ्वीवर सर्व बाजूंनी सारख्याच तीव्रतेने येत असलेलें आढळतें; तर तिकडे, आकाशांतल्या ताऱ्यांची पसरणूक मात्र पृथ्वीभोवती सर्व बाजूंना सारख्याच प्रमाणांत, सारख्याच संख्येने आढळत नाही; आणि शिवाय, दुसरें असें की आकाशांतल्या कोट्यवधि ताऱ्यांचा मिळून बनलेला जो आकाशगंगेचा पट्टा, तो दक्षिण अमेरिकेंतल्या कांही टापूंत कित्येक तासपर्यंत दृष्टी-आड असतांना या किरणांची तीव्रता तेथेसुद्धा अितरत्रांअितकीच आढळते. तर मग हें विल-क्षण वेधक तेज येतें तरी कोठून ? या प्रश्नाला शास्त्रज्ञांचें अुत्तर आहे तें असें की बहुधा दुरून, अत्यंत दूरवरून, विश्वाच्या अंतरंगांतून.

आता, विश्वाच्या अंतरंगांतून म्हणजे तरी कोठून हें ध्यानांत येण्यासाठी आधुनिक शास्त्रज्ञांची विश्वकल्पना थोडक्यांत दृष्टीसमोर आणली पाहिजे. ती तशी येण्यासाठी अेखाद्या कालिंगड्याचें अुदाहरण घेतां येअील. समजा, अेखादें कालिंगडें पारदर्शक आहे. म्हणजे असें की, टेबलावरचे कागद अुडून जाअू नयेत म्हणून जो काचेचा गोळा– कागददाब– आपण वापरतों त्याच्या आंतले बुडबुडेवजा बिंदु जसे दिसूं शकतात तशाच या कालिंगड्याच्या आंतल्या काळ्या भुऱ्या बियाच तेवढ्या कायत्या दिसत असून त्या आडव्या, अुभ्या, तिरप्या, लहानमोठ्या, सर्वत्र सारख्याच दाटीने खुपसून राहिलेल्या दिसत आहेत. हें जें कालिंगडें म्हणून सांगितलें तें आपलें 'विश्व'. त्याच्या आंतला जो पारदर्शक भाग तोच अंतराळीचा 'अवकाश'. कालिंगड्याच्या आंतल्या ज्या बिया तें अेकेक विश्वद्वीप– मोठ्या विश्वामधलें अेकेक लहानसें बेट. कालिंगड्याच्या केंद्रापासून जरा दूरच असलेली जी बी तिला आपण '**दीर्घिका**' असें म्हणूं. तिची आकृति अेखाद्या वडाऱ्याच्या गाड्याच्या चाकासारखी मध्यें फुगीर, कडेला निमुळती. या बीचा जो कंगोरा– चाकाची जी धाव– ती आपली आकाशगंगा. सबंध विश्वाची कल्पना यावी म्हणून आकाशगंगेला सामावणाऱ्या या विश्वद्वीपाला कालिंगड्याच्या बियेची अुपमा द्यावी

लागली. वस्तुतः मात्र साखर, खोबरें, खसखस वगैरेंचें सारण करून तें खच्चून आंत भरलेल्या अेखाद्या फुगीर पुरीसारखें तें असून त्यामध्ये सुमारें ३ खर्व तारकांचा समावेश झालेला आहे. त्याच्या केंद्रापासून जरासा दूर आपला सूर्य, आणि त्याच्याजवळच पृथ्वीवरचे आपण आहोंत. या ताऱ्यांमधले कांही तारे सूर्यापेक्षा किती तरी पटीने मोठे आहेत, कांही लहान आहेत. या दीर्घिकेचा व्यास अेवढा विस्तीर्ण आहे की त्या व्यासाच्या अेका टोकापासून दुसऱ्या टोकाला प्रकाश जाण्याला विपळागणिक १,८६,००० मैल या वेगाने ६० सहस्र वर्षें लागतात. तिची जाडी अेवढी मोठी आहे की तिच्यांतूनहि प्रकाश जाण्याला ५ सहस्र वर्षें लागतात. आणि सबंध दीर्घिकेला, पृथ्वी जशी स्वतःच्या अक्षाभोवती २४ तासांत अेक फेरी पुरी करते तसें, अेक परिवलन घेण्याला २५ कोटि वर्षें लागतात. यावरून बाकीच्या विश्वद्वीपांची आणि सबंध विश्वाची थोडीशी कल्पना येअील. विश्वाच्या अफाट अवकाशांतून, त्याच्या गाभाऱ्यांतून, वैश्वकिरण येतात असें जेव्हा म्हटलें जातें तेव्हा त्याचा अर्थ असा की ते आपल्या या 'दीर्घिके'च्या बाहेरून कितीतरी दूरवरून कोठून तरी येत असावेत.

तथापि, हा विषय अद्यापि नवीनच असल्यामुळे या किरणांच्या स्वरूपाविषयी आणि त्यांच्या जन्मसंभवाविषयी अैकमत्य नाही. अनेकांच्या अनेक परि कल्पना आहेत. प्रथमच जेव्हा त्यांचा शोध लागला तेव्हा सुप्रसिद्ध अमेरिकन शास्त्रज्ञ मिलिकान याने त्यांना 'कॉस्मिक' म्हणजे वैश्व असें नांव दिलें. त्या वेळची त्याची कल्पना अशी की अेखाद्या प्रसूतिगृहांत नवीन मुलाचा जन्म झाला म्हणजे त्याच्या पहिल्या ट्याहांकाराने जसें त्या मुलाच्या जन्माचें शुभवृत्त घरांतल्या पुरुषादिकांना कळतें, तद्वतच वैश्वकिरणांच्या द्वारा आपल्याला दूर अंतरावर कोठे तरी तेजांतून 'वस्तू'चा जन्म झाल्याचें समजत असावें. अद्यापहि कित्येकाचें असें म्हणणें आहे की या तेजाचा अुगम आपल्या दीर्घिकेंत असणें संभवनीय आहे. अितरहि कित्येक मतें आहेत. तथापि अेक गोष्ट या सर्वांना निर्विवादपणें मान्य आहे. ती ही की अत्यंत वेधिष्ठ असें कांही तरी तेज पृथ्वीच्या पाठीवर सर्वत्र आढळत असून त्याचा अुगम पृथ्वीच्या बाहेर कोठे तरी दूर अंतरावर आहे.

सतराव्या शतकाच्या आरंभीं परमेश्वराची सर्व-व्यापकता सांगतांना तुकारामाने उद्गार काढले होते 'जेथे देखें तेथे अुभा, अवघ्या गगनींच्या गाभा'! विसाव्या शतकाच्या आरंभीं भौतिकशास्त्रज्ञहि असेंच कांहीसे म्हणूं लागले आहेत. पण दोघांचे मार्ग निराळे, दृष्टि निराळी, दृश्यें देखील निराळींच निराळीं !

---

# परीक्षणें

## धर्म-तत्त्वज्ञान

**प्रस्थानत्रय भाष्याचा अुपसंहार**— प्रकरण तिसरें: कार्यकारणाचें अनन्यत्व (पृष्ठें २८), प्रकरण चवथें: वेदसिद्ध मायावाद (पृष्ठें ५६); ले० व प्रका० अुपनिषत्तीर्थ द. वा. जोग, पुणें; किंमतः— अनुक्रमें आ. ६ व रु. १.

कै. आचार्य विष्णुशास्त्री बापट यांनी केलेलें अद्वैतवेदान्तविषयक कार्य सुशिक्षित महाराष्ट्रीयांस विदित आहेच. अुपनिषदें, भगवद्गीता व बादरायणप्रणीत ब्रह्मसूत्रें या प्रस्थानत्रयीवरील श्रीमदाद्यशंकराचार्यांच्या भाष्यांचें मराठी भाषान्तर करून श्री. बापटशास्त्री यांनी ते ग्रंथ मराठी वाचकास सुगम केलेले आहेत. त्यांनी स्थापिलेल्या आचार्यकुलांत अद्वैत वेदान्ताचाच प्रामुख्याने पुरस्कार होत असे; व तेथे अेक विशिष्ट शिष्यपरंपराहि निर्माण होअूं लागली होती. प्रस्थानत्रयीवरील शांकरभाष्यांचें भाषान्तर प्रसिद्ध झाल्यावर 'प्रस्थानत्रयभाष्याचा अुपसंहार' या नांवाचा ग्रंथ लिहून शांकरवेदान्ताचें सर्वांगीण मूल्यमापन करण्याचा शास्त्रीबोवांचा विचार होता असें दिसतें. परंतु त्यांच्या मृत्यूमुळे तो ग्रंथ निर्माण होअूं शकला नाही. त्यांच्या पश्चात् आता तें काम त्यांच्याच शिष्यसंप्रदायांतील श्री. जोग यांनी अंगीकारिलें असून आतापर्यंत त्यांनी (१) ब्रह्मविचार, (२) अध्यास, (३) कार्यकारणाचें अनन्यत्व, व (४) वेदसिद्ध मायावाद अशीं चार प्रकरणें लिहून प्रसिद्ध केलेलीं आहेत.

प्रस्थानत्रयाच्या भाष्यकारांनी सामान्यतः आपल्या भाष्यांत स्वीकारलेली भूमिकाच अशा प्रकारची आहे की त्यामुळे त्यांना दोन प्रकारच्या विरोधांचा परिहार करणें भाग पडलें. वेदान्तांतील सर्व सिद्धान्त अुपनिषद्वाक्यावरच मुख्यतः आधारलेले आहेत. परंतु त्या अुपनिषद्वाक्यांतच अनेक ठिकाणीं परस्परविरोध असलेला प्रतीत होतो. हा विरोध खरा नसून केवळ आभासात्मक आहे ही गोष्ट सिद्ध होअील अशा रीतीने अुपनिषद्वाक्यांचा अर्थ लावून त्यांवरून तर्कदृष्ट्या सुसंबद्ध अशी विचारप्रणाली काढून दाखविणें प्रत्येक भाष्यकारास अवश्य होतें. यासच 'समन्वय' असें म्हणतात. परिहार्य असा दुसरा विरोध म्हणजे प्रत्यक्षप्रमाणजन्य ज्ञान व शब्दप्रमाणजन्य ज्ञान यांमधील होय. श्रुतींत प्रतिपादिलेल्या गोष्टींविरुद्ध आपणांस अनेक वेळीं अनुभव येतो. अुदाहरणार्थ, श्रुतिसमन्वयसिद्ध केवल-अद्वैत प्रत्यक्ष व्यवहाराशीं विसंगत असल्यासारखें वाटतें. हा विरोध नाहीसा केल्याशिवाय श्रुतिप्रामाण्यास अर्थच राहणार नाही. तेव्हा श्रुतींची व अनुभवाची तर्काधिष्ठित संगति लावणें प्रत्येक भाष्यकारास भाग पडलें. वेदान्ती भाष्यकारांमध्ये या दोन विरोधांचा परिहार बुद्धीस अधिकांत अधिक समाधानकारक अशा रीतीने फक्त शंकराचार्यांनीच केलेला आहे असें म्हणावें लागतें. या दृष्टीने तरी भारतीय तत्त्वज्ञानांत शांकरमताचें महत्त्व अविवाद्य आहे. श्रुतींचा समन्वय घडवून आणण्यासाठी शंकराचार्यांनी पारमार्थिक सत्य व व्यावहारिक सत्य या सत्यद्वयाची कल्पना केलेली आहे. आणि श्रुति व अनुभव यांची संगति मायावादाचा स्वीकार करून लावलेली आहे. व्यवहारांत

प्रत्यक्ष प्रतीत होणाऱ्या कार्यकारणभावाचें स्पष्टीकरण विवर्तवादाच्या आधारें करून अद्वैत मतास मूलभूत असलेलें कार्यकारणांचें अनन्यत्व सिद्ध करणें हें वरील विरोधपरिहाराचेंच अेक अंग आहे.

श्री. जोगकृत 'अुपसंहारा'च्या तिसऱ्या प्रकरणांत याच विषयाची चर्चा आलेली आहे. या प्रकरणाचें स्वरूप केवळ अनुवादात्मक आहे. शंकराचार्यांनी आपल्या भाष्यांत— विशेषतः शारीरकभाष्यांत— जगदुत्पत्तिविषयक आरंभवादपरिणामवादादि पूर्वपक्षांचें प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष रीत्या खंडन करून आपला विवर्तवादी सिद्धान्त प्रस्थापित केलेला आहे. भाष्यांतील याच भागाचा सुलभ सारांश श्री. जोग यांनी या प्रकरणांत दिलेला आहे. हें प्रकरण— किंबहुना श्री. जोग यांचा सर्वच संकल्पित 'अुपसंहार' ग्रंथ— केवळ वेदान्ताच्या प्राथमिक विद्यार्थ्यां-साठीच योजिलेला दिसतो. अर्थात् त्याची रचना सामान्यतः विद्यार्थ्यांना अुपयुक्त वाटेल अशीच केलेली आहे. 'अुपादान' म्हणजे काय व अुपादानाचे आरंभवादादि जे तीन प्रमुख भेद मानिले जातात त्यांचें स्वरूप काय आहे याची प्रथम थोडक्यांत चर्चा करून मग ग्रंथकार मूळ विषयाकडे वळला आहे. तो भाग शांकरभाष्याचा सारांशात्मक अनुवादच असल्यामुळे त्यांतील विषयविवेचनांत नावीन्य मुळीच नाही असें म्हटलें तरी चालेल. शारीरकभाष्याच्या कोठल्याहि भाषान्तरांत— विशेषतः महामहोपाध्याय वासुदेवशास्त्री अभ्यंकर यांनी केलेल्या मराठी भाषान्तरांत— हा विषय चांगल्याप्रकारें विशद केलेला आढळतो. श्री.जोग यांनी या विषयाची मांडणी कशी केली आहे अेवढेंच येथे पाहावयाचें. या बाबतींत मात्र त्यांना धन्यवाद दिले पाहिजेत. पाठशालेंतील अेखाद्या वर्गांत शांकरभाष्यांतील अेतद्विषयक विचारांचें स्पष्टीकरण करावें अशा पद्धतीनेच हें प्रकरण लिहिलेलें आहे. विषयाच्या सुलभीकरणार्थ शांकरमतानुयायी संक्षेपशारीरकादि अितर ग्रंथांतील अुतारेहि योग्य ठिकाणीं दिले आहेत. मधून मधून दिलेल्या अुताऱ्यांचें संदर्भ जितक्या पूर्णतेने द्यावयास पाहिजेत तितके दिलेले नाहीत ही गोष्ट मात्र येथे नमूद करावीशी वाटते.

कार्यकारणाचें अनन्यत्व या विषयाच्या अनुरोधाने शांकरमताची जगांतील अितर आत्मवादी (idealistic) मतांशीं तुलना करून त्याचें वैशिष्ट्य काय आहे याचें विवेचन चिकित्सक पद्धतीने या 'अुपसंहारां'त ग्रंथकाराने करावयास पाहिजे होतें अशी अपेक्षा असणें साहजिक आहे; परंतु श्री. जोग यांची मूळ भूमिकाच अशा विमर्शकाची नसून केवळ अनुवादकाची आहे हें स्पष्ट दिसतें. त्यामुळे शांकरवेदान्तांतील अेका महत्त्वपूर्ण विषयाच्या प्राथमिक परिचयापुरतीच या प्रकरणाची व्याप्ति आहे.

मागे अुल्लेखिल्याप्रमाणे 'मायावाद' हें शंकराचार्यांच्या आत्मवादी तत्त्वज्ञानाचें अेक वैशिष्ट्यपूर्ण अंग आहे. मायावादाच्या स्वीकाराशिवाय शंकराचार्यप्रणीत केवल-अद्वैतमताची सिद्धि होणें शक्य नाही. 'अुपसंहारा'च्या 'वेदसिद्ध मायावाद' या चवथ्या प्रकरणांत याच विषयाचा विचार समाविष्ट झालेला आहे. मागील प्रकरणाशीं तुलना केली असतां या प्रकरणाचें स्वरूप मात्र जरा निराळ्या प्रकारचें आहे हें कळून येतें. त्यांत शांकरभाष्यांतील व तदनुसारी अितर प्राचीन व अर्वाचीन ग्रंथांतील मायावादविषयक विचारांचा अनुवाद तर केलेलाच आहे पण त्याबरोबर शंकराचार्यप्रणीत मायावादाच्या कांही अर्वाचीन टीकाकारांचें खंडन करण्याचाहि प्रयत्न केलेला आहे.

या प्रकरणाच्या पहिल्या तीन विभागांत केसरीचे संपादक श्री. ज. स. करंदीकर व कै.श्री. सदाशिवशास्त्री भिडे यांना पूर्वपक्षी कल्पिलेलें आहे. माया शब्दाचा अर्थ भ्रम किंवा आभास

असा न करतां अचिन्त्यशक्ति असाच केला पाहिजे; त्याशिवाय गुणकर्मविभागाभिश्रित चातुर्वर्ण्याची मायावादाशीं संगति लावतां येणार नाही असें त्यांचें म्हणणें आहे. अर्थात् गीता-रहस्यप्रणीत निष्कामकर्मयोगाच्या शिकवणीस पुष्टि देण्यासाठीच वरील विद्वानांनी आपलें हें मत अट्टाहासाने पुढे मांडलें असलें पाहिजे. शंकराचार्य व तदनुसारी प्राचीन व अर्वाचीन लेखक यांच्या लिखाणाच्या आधारें श्री.जोग यांनी या वरील मताचें खंडन केलेलें आहे. परंतु तें त्रंरचसें पूर्वग्रह-दूषित व म्हणून अेकांगी झालेलें आहे. केवळ पारमार्थिक सत्य व व्यावहारिक सत्य यांचा हवाला देअून करंदीकरादिकांचें म्हणणें खोडून काढतां येणार नाही. शिवाय या विभागांत अुपयोजिलेली वादपद्धति वर्तमानपत्री स्वरूपाची— व कांही ठिकाणीं तर अप्रौढ अशी— असून शास्त्रीय ग्रंथांत न शोभण्यासारखी आहे. या बाबतींत श्री. जोग यांनी विमर्शकास अुचित अशा समतोलबुद्धीचा त्याग करून चिडखोरपणाची वृत्ति अंगीकारिल्याचा भास होतो. यामुळेहि त्यांच्या मुद्द्यास अेकप्रकारचें गौणत्व प्राप्त झालें आहे. पुढे आलेल्या 'मायावाद व आधुनिक पंडित' या विभागांतील विषयाची मांडणीहि अतिशय त्रुटित स्वरूपाची झालेली आहे. निरनिराळ्या पंडितांच्या ग्रंथांतील अुतारे घेअून त्यांचा अनुवाद करण्याच्या अैवजी त्या ग्रंथांतील विचार आत्मसात् करून ते लेखकाने आपल्या भाषेंत विधायक पद्धतीने पुढे मांडले असते तर या विभागाची अुपयुक्तता अधिक वाढली असती. तसेंच 'माया शब्दाचें प्राचीनत्व व अर्थविकास' या विभागांत डॉ. शास्त्री यांच्या 'The Doctrine of Maya' या ग्रंथांतून अुद्धृत केलेल्या अनेक अुल्लेखांवरूनहि विषयाचा व्हावा तसा स्पष्ट बोध होत नाही. अुदाहरणार्थ, ऋग्वेदांतर्गत वरुणाच्या मायेच्या कल्पनेंतून शंकराचार्यांच्या मायावादाचा विकास झालेला आहे कीं काय व तसें असल्यास तो कसा झाला, हें ग्रंथकर्त्याने या विभागांत विशद करावयास पाहिजे होतें; नुसते वाङ्मयांतील अुतारे देअून कांहीच साध्य होत नाही. या प्रकरणांतील अेका विभागांत कर्नल जेकब व डॉ. थिबो यांच्या माया-अविद्याविषयक मतांचें विश्लेषण केलेलें आहे. त्या संबंधांतहि वरील टीका लागू पडते. 'मायेची सर्वप्रकारें अुपपत्ति' हा शेवटचा विभाग मात्र विद्यार्थ्यांस अत्यंत अुपयुक्त वाटेल. शांकरभाष्याच्या मानाने रामानुजाचार्यांचें श्रीभाष्य समजण्यास निःसंशय अधिक कठिण आहे. रामानुजाचार्यांनी मायावादावर घेतलेल्या आक्षेपांचें अुत्तम रीतीने आकलन करून घेतल्याशिवाय मायावादाचें महत्त्व संपूर्णतया प्रतीत होणार नाही. म.म. वासुदेवशास्त्री अभ्यंकर यांच्या 'अद्वैतामोद' या संस्कृत ग्रंथाच्या आधारें श्री.जोग यांनी हें काम सुलभ केलेलें आहे.

मायावादाच्या विषयानुरोधाने मुख्यतः पुढील प्रश्न अुद्भवतात. 'माया' या शब्दाच्या अर्थाचा वैदिक वाङ्मय व दार्शनिक वाङ्मय यांमध्ये कसा विकास होत गेला? शंकराचार्य-प्रणीत मायावादाचें खरें स्वरूप काय आहे? तो मायावाद औपनिषदवाङ्मयावर, गीतेवर किंवा ब्रह्मसूत्रावर आधारलेला असल्याचें दाखवितां येअील काय? का शंकराचार्यांनी या वादाची कल्पना दुसऱ्या तत्त्वप्रणालींतून घेअून तिचाच जोराने पुरस्कार केलेला आहे? शंकराचार्यांना मायावादाचा अंगीकार कां करावा लागला? केवळ तर्कदृष्ट्या मायावादाची अुपपत्ति कशी लावतां येअील? या व अशाच अितर प्रश्नांची विधायक चिकित्सा श्री. जोग यांनी आपल्या 'अुपसंहारा'च्या या प्रकरणांत प्रथम करावयास पाहिजे होती. नंतर त्यांनी निरनिराळ्या वादांत शिरावयास हरकत नव्हती. असें न केल्यामुळे, 'प्रस्थानत्रयभाष्याचा अुपसंहार' अशा स्वरूपाच्या ग्रंथाची व्याप्ति त्यांनी योग्य प्रकारें ओळखली नाही असेंच म्हणावें लागतें. वरील प्रश्नांचा सांगोपांग अूहापोह केल्यास शंकरप्रणीत मायावाद हा सर्वस्वी 'वेदसिद्ध'

आहे असें म्हणतां येणार नाही. परंतु त्यामुळे तो अस्वीकार्य आहे असें मात्र नाही. मागे म्हटल्याप्रमाणे श्रुति व अनुभव यांच्यामधील विरोध नाहीसा करावयास शंकराचार्यांचा मायावाद हाच बुद्धीस अधिकांत अधिक समाधानकारक असा मार्ग आहे.

'कार्यकारणाचें अनन्यत्व' या मागील प्रकरणाशीं तुलना करतां या चवथ्या प्रकरणांतील विषय अधिक महत्त्वाचा असूनहि त्याचें विवेचन पूर्वीअितकें समाधानकारक झालेलें नाही; परंतु मायावादविषयक चर्चेस अवश्य अशी बरीच सामग्री लेखकाने यांत अेकत्र आणली आहे अेवढ्यामुळेसुद्धा हें प्रकरण शांकरवेदान्ताच्या अभ्यासकास अुपयुक्त वाटेल. आचार्यप्रणीत अद्वैतवेदान्तसंप्रदायाविषयी श्री. जोग यांना वाटणारी सात्त्विक तळमळ या दोन्ही प्रकरणांत स्पष्टपणें दिसून येते. तिलाच चिकित्सक विमर्शकाच्या भूमिकेची जोड देअून ते आपल्या ग्रंथाच्या पुढील प्रकरणांत शांकरमताच्या खऱ्या वैशिष्ट्याचें प्रतिपादन करतील अशी आशा आहे.

रा. ना. दां.

## वैद्यक शास्त्र

**संमोहनशास्त्र (Anæsthesia)**— ले० व प्रका० डॉ. मा. पु. जोशी, ९१२ सदाशिव, पुणें २; मूल्य रु. २॥.

पुण्याच्या आयुर्वेद महाविद्यालयांतील अेक अध्यापक डॉ. जोशी यांनी शस्त्रकर्माला साहाय्यभूत संमोहनक्रियेसंबंधी कांही लेख त्या संस्थेच्या त्रैमासिकांत लिहिले होते त्यांचाच विकास संमोहनशास्त्र या ग्रंथाच्या रूपाने त्यांनी मराठी वाचकांस सादर केला आहे. सांमोहिक शास्त्रावर मराठी ग्रंथ यापूर्वी झालेला नाही आणि संस्कृतांत तर याविषयी ग्रंथप्रकरणहि नाही. त्यामुळे मराठींतून वैद्यकीय शास्त्र शिकणारांची पुष्कळच सोय प्रस्तुत ग्रंथाच्या प्रकाशनाने झालेली आहे. संमोहप्रसंगांची चर्चा, संमोहसाहित्याचें वर्णन, संमोहनी क्रियेचें निरूपण, संमोहनद्रव्यांच्या विनियोगाचें प्रतिपादन, संमोहकारी वैद्याने अवश्य ध्यानांत ठेवण्याजोगीं अनुशासनें, संमोहामध्ये प्रसंगविशेषीं अुद्भवणारे अुपद्रव, त्यांचा प्रतिबंध व त्यांवरील अुपाय अित्यादि सर्व अुपांगांची मांडणी यथायोग्य आणि यथाप्रमाण दिलेली या पुस्तकांत आढळते. याशिवाय आरंभीं या शास्त्रासंबंधी थोडासा अितिहास आणि शेवटीं पारिभाषिक शब्दकोश देअून पुस्तकाच्या अुपयुक्ततेंत चांगलीच भर घातली आहे. पुस्तकांतील विवरण अनेक अिंग्रजी पुस्तकांच्या आधारें केलेलें आहे हें खरें पण पुस्तककर्त्याने आपल्या अेतद्विषयक अनुभवाचा निष्कर्षहि जागरूकपणें वापरलेला आहे असें जागोजाग दिसून येतें.

या पुस्तकांत शास्त्रीय परिभाषा मराठीच वापरली आहे हें स्तुत्य आहे. सांमोहिक शास्त्र हें वैद्यकशास्त्रवृक्षास पल्लवरूप आहे. शारीरादि शास्त्रें या वृक्षाच्या मुळाशीं असून निदान चिकित्सादि शास्त्रें शाखारूप होत. मूलशाखादिकांतून जो विचारांचा ओघ चालतो तोच पुढे या पल्लवांत अुतरतो. हा ओघ वाहणारी जी परिभाषारूपी वाहिनी तिचीं केवळ अग्रेंच या पल्लवांत विखुरलेलीं असावयाचीं. डॉ. जोशी यांच्या शिक्षणसंस्थेने अेकमुखी शास्त्रीय परिभाषा करण्याचा प्रयत्न अद्यापि केलेला दिसत नाही. पुण्याच्या परिभाषामंडळाने असा प्रयत्न केला असून तो साहित्यपत्रिकेंत प्रसिद्धहि झाला आहे. डॉ. जोशी यांनी त्याचा अुपयोग केलेला दिसत नाही. प्रस्तुत पुस्तकांतील परिभाषेचे गुणदोष सांगणें म्हणजे शारीरादि मूलभूत विषयांच्या

परिमापेच्या चर्चेस हात घालणें असें होणार आहे. म्हणून या संबंधांत पुस्तकांत सुधारणा पुष्कळ पाहिजे अहेत तितकेंच सांगून परीक्षण संपवणें भाग आहे.

म. वि. आ.

## भाषा-व्याकरण

**रामचंद्र भिकाजी गुंजीकर यांचे संकलित लेख** (प्रथम खंड)— प्रका० श्री. रा. का. तटणीस, लक्ष्मीनारायण प्रेस, ३६४ ठाकुरद्वार, मुंबअी २; मूल्य रु.२॥.

कन्नड-मुखाः स्वदेश्या वाचोऽप्याङ्ग्लीं विदञ्जने तन्वन् ।
ज्ञानं विविधं स्वगिरं व्याकुर्वञ्जयति पण्डितो रामः ॥१॥

**अर्थ**— कानडी अित्यादि आपल्या देशांतील भाषा, तशीच अिंग्रजी जाणणारा, अनेक विषयांचें ज्ञान (विविधज्ञानविस्तार अित्यादि मासिकें व अन्य साधनें यांनी) लोकांत पसरविणारा व आपल्या मातृभाषेचें (मराठीचें) व्याख्यान करणारा, असा संस्कृतज्ञ विद्वान् रामचंद्र (भिकाजी गुंजीकर) हा प्रशंसेस पात्र आहे.

**१ प्रस्ताव**— पेशवाअी संपून आंग्लशाही सुरू झाली. तिच्या आरंभीं आपल्या महाराष्ट्रांत अनेक विद्वद्रत्नें होअून गेलीं. त्यांतील रानडे, जांभेकर, दादोबा पांडुरंग अित्यादि विद्वानांची पहिली पिढी होय. यांच्या कांही काल मागून झालेल्या विद्वानांत प्रस्तुत लेखांचे जनक रामचंद्र भिकाजी गुंजीकर यांची गणना होते. यांचा अभ्यास खोल असून ह्यांनी अनेक भाषा अभ्यासिल्या होत्या. मराठी, अिंग्रजी, संस्कृत अित्यादि येथील भाषांशिवाय बंगाली व कानडी यांचाहि व्यासंग त्यांनी केला होता. यामुळे अर्थातच भाषाशास्त्रविषयक त्यांच्या लेखांत विधानांचा समतोलपणा विशेष दिसून येतो. केवळ भाषाशास्त्रावरच संतुष्ट न राहतां, यांनी अितरहि विषय हाताळले आहेत. त्यांनी शाकुंतलाचें मराठी भाषान्तर केलें आहे. संस्कृत कौमुदीच्या परिस्फोटार्थ कौमुदीमहोत्साह या नांवाचें मासिकहि त्यांनी बराच काल चालविलें होतें. मोचनगड नांवाची मराठ्यांच्या अितिहासावर आधारलेली कादंबरीहि त्यांनी लिहिली आहे. ही अेका कालीं विशेष लोकप्रिय होती. भाषिक व सामाजिक अित्यादि विषयांवर यांचे निबंधहि आहेत. अशा प्रकारें वाङ्मयाच्या अनेक शाखांत यांनी पुष्कळ लेखन केलें आहे. मात्र यांची कविता कोठे आढळत नाही. अर्थात् त्यांनी कविता केली असल्यास ती अत्यंत अल्प असली पाहिजे.

अशा या विद्वानाचे विविधविषयक लेख त्यांचे चिरंजीव रँग्लर काशीनाथपंत यांनी प्रसिद्धिले आहेत; व या लेखांस रा. अ. का. प्रिओळकर या विद्वानांनी प्रस्तावना जोडिली आहे. या प्रस्तावनेंत अनेक महत्त्वाचे विषय आहेत. त्यांचा विचार प्रथम करून नंतर लेखांतील विषयांकडे वळूं.

**२ चरित**— रा. रामभाअू गुंजीकर यांचा जन्म बेळगांव जिल्ह्यांत जांबोटी नांवाच्या परगण्यांत जांबोटी येथे सन १८४३ सालीं झाला. त्याच गांवीं त्यांचें मराठी शिक्षण झालें. यांचे वडील संस्कृतज्ञ असल्याने त्यांनी रामभाअूंकडून मराठी शिक्षणाबरोबरच संस्कृताचेंहि अध्ययन करविलें. जांबोटी येथून अिंग्रजी शिक्षणासाठी रामभाअू बेळगांवास सरदार हायस्कूल-

मध्ये प्रविष्ट झाले. त्यांच्या वडिलांची स्थिति गरिबीचीच असल्यामुळे हें अिंग्रजी शिक्षण त्यांनी कष्टांनीच केलें. तेथील अिंग्रजी शिक्षण संपवून पुढील शिक्षणासाठी रामभाअू मुंबअीस आले. आणि अेल्फिन्स्टन हायस्कूमधून १८६४ मध्ये प्रवेश परीक्षा अुतरले. पुढे कॉलेजांत प्रविष्ट झाले. तेथे सन १८६६ मध्ये त्यांच्या मराठीवरील निबंधास ३५ रुपयांचें पारितोषिक मिळालें. त्या वेळच्या त्यांच्या स्थितींत या रकमेने त्यांना बरेंच साहाय्य झालें. याशिवाय आपला खर्च भागविण्यासाठी त्यांना शिकवण्याहि कराव्या लागत. यामुळे, जवळ भरपूर बुद्धिबळ असूनहि त्याचें चीज द्रव्यबलाच्या अभावीं त्यांस चांगलें करतां आलें नाही. कॉलेजांतलें शिक्षणहि त्यांस अर्धवटच सोडावें लागलें. पुढे ते अेल्फिन्स्टन हायस्कूलमध्येच सुमारें २० वर्षे म्हणजे १८८८ पर्यंत शिक्षक होते. पुढे डिपोटी म्हणून कांही वर्षे नोकरी करून १८९८ मध्ये ते सेवानिवृत्त झाले. निवृत्तिवेतन भोगण्यास तीनच वर्षे जगून १९०१ मध्ये ते वारले. या वेळीं त्यांचें वय सुमारें ६० वर्षांचें होतें. त्यांच्या मूळच्या शरीरप्रकृतीकडे पाहतां त्यांचें मरण अकालमरणच ठरतें. या मरणाचें कारण आप्तनिधनशोक दिसतें. त्यांचा वडील मुलगा व मुलगी त्यांच्या हयातींतच दिवंगत झालीं. मुलीच्या निधनानंतर तर पंधरवड्यांतच या प्रेमळ बापाचा अंत झाला.

**३ विद्वद्विवाद—** आपणास मराठी भाषेचा शिवाजी म्हणविणारे विष्णुशास्त्री चिंपळूणकर यांचा व रामभाअूंचा मासिकांतून वारंवार खटका अुडत असे. सन १८६७ मध्ये रामभाअूंनी 'विविधज्ञानविस्तार' हें मासिक आपल्या कांही विद्वान मित्रांच्या साहाय्याने काढिलें. या मासिकांत व चिपळूणकरांच्या निबंधमालेंत मराठी भाषेच्या अुत्तेजनार्थ अनेक लेख येत असत. हे दोघे संपादक परस्परांची योग्यता जाणून होते. मालेच्या पहिल्याच अंकांत 'विस्ताराची भाषा शुद्ध असते' अित्यादि प्रशंसोद्गार संपादकांनी काढले आहेत. अुलट, 'आमची पाठ राखण्यास आम्हांहून विशेष गुणी अशा निबंधमालेस परमेश्वराने निर्माण केलें आहे हें पाहून स्वदेशसेवेचें आमचें व्रत आमच्या पश्चातहि चालेल हें पाहून आम्हांस आनंद होत आहे' अशा शब्दांनी मालाकाराविषयी आपला अुदार अभिप्राय रामभाअूंनी प्रकटिला आहे. रा. राजाराम रामकृष्ण भागवत यांच्याशींहि रामभाअूंचा लेखालेखी वाद दीर्घकाल चालू होता. तरी पण त्यामुळे या दोन विद्वानांच्या स्नेहांत मुळींच अूनता आली नाही. मनाचें औदार्य तें हेंच. मतभेदाचा विषय सोडून अितर विषयांत असलेलें मतैक्य लक्षांत आणून थोर मनाचे विद्वान असेच अेकमेकांशीं मित्रत्वाने वागतात.

**४ मराठीची प्रगति—** प्रस्तावनेंत आंग्लशाहीच्या आरंभीं सरकाराने व विविध मासिकांच्या संपादकांनी मराठीच्या वृद्धीसाठी केलेले प्रयत्न संकलितरूपाने दिले आहेत. त्यावरून दिसतें की १८१३ या वर्षी ओस्ट अिंडिया कंपनीला सरकाराने दिलेल्या सनदेंत मराठी वाङ्मयाचें पुनरुज्जीवन व अुन्नति यांवर विशेष लक्ष देण्यास बजाविलें आहे. अेतदनुसार कांही संस्था सरकारच्या मदतीने अस्तित्वांत आल्या व त्यांनी आपापलें काम यथाशक्ति केलें. १८५७ या वर्षी मुंबअी विश्वविद्यालयाची स्थापना झाली. तींत मराठी भाषेचा प्रवेश बी.अे. पर्यंत झाल्याने मराठीला अुत्तेजनच मिळालें. परंतु पुढे मराठीसारख्या प्रांतिक भाषांवरील सरकारचें लक्ष कमीकमी होअूं लागलें आणि १८६७ मध्ये सर फिरोजशहा मेहता यांनी 'मुंबअी प्रांतांतील शिक्षणपद्धती' या विषयावर वाचलेल्या निबंधांत प्रांतिक भाषांची अवहेलना दिसून येते. येथून या भाषांच्या अुत्तेजनास सरकारकडून द्रव्यसाहाय्य फारच आखडण्यांत आलें.

अर्थात् मराठीच्या अुत्कर्षाचें काम लोकांसच हातीं घेणें प्राप्त झालें. येथे लिहिण्यास आनंद वाटतो की या वेळीं रामभाअूंसारखे कर्तव्यनिष्ठ विद्वान पुढे आले व त्यांनी मराठी भाषेच्या अभिवृद्धींत कांही कमी पडूं दिलें नाही. दिग्दर्शन नांवाचें पहिलें मराठी मासिक रा. जांभेकर यांनी काढलें. तेव्हापासून अनेक मासिकें व अन्य नियतकालिकें यांची माला अखंड चालू आहे. हा मराठीच्या अभिवृद्धीचा तत्कालीन संकलित अितिहास या प्रस्तावनेंत वाचावयास सांपडतो. हा सर्व अितिहास मुळांतूनच वाचावा अशी मराठी भाषकांस मी विनंती करितों.

## गुंजीकरांचे लेख

**५ सामान्य—** या लेखांनी स्थूल मानाने ४५० पानें व्यापिलीं आहेत. त्यांत १५० पानें सामान्यतः भाषाविचार, कानडी भाषा, बंगाली भाषा अित्यादि विषयांनी भरलीं आहेत. ५० पानांत त्यांनी रचलेलें व्याकरण आहे. ५० पानांत मराठीची लेखनपद्धती, लेखनशुद्धि म्हणजे सामान्यतः शुद्धलेखन आहे. राहिल्या २०० पानांत सामान्य व्याकरणविचारावर ५० पानें आहेत; तर १५० हून अधिक पानें रामभाअू-जोशीकृत व्याकरणावरील टीकात्मक लेखांनी भरलेलीं आहेत. भाषाविषयक लेखांत गुंजीकरांच्या मार्मिक बुद्धीचा आणि विस्तृत वाचन व व्यासंग यांचा प्रत्यय पदोपदीं येतो. व्याकरणांत त्यांचे प्रौढ विचार, सूक्ष्म दृष्टि आणि प्रतिपादननैपुण्य आढळतें. व्याकरण हा विषय तर्ककर्कशबुद्धि, दीर्घाभ्यास आणि भाषेचें सूक्ष्म अवलोकन यांच्या साहाय्यानेच सम्यक् आकलन करतां येतो. (अितरहि भाषा आल्यास 'अधिकस्याधिकं फलं' हें अुघडच आहे.) तो विशद करून सांगण्यासहि या गुणांची अपेक्षा असतेच. शिवाय, संस्कृत भाषेप्रमाणे मराठी भाषा ही स्थिर नसून वर्धिष्णु असल्याने तिचें व्याकरणहि वेळोवेळीं सूक्ष्मतः का होअीना पण बदलणारें आहे. तशांत पाणिनीच्या तोडीचा ग्रंथकार अितर कोणत्याहि भाषेस व त्यांतच मराठीसहि लाभला नसल्याने तिच्या व्याकरणांत मतभेदास व बदलासहि जागा असणारच. यामुळे मराठीचें कोणतेंहि व्याकरण पूर्वपिढीच्या व्याकरणांहून थोडेंबहुत निराळें असणार. विशेषतः या अुत्तरोक्त कारणामुळे आज गुंजीकरांचीं कांही मतें प्रामादिक ठरणें साहजिक आहे. ही गोष्ट लक्षांत घेअून, त्यांचे कांही दोष खालीं दाखविले आहेत त्यांकडे अुदार दृष्टीनेच वाचकांनी पाहावें. अेवढा प्रस्ताव करून परीक्षणाकडे वळतों.

खाली कांही अभिनंदनार्ह मतें, कांही प्रमाद, कांही अनवधानदोष, कांही ठिकाणीं मतभेद, कांही ठिकाणीं संदेह, कोठे पृच्छा, कोठे शंका दर्शविल्या आहेत. या सर्वांचा विचार करूनहि वाचकांस असेंच वाटेल की, गुंजीकर हे खोल ज्ञानाने, दृढ व्यासंगाने आणि सूक्ष्म तर्कबुद्धीने युक्त असेच विद्वान होअून गेले; व त्यांस असेंहि वाटेल की असा जाडा पंडित मराठीस अधिक काळ लाभला नाही हें त्या भाषेचें व आपलें तिच्या पुत्रांचें दुर्दैवच होय.

**६ विविध विषय—** प्रस्तुत लेखखंडांत मुख्यतः भाषाविचार आहे. यांत काव्यविचार, प्राचीन लिपी, लघुलिपी, संस्कृत वर्णमाला, बंगाली भाषा, कानडी भाषा यांवर लेख आले आहेत. या लेखांचें परीक्षण येथे सोअीचें नाही व शक्यहि नाही. करितां वाचकांनी हे लेख मुळांतूनच वाचावे. येथे भाषाविचारांत अग्रमान पावणारे व्याकरण, शुद्धलेखन अित्यादिविषयक लेखांचाच विचार प्रामुख्याने केला आहे.

**७ योग्य विचारसरणी—** (क) विभक्तीवरून कारक कीं कारकावरून विभक्ति? व्याकरणाची खटपट वाक्यांतील शब्दांचा अर्थ लावण्यासाठी असते. अर्थात् 'अमक्या रूपाचा अर्थ काय?' हें ठरवणें व्याकरणाचें ध्येय आहे. म्हणून विभक्तिरूपें प्रथम सांगून नंतर त्या-

त्या विभक्तिरूपाचें क्रियेशीं नातें म्हणजेच (अर्थ =) कारक सांगण्यांत येतें— अर्थात् हें कारक समजल्यानंतर 'ही विभक्ति कोणती?' ही चर्चा करण्याचें कारणच अुरत नाही. अशा प्रकारची विचारसरणी पान ३०५ मध्ये आढळते. संस्कृत व्याकरणांतहि अमक्या **विभक्तीचीं** अमुक **कारकें** असें सांगितलेलें असतें. हीं कारकें **प्रथमा, द्वितीया, तृतीया** अित्यादि विभक्तींच्या क्रमाने दिलेलीं असतात. अमुक कारक असतां अमुक विभक्ति समजावी, म्हणजे कारकावरूनच विभक्ति मानावी, असें विधान संस्कृतांत कधी आढळत नाही.

(ख) पान २०८— बिंदूचा अुपयोग त्रिविध सांगितलेला आहे. (१) **संवाद** अित्यादि शब्दांत बिंदूचे स्थानीं अितर योजना संभवतच नाही. (२) **संकेत** अित्यादि स्थानीं पंचमवर्ण संभवला तरी, त्याचे स्थानीं बिंदु योजण्यांत सोपेपणा आहे. (३) कां, गांव अि० शब्दांत अनुनासिकत्वाचा बोध बिंदूपासून होतो.

(ग) पान २०९— कंठोष्ठस्थान, पुल्लिंग हीं दोन्ही रूपें अुपयोगार्ह आहेत. पहिलें रूप कंठौष्ठस्थानाप्रमाणे बोजड नाही म्हणून, व दुसरें रूप मराठींतील अुचारास सर्वस्वीं अनुसारी आहे म्हणून.

(घ) पान २१९— सर्वनामांचें विशिष्ट लक्षण म्हणून **अनियमित विभक्तिकार्य** असें लेखक सांगतात. हें लक्षण सर्वस्वीं योग्यच आहे.

(ङ) व्याकरणांत लिंग या शब्दाचा प्रयोग गुजराथी लोक अशिष्ट मानतात; व त्याचे स्थानीं 'जाति' हा शब्द योजितात. पण, लेखकाच्या म्हणण्याप्रमाणे, लिंग शब्दांत अशिष्टतेचा वास मानण्याचें कारण नाही. शास्त्रीय परिभाषेंत योजावयाच्या शब्दाचा **वाच्य अर्थ** लक्षांत घेतला म्हणजे पुरे. लिंग या शब्दाचा वाच्यार्थ चिन्ह असाच आहे. संन्याशाच्या हातांत दंड असतो म्हणून 'दंड हें संन्याशाचें लिंग होय'. त्याचप्रमाणे 'शेंडी हें हिंदूचें लिंग' असें म्हणण्यांत अश्लीलता मुळींच नाही. कांही लोक स्वभावतःच अश्लीलप्रिय असल्याने ते लक्षणेने साध्या, सोवळ्या शब्दामधूनहि अश्लील अर्थ काढितात. पण त्यांच्या अर्थाकडे शास्त्रकाराने दुर्लक्षच करणें योग्य आहे. गंगाप्रपातान्तविरूढशष्पम् । या चरणांत कालिदासाने **कोमल तृण** या अर्थी शब्द योजिला आहे. पण, अशिष्ट लोक या शब्दाचा भलताच अर्थ घेतात. म्हणून शष्प शब्द दूषित होत नाही. अशाच दृष्टीने लिंग हा शब्द व्याकरणांत शिरण्यास अयोग्य ठरत नाही.

(च) **ऱ्हस्वान्त संस्कृत नामांचें लेखन**— (३५७) 'रुचि, कृति, हरि, विधि असले ऱ्हस्व अिकारान्त संस्कृत शब्द मराठींत ऱ्हस्वान्तच समजावे; मात्र हे सामान्य रूपांत दीर्घ होतात अेवढें म्हणावें' असा योग्य मार्ग गुंजीकर अंगिकारितात. याच्या अभावीं हे शब्द मूळचेच दीर्घान्त मानिल्यास, तेली-चें सामान्यरूप तेल्या होतें त्या धर्तीवर, यांचें भलतेंच सामान्यरूप प्राप्त होअील. तसेंच नदी-चें बहुवचन नद्या, यांच्या साम्याने यांचीं बहुवचनें कर्णकठोर बनवावीं लागतील. हे दोन्ही दोष लेखकाच्या युक्तीने टळतात; शिवाय हे शब्द ऱ्हस्वान्त मानिल्याने समासांतहि कविमत, मतिविकार येथल्याप्रमाणे ऱ्हस्वान्तच राहतील. येथे मी अेवढेंच सुचवितों कीं अुचारानुसार या सर्वांचीं **प्रथमारूपेंहि सामान्यरूपांप्रमाणे दीर्घान्तच** लिहावीं. अर्थात् हे शब्द केवळ कोशांत ऱ्हस्वान्त दाखवावे म्हणजे यांचीं (क) दोन्ही प्रथमावचनें व (ख) सामान्यरूप हीं दीर्घान्त होतील, आणि समासाच्या पूर्वावयवस्थानीं मात्र हे ऱ्हस्वान्त राहतील. कविः, मतिः या विसर्गान्त रूपांवरून प्रथमैकवचनें आलीं असल्याने

त्यांच्या अन्त्य स्वरास, विसर्गाभावीं आपलें गुरुत्व राखण्यास दीर्घ बनण्याचा सर्वथा अधिकार आहेच. अशा रीतीनें अन्त्य स्वराचें दीर्घत्व अेकवचनांत सिद्ध झाल्याने बहुवचनांत तें मुतरां येणारच. सारांश, या शब्दांस मराठींत केवळ प्रातिपदिक म्हणून किंवा समासपूर्वावयव म्हणून या दोनच ठिकाणीं ऱ्हस्व राहण्याचा अधिकार आहे.

८ **मतभेद**— (क) पान ३११ वर **भावाशीं** अित्यादि ठिकाणीं **शीं** हें अव्यय आहे असें लेखक म्हणतात. नुसता **शीं** अैकल्यापासून कोणताच बोध मनास होत नाहीं. **पासून** हा शब्द नुसता अैकला तरी कांहीं अर्थ मनांत येतो; म्हणून पासून हा प्रत्यय नसून अव्यय आहे. याच्या अुलट अर्थबोधाभावीं **शीं** अव्यय नसून प्रत्यय आहे.

(ख) नामाच्या पोट-जाति— पान २२६ मध्ये नामाचे भेद सामान्य, विशेष, भाववाचक आणि सर्वनाम असे दिले आहेत. मला वाटतें, पुढील पोटजाती योग्य होतील. 'ज्याविषयी कांहीं बोललें जातें तें नाम' अशी नामाची व्याख्या सर्वसंमत आहे. येथे **जें** याने **व्यक्ति** किंवा **धर्म** यांचें ग्रहण होतें. या दोन प्रकारांस अनुसरून नामांचे वर्ग पुढीलप्रमाणे पडतील.

(१) केवळ व्यक्तीचा बोध करणारें **विशेष नाम**— रामा, पुणें, गंगा. (२) **भाववाचक नाम** केवळ धर्म सांगतें— विद्वत्ता, विस्तार, वाहणें अित्यादि भावनामें होत. (३) अनेक व्यक्ति आणि तद्गत सामान्य धर्म या दोहोंचा बोध **सामान्य नाम** करितें. पुरुष, गांव, नदी अित्यादि सामान्य नामें होत. (४) **द्रव्यनाम** (Material noun) सामान्य नामाप्रमाणेंच धर्मांचा बोध करितें; पण सामान्यनाम व्यक्तींचा बोध करितें, तर याचें अधिष्ठान व्यक्तींत विभागलेलें नसून अपरिच्छिन्न अशा आकाराचा पसारा असतो.

भावनामापासून केवळ धर्माचा बोध होतो; पण कोणत्याच व्यक्तीचा बोध होत नाही. (क) (बेसनाचे) लाडू सामान्यनाम, बेसन द्रव्यनाम, गोडी भाववाचक नाम; (ख) भाकरी सामान्य नाम; पीठ द्रव्यनाम; पोपण भावनाम; (ग) नदी सामान्यनाम; पाणी द्रव्यनाम; थंडपणा भावनाम. शिवाय द्रव्यनाम व भावनाम केवळ अेकवचनीच असतात; सामान्यनामास दोन्ही वचनें असतात. अर्थाची दृष्टि सोडून वाक्यांतील रूपांची बनावट विचारांत घेतल्यास **अनियमित चालणारीं सर्वनामें** यांचा निराळा वर्ग होअील; म्हणजे नामांचें वर्गीकरण पुढीलप्रमाणे दर्शवितां येअील.




(ग) **विषयातिक्रम**— विषयप्रतिपादनाच्या ओघांत आपलें प्रतिपाद्य काय हें विसरून लेखक भलत्याच क्षेत्रांत संचार करूं लागतो. पान २३७ मध्यें आकारान्त पुल्लिंगी शब्द म्हणून गोपा, सोमपा, शंखध्मा, धूम्रपा (? धूमपा) दिले आहेत. प्रत्यक्ष संस्कृत व्याकरणांतसुद्धा यांचा प्रवेश संशयितच आहे. मग तो मराठींत कशाला? पान २६३ मध्येंहि हाच दोष आहे

(२३९) चूर्णि, पौलि, (२३८) कवि, वर्तनि, (२३९-४०) विदु, मयु, (२४४) क्षेमन्, महस् अित्यादि शब्दांना वास्तविक पाहतां मराठी व्याकरणांत मुळींच स्थान नाही.

**९ शंका**— अुत्सव याचें तद्भव रूप अुच्छव असेंहि आढळतें. येथे, मला वाटतें, त्स् या जोडाक्षरांत केवळ दंत्यत्व असल्याने त्याचे स्थानीं आलेला च्छ् यामध्येहि दंत्यत्व यावें. अर्थात् येथील च्, छ् दोन्ही शुद्ध तालव्य नसून दंत्यतालव्यच असणार. तेव्हा मराठींत 'दंततालव्य' छ् नाही, हें लेखकाचें म्हणणें चिन्त्य दिसतें (२०९).

**१० भ्रांत विचारसरणी**— (क) (पान ४३७) 'मराठींतही ब्राह्मण, चिह्न असाच घटकांचा क्रम संस्कृतानुसार ठेवावा.' माझ्या मतें हें चूक आहे. **'न्हावी म्हणाला'** या शब्दांतीलच अुचार क्रमानें चिन्ह व ब्राम्हण यांत आहेत. असें असतां म्हणजे **अुच्चार अेकच असतां लेख भिन्न** कां असावा? येथे संस्कृतास अनुसरल्यास अुच्चाराशीं विसंवाद अुत्पन्न होतो; व संशयालाहि जागा होते. यामुळे (म्ह हा) अेकच अुच्चार भिन्न आकारांनी दर्शित होणार; व (ह्म हा) अेकच आकार (ब्रह्मन् या संस्कृत शब्दांत, आणि ब्राम्हण या तद्भव शब्दांत) भिन्नभिन्न अुच्चार बोधित करणार. विद्यार्थी विचारील, "गुरुजी, 'म्ह' हा अुच्चार म्हणाला व ब्राम्हण या दोन्हींतहि आहे. असें असतां तोच अुच्चार अेका ठिकाणीं 'म्ह' आणि अन्यत्र 'ह्म' असा कां दर्शवावा? असें अुच्चाराविरुद्ध लेखन कोणत्या शब्दांत करावयाचे त्यांची यादी तरी सांगा." अशा रीतीने परंपरेच्या वृथा अभिमानाने लेखनाने अुच्चारास दगा देणें योग्य नाही.

(ख) परिभाषा-प्रमाद— पान १६३ कर, म्हण, समज अित्यादि धातूंस द्विकर्मक म्हटलें आहे. पण संस्कृतांत हे धातु अेककर्मकच गणले आहेत. बलिं याचते वसुधाम्-यांतील याच् धातूसारखेच धातु द्विकर्मक समजतात. अर्थात् द्विकर्मक धातु हा लेखकाचा प्रयोग संस्कृताविरुद्ध असल्याने सर्वस्वीं अपवादार्ह आहे. पान १६४ मध्ये 'पंडित तूं आहेस' हें वाक्य कसेंहि फिरविलें तरी, येथील क्रियापद तृतीयपुरुषी होअूं शकत नाही. असाच प्रकार तर्कशुद्ध असल्याने सर्वच भाषांत असणार. तरी पण लेखक म्हणतात हा मराठीचाच विशेष आहे. अर्थात् हें लेखकाचें म्हणणें भ्रांत आहे.

(ग) पान ३९०— 'हरी सापाला भ्याला' असें वाक्य देअून **भी** हा धातु सकर्मक व **सापाला** हें त्याचें कर्म असें सांगितलें आहे. पण हें चूक आहे. 'हरीने साप भ्याला' असा प्रयोग जोपर्यंत होत नाही तोपर्यंत भी धातु अकर्मकच मानिला पाहिजे.

**११ शुद्धलेखन**— या खंडांत व्याकरणविषयक लेखांत शुद्धलेखनास बरेंच महत्त्व देण्यांत आलें आहे. त्यांतहि शब्दान्तीच्या अनुस्वारावर पुष्कळच भर आहे; व तो योग्यहि आहे. ते कुत्रे आले (३४) अशा वाक्याचे अनुस्वारांच्या भावाभावाने दोन अर्थ संभवतात. करितां येथे 'अेक कुत्रें आलें' किंवा 'अनेक कुत्रे आले' हा भेद दर्शविण्यासाठी विवक्षित अर्थानुसारच बिंदूचा अुपयोग करावा असें लेखक म्हणतात; व तें प्रथमदर्शनीं योग्यहि भासतें. पण, मला वाटतें, **अर्थभेददर्शन** हें काम शुद्धलेखनाच्या कक्षेबाहेरचें आहे. 'पाट लाव' अशा ठिकाणीं पाट म्हणजे काय — पाण्याचा, लाकडाचा कीं म्होतुराचा पर्यायभूत? या शंकेचें निवारण करण्यास शुद्धलेखन असमर्थ आहे. संस्कृतांतहि भेदर्शनाचा भार लेखनावर टाकीत नाहीत. 'अुचरद्भूरिकीलालः शुशुभे वाहिनीपतिः।' (ज्यांतून पुष्कळ **कीलाल** अुडत आहे असा **वाहिनींचा** राजा शोभला) या वाक्यांत कीलाल-चे अर्थ पाणी व रक्त असे दोन होतात. वाहिनी-चे अर्थहि नदी व सेना. या भिन्न-भिन्न अर्थानुसार प्रस्तुत वाक्य द्व्यर्थी आहे. याचा

कोणता अर्थ घ्यावा हें ठरविण्यासाठी लेखनांत कांहीच व्यवस्था नाही. ही अर्थाची निवड संदर्भावरच सोपविण्यांत येते. यावरून जाणावें की अर्थभेददर्शनासाठी लेखनांत बदल करण्याचें कारण नाही. स्वतः गुंजीकर यांनीहि याच पुस्तकांत (पा. ३४७) म्हटलें आहे की होडी आणि अभिधान या दोन्ही अर्थांचा बोधक 'नाव' हा शब्द असला तरी कोणत्याहि अर्थांत त्याचें लेखन 'नाव' असें अेकविध बिंदुरहित करावें. अर्थात् 'तो मूर्ख असल्याने नाव बुडवील' अित्यादि ठिकाणीं 'नाव'चा कोणता अर्थ घ्यावा हें संदर्भासच विचारावें असेंच गुंजीकरांचें म्हणणें असणार. फिरून भेददर्शनार्थ अनुस्वार चालेल असें पान ३५६ मध्यें अर्धवट म्हणतात. तरीपण अेकंदरींत पाहतां **अर्थभेदासाठीहि बिंदु योजूं नये** याच गोष्टीकडे त्यांचें मन झुकतें. अेतदर्थ पुरावा (पान ३५१) 'कोणी आलें होतें काय? दार कोणीं अुघडिलें?' या वाक्यांत 'कोणी' हा शब्द क्रमाने प्रथमेंत व तृतीयेंत आहे. तरी पण येथे अंतीं बिंदू देअूं नये असें ते प्रतिपादितात. त्यांचें म्हणणें— 'यासारख्या समानोच्चारशब्दांमध्यें अर्थभेदास्तव बुद्धया सूक्ष्म अुच्चारभेद कल्पून, तो ध्यानांत ठेवून अुच्चारणें व मोठ्या प्रयत्नाने लिहिण्यांत दाखविणें हें काठिन्य आणणारें असल्याने सर्वथा वर्जावें'; अर्थात् कोणी हा शब्द निरनुस्वार लिहावा. तोच प्रकार 'नाव' या शब्दाचा होय.

विद्यमान मराठी भाषेंतील अनुस्वार बरेचसे कोकणस्थांनी आणिले या प्रवादाचें खंडन राममाअूंनी केलें आहे. चिंतामणराव वैद्यांचेंहि मत असेंच आहे. महानुभावांचें लेखन, ज्ञानेश्वरी अित्यादि जुन्या वाङ्मयांतहि व्युत्पत्तीने निर्मूल असे पुष्कळ अनुस्वार आढळतात.

**भेददर्शन व अनुस्वार**— तत्त्वदृष्ट्या अनुस्वार अुच्चारानुसारी असावा, जेथे अैकूं येअील तेथे द्यावा, अन्यत्र देअूं नये. कांही ठिकाणीं अर्थभेद दाखविण्यास अनुस्वार अुपयुक्त होतो हें खरें; तरी अनुस्वार भेददर्शनासाठी आला नाही, हें तितकेंच खरें आहे. कोणत्याहि भाषेची रूपसंपत्ति तिच्या अैतिहासिक परिस्थितीनुसार बनलेली असतें. 'घोडा धावतो, घोडें धावतें, घोडी धावते' या तीन वाक्यांत क्रियापद, अन्त्यस्वर व अनुस्वार यांचे द्वारा कर्त्याचें लिंग सांगत आहे. पण यावरून असें म्हणतां येणार नाही की **कर्त्याचें लिंग सांगणें** हें क्रियापदाचें काम आहे. प्रस्तुत ठिकाणचीं क्रियापदें (participle) अुपाख्यातावरूनच बनलीं असल्याने तीं सलिंग आहेत; व म्हणूनच लिंगबोधन करितात. अुलट, 'घोडा धावेल', 'घोडें धावेल', 'घोडी धावेल' यांतील क्रियापद अुपाख्यातावरून आलें नसल्याने तें स्वतःच निर्लिंग आहे; मग दुसऱ्याचा लिंगभेद तें कसा करणार? सारांश, अेखाद्या रूपाने कोणता धर्म सांगून अर्थभेद दर्शवावा हें त्याच्या अैतिहासिक घटनेवरून ठरतें. म्हणजेच रूपांच्या अंतीचा अनुस्वार यादृच्छिक आहे, भेदबोधनार्थ आलेला नाही, हें स्पष्ट होतें. या गोष्टीवरून पाहतां, अनुस्वार अर्थभेदार्थ प्रवृत्त झाला नसल्याने केवळ अर्थभेदासाठीच तो न योजणें हें बरें.

**१२ दर्शित प्रमाद**— रा. जोशी यांचे व्याकरणाचे दोष गुंजीकरांनी ठिकठिकाणीं दाखविले आहेत. अलीकडे तें व्याकरण अस्तोन्मुख झालें असल्याने त्याची चिकित्सा येथे करणें विशेष अुपयुक्त नाही. केवळ नमुन्यासाठी थोडे येथे दाखवितों. पान २१० मध्यें जोशी म्हणतात— (क) "संधि संस्कृत शब्दांत **मात्र** होतात व केव्हां-केव्हां शुद्ध मराठी शब्दांतहि होतात." या विधानांत **मात्र** हा शब्द अन्यांचें वर्जन करितो; तर ही हा अन्यांचा समावेश करितो. अर्थात् अेकाच विधानांत या दोन विरुद्धार्थ शब्दांचा प्रयोग योग्य नाही. (ख) पान २२२—रा. जोशी म्हणतात "विशेषणें प्रातिपादिकाचा **अर्थ मर्यादित** करितात."

पण हा भ्रम आहे. विशेषणामुळे प्रातिपदिकाच्या अर्थात भरच पडते, त्या प्रातिपदिकाची व्याप्ति कमी होते. अर्थात् येथें जोशांच्या म्हणण्यांत व्याप्ति व अर्थ यांचा घोटाळा झाला आहे.

१३ स्वविरोध— (क) पान १४१ — कठोर वर्णांस खर् अशी संज्ञा आढळते. हीं पाणिनिमतानुसारी आहे. हिला प्रतियोगी म्हणून अितर वर्णांस मृदु ही संज्ञा दिली आहे. ही अुत्तरोक्त संज्ञा थेट आंग्लपद्धतीस अनुसरते. पुढे १४३ पानामध्येंहि खर् आणि मृदु अशी विजोड जोडी आढळते. कदाचित् या दोन्ही ठिकाणीं खर असा शब्द अभिप्रेत असल्यास येथे तादृश दोष नाही. दोन्ही संज्ञा आंग्लानुसारी ठरतील अेवढेंच. पण पान २०७ मध्ये कठोर आणि मृदु या संज्ञांस लेखकाने दोष दिला आहे; आणि श्वासवर्ण व नादवर्ण या संज्ञा प्रयोगार्ह असें स्पष्ट सांगितलें आहे. येथे लेखकाने कठोर, मृदु या संज्ञा अेकदा स्वतःच प्रयोजिल्या आहेत, व पुढे त्याच योजनेचा अुपहास केला आहे.

(ख) (पान १५५) या प्रकारचीं रूपें क्रियापदांवरून होतात. पान ३७१— नाम, विशेषण, अव्यय आणि धातुशब्द असे चतुर्विध शब्द दिले आहेत. पान ३८६ मध्येहि धातुशब्द असाच प्रयोग आहे. मात्र याच धातुशब्दाच्या स्थानीं पान १५५ मध्ये क्रियापद आढळतें. ही अुघड धरसोड आहे. अशी धरसोड शास्त्रीय ग्रंथांत दोषार्ह आहे. असा दोष स्वयंकृत असूनहि पान २१८ मध्ये धातुस्थानीं क्रियापद योजिल्याबद्दल जोशांना दोष दिला आहे.

१४ व्युत्पत्तिदोष—(क) पान २५५ मध्ये पत्रावळ, जेवणावळ अित्यादि शब्द (पंक्ति या अर्थाच्या आवली या शब्दापासून बनलेला) आवळ हा प्रत्यय अंतीं धारण करितात. हें म्हणणें अव्याप्त आहे. शब्दांतीं भासणाऱ्या (वल अथवा) आवळ या प्रत्ययाची मुळें चार आहेत—(१) भांडवल याचा मूळ अर्थ भांड म्हणजे व्यापाराचा पदार्थ, त्याचें मूल्य किंवा किंमत; हा शब्द अुत्तरावयव मूल्य या नपुसकलिंगी शब्दानुसार नपुंसकलिंगी आहे. दळणावळ, लिहिणावळ, शिवणावळ अित्यादि शब्दांतीलहि प्रत्यय मूल्य वरूनच आला असावा. परंतु पत्रावळ अित्यादि शब्दांच्या साम्यभ्रमाने या शब्दांचें रूप व लिंग पत्रावळ शब्दाप्रमाणे बनलें असावें. या साम्यभ्रमास अिंग्रजींत false analogy म्हणतात. या शब्दांवरून पाहतां खाणावळ याचा मूळ अर्थ 'अन्नाची किंमत' असा असावा. नंतर लक्षणेने तो शब्द स्थान-वाचक बनला असावा. (२) पत्रावळ हा शब्द पत्र + आवलि असा बनलेला असावा. याच अनुमानास विस्तरी या त्याच्या पर्यायाने पुष्टि मिळते. (३) मुंडावळ या शब्दाचे घटक मुंड + माला असे असून त्याचा अर्थ विवाहादि शुभप्रसंगीं डोक्यास बांधावयाची फुलांची माळ असा आहे. याचें रूप साम्यभ्रमानेच मुंडावळ असें झालें आहे. (४) प्रभा + वलय याचें रूप प्रभावळ होतें आणि मूळचा अर्थ देवतांच्या मुखाभोवती पसरलेल्या तेजाचें वर्तुळ असा दिसतो. साम्यभ्रमाने येथेहि वळ हा भाग प्रत्ययासारखा भासतो. सारांश— शब्दांतीं आढळणारा (वल किंवा) आवळ पुढील चार मुळांवरून झालेला दिसतो;— मूल्य, आवली, माला, वलय.

(ख) गुंजीकर-ची व्युत्पत्ति— प्रस्तावना पान ५ मध्ये रा. प्रियोळकर म्हणतात 'कुंजवनापासून गुंजी हें नांव येणें भाषाशास्त्रास विरुद्ध आहे; कारण शब्दाच्या आद्य क्-चा ग् होत नाही.' मला वाटतें हें प्रस्तावकाचें म्हणणें चूक आहे. द्यूतकार-पासून निघालेल्या जुगार या शब्दांत 'क्'स्थानीं 'ग्' आला आहे. येथे कदाचित्, 'ग्' समासावयवाच्या आरंभीं आहे, शब्दारंभीं नाही; म्हणून हें अुदाहरण येथे लागू पडत नाही, असें कोणी म्हटल्यास त्याने

'गार' घ्यावी. हा 'गार' शब्द 'वर्षोपलस्तु करका' यांतील करका शब्दावरून आला आहे. हें अुदाहरण स्पष्ट सांगतें की शब्दाच्या आद्य 'क्'चा 'ग' संभवतो. 'गड' हा शब्दहि 'कटक' या शब्दावरून आला असल्यास, त्याचीहि साक्ष येथे पोषक होअील.

(१) पान ३५५ मध्ये लेखक म्हणतात— **लागोनीं**, लागोनियां अशा शब्दांतीं अनुस्वार अकारण दिला जातो. पण हें सत्य नसून कवि मोरोपंतांच्या लिखाणाचा त्यास आधार आहे.

(२) **सोवळें** हा शब्द (१२९) सुमंगल वरून साधिला आहे. यांत ग्-पासून व् बनला असें मानिलें पाहिजे. पण हें संभवनीय दिसत नाही. येथे समुज्ज्वल हें मूळ असावें. (१३०) **कांही** हा शब्द **कायही** यावरून व्युत्पादिला आहे. पण अपभ्रंशांत **कांअि** असें किम्-चें तद्भव रूप आढळतें. याच रूपांत (अपि>) हि मिळवून कांही हें रूप बनविण्यांत आलेलें दिसतें. (घ) (१३०) करींव, घडींव अित्यादि रूपांतील अनुस्वार निर्मूळ मानिला आहे. पण, मला वाटतें, हीं रूपें कृत्रिम-सारख्या रूपावरून आलेलीं असल्यामुळे त्यांतील अनुस्वार समूळ आहे. (ङ) पान ४१६— **खांब** या शब्दाचें मूळ स्तंभ नसून **स्कंभ** असें असावें.

१५ **योग्य लेखन**— पान १४५ मध्ये शुद्ध, **विठ्ठल** अशीं शुद्ध रूपें दिलीं असून यांत प्रचारांत येणारीं द्वित्तव्यंजन धारण करणारीं रूपें दूषिलीं आहेत. पान १४७- मध्ये 'शंकर, संताप, प्रचंड अित्यादि शब्दांत त्या-त्या ठिकाणचा पंचमवर्ण लिहूं नये; तर केवळ बिंदूच योजावा. वाराणसींतील जाडे वैयाकरणसुद्धा बिंदूच अुपयोजितात. तेव्हा मराठीने तो योजण्यांत प्रतिबंध कां असावा? शिवाय हा पंचमवर्ण वाचण्यास व लिहिण्यासहि कठीण असल्याने बिंदूच्यापेक्षा त्याच्या योगाने हानीच अधिक संभवते.' अशा रीतीने गुंजीकरांनी मराठी लेखकांचा व वाचकांचा अनुस्वारोच्चार दर्शविण्याचा मार्ग सोपा करून दिला आहे.

पानें २ व ७ यांमध्ये हीं हें अव्यय प्रस्तावकाने दीर्घ लिहिलें आहे. हें दीर्घत्व मराठी भाषेच्या अुच्चारास सर्वस्वीं अनुसारी असल्याने योग्य व अनुकरणीय असेंच आहे.

१६ **प्रामादिक लेखन**--(क) प्रस्तावना पान १ आणि ७ यांत 'सहाय्य' असा प्रयोग आढळतो. या ठिकाणीं शुद्ध रूप साह्य किंवा साहाय्य असें पाहिजे. पान ६- 'पिशाच', पान १०- 'घनश्याम' या शब्दांत क्रमाने च्च आणि विसर्ग यांचा अुपयोग करणें चूक आहे.

(ख) पान ४१ मध्ये 'प्रयोजनमनुद्दिश्य मंदोऽपि न प्रवर्तते।' हे पद्यार्ध... न मन्दोऽपि प्रवर्तते। असें पाहिजे. कारण (१) असा पाठ लोकांत आढळत नाही; (२) येथील पाठांत पि हें अक्षर वृत्तानुसार गुरु पाहिजे. पण तसें तें नाही.

१७ **मुद्रणदोष**— (क) पान १४६ 'ङ्, ण्, न् यांस द्वित्व होतें.' या ठिकाणीं द्वित्त असें पडलें आहे. (ख) भवान्+शूर यांचा संधि भवाञ्शूर असा दिला पाहिजे. (ग) प्रत्यङ्+आत्मा यांच्या संधींत दोन ङ् पाहिजेत, त्यांत ग् ला मुळींच स्थान नाही.

१८ **विचारदोष**— (क) पान २२ वर प्रस्तावक म्हणतात "पत्रकाराचें शुष्क वृत्त आणि निर्फळ अभिमान" हा लिहून आलेला मजकूर म्हणून प्रसिद्ध झालेला लेख राममांअूंचा असावा. पण हें म्हणणें चूक दिसतें. कारण **निर्फळ** असा अशुद्ध शब्द निष्फल-चे स्थानीं रामभाअूंच्या लेखणींतून अुतरेल हें संभाव्य दिसत नाही.

(ख) पान ५ वर म्हटलें आहे (प्रस्तावनेंत)— 'लक्ष्मीवाअीही आपल्या नांवाप्रमाणे आदर्श-गृहिणी होत्या.' यांतील दोन्ही विधानें स्वतंत्रतेने बरोबर आहेत. (१) रामभाअूंच्या मातेचें नांव लक्ष्मी होतें व (२) त्यांची संसारदक्षता कित्ता घेण्यासारखी होती. येथे मी अेवढेंच सुचवितों की सुगृहिणींचा आदर्श म्हणून लोकांत म्हणविण्याचा अधिकार अरुंधती, अनसूया, सीता, पार्वती अशाच सतींस आहे. संपत्तींत लोळणाऱ्या नटव्या लक्ष्मीला सुग्रणपणाचा मान देण्यास तिचें कोणतें कृत्य प्रमाण म्हणून पुढे ठेवितां येअील ? सारांश, लक्ष्मी आणि सुग्रणपणा यांचा मेळ घालण्याची खटपट व्यर्थ होय.

**१९ शिथिल वाक्यरचना**— प्रस्तावना पान १२ मध्ये पुढील वाक्य आहे. 'मुंबअींतील शेटसावकार व दुसऱ्या संभावित लोकांची अेक सभा मिळविली (= बोलाविली.)' या धर्तीची वाक्यें अलीकडे वारंवार आढळतात. पण हीं तर्कदुष्ट असल्याने प्रयोगार्ह नाहीत. 'व' हे अुभयान्वयी अव्यय समान वर्गाच्या म्हणजेच **तुल्यकक्ष घटकांना** जोडितें. दोन नामें, दोन विशेषणें, दोन नामवाक्यांश अित्यादि त्याने जोडले जातात. तसेंच, समान विभक्तींची रूपेंच तें जोडितें. अर्थात् यथासंभव व ने समुचित करावयाच्या घटकांची विभक्ति अेकच असली पाहिजे. प्रस्तुत वाक्यांत कोणते घटक जोडावयाचे आहेत ? शेटसावकार, दुसरे संभावित लोक. यांतील शेटसावकार प्रथमान्त आहेत, तर लोक षष्ठ्यन्त आहेत. अर्थात् हा विभक्तिभेद दूषणीय आहे. येथे शुद्ध रचना (१) शेटसावकारांची व दुसऱ्या संभावित लोकांची (२) शेटसावकार व दुसरे संभावित लोक यांची— अशी द्विविध होअील.

**२० मराठी व अितर भाषा**— (क) (पान ५२) 'परप्रांतात राहणाऱ्या महाराष्ट्रियांनी त्या त्या प्रांताची भाषा अुचलावी व त्या लोकांत स्नेहाने मिसळून वागावें. त्यांशीं व्यवहारांत तेथीलच भाषा बोलावी. मात्र आपल्या घरांत सर्व व्यवहार आपल्या मातृभाषेनेंच करावा' या रामभाअूंच्या म्हणण्यापासून दुहेरी लाभ होअील. महाराष्ट्रीय अितरांच्या डोळ्यांत खुपणार नाही, निदान कमी खुपेल; आणि त्याच्या पूर्वपरंपरेचें रक्षण होअील.

(ख) पान ११६ मध्ये लेखक म्हणतात— कानडीभाषकांनी मराठीवर बहिष्कार घातल्यास तिने आपण होअूनच आपल्या पायावर धोंडा पाडून घेतल्यासारखें होअील. हें येथील मत खरोखर आदरणीय दिसतें. मात्र येथे त्याचें समर्थन करीत न बसतां अेवढेंच पद्यार्ध देतों—

मीलन्ति यदि पद्मानि का हानिरमृतद्युतेः ? ।

**अर्थ**— कमलिनींनी जर आपलीं तोंडें मिटलीं तर त्यांत त्यांचीच हानि आहे; त्यामुळे अमृत वर्षणाऱ्या चंद्राची हानि काय होणार ?

(ग) कोंकणी भाषा (प्र० पान २९) मराठीचीच पोटभाषा आहे, ती स्वतंत्र नाही, असें स्पष्ट मत रामभाअूंनी दिलें आहे.

**२१ अुदार ध्येय**— गुंजीकरांच्या भाषाविषयक लेखांतहि स्वजनहित हें त्यांचें ध्येय वारंवार दिसून येतें. मातृभाषेच्या अभ्यासाचें अिष्टत्व प्रतिपादितांना ते लिहितात—(५) 'विद्वानांनी आपलें ज्ञान कितीहि वाढविलें तरी त्यांनी तें आपलें ज्ञान अज्ञ बंधूंस अवश्य दिलें पाहिजे. अेतदर्थ त्यांना समजेल अशाच भाषेंत तें देण्याची पात्रता त्यांनी अंगीं आणली पाहिजे. अर्थात् मातृभाषेचें सशास्त्र अध्ययन आणि तिच्या द्वारा आपले विचार दर्शित करण्याची हातोटी ही त्यांनी मिळविली पाहिजे.' या मातृभाषेच्या खोल अध्ययनापासून दुसराहि लाभ त्यांनी सांगितला आहे. (१८,३२) 'महाराष्ट्रियास मराठी भाषा शास्त्रशुद्ध आल्यास तो अल्पकाळांतच,

म्हणजे कांही महिन्यांच्या अवधींत, हिंदी, गुजराथी, बंगाली अित्यादि कोणतीहि मराठीची भगिनी-भाषा व्यवहारापुरती आत्मसात् करूं शकेल. याने देशांत कोठेहि व्यवहार करण्यास अशा मनुष्यास अडचण पडणार नाही. अर्थात् याने देशाच्या सामान्य व्यवहारभाषेचाहि प्रश्न बऱ्याच अंशीं सुटेल'. (पान ९) 'अिंग्रजी अित्यादि परकी भाषा शिकणें तर ती स्वभाषेच्या व्याकरणशुद्ध अध्ययनानंतरच शिकावी.' असें ते आग्रहाने सांगतात. यापासून पुढील लाभ होअील असेंहि ते यथार्थ प्रतिपादितात. ते म्हणतात– (पान ९) मराठीच्या सशास्त्र अध्ययनाभावीं, केवळ आंग्लभाषानिपुण पंडितास आपले विचार मराठीद्वारा सम्यक् प्रकटितां येत नाहीत; हें आपलें असामर्थ्य तो सरळपणें मान्य करीत नाही. अुलट, मराठी भाषाच विचारवहनास असमर्थ आहे असें म्हणूं लागतो आणि या मताच्या आग्रहाने दिवसानुदिवस तिच्यापासून दूर राहण्यांतच त्यास अभिमान वाटतो. (अलीकडे अशा विद्वानांची संख्या वेगाने कमी होत असल्याने येथील लेखकाचे विचार जीर्ण असे आज वाटतील; पण त्याच्या काळीं ते तसे नव्हते. आणि कोणत्याहि लेखाची किंमत तत्कालीन परिस्थितीनेच ठरवावी लागते. अर्थात्, आज असे लेख अितके महत्त्वाचे वाटले नाहीत तरी, त्यांच्या प्रकाशनसमयीं त्यांना विशेष महत्त्व होतें ही गोष्ट लक्षणीय आहे.) स्वविचारप्रदर्शनास असमर्थ असलेल्या अशा विद्वानाच्या हातून अज्ञास ज्ञानदान घडणार नाहीच. यामुळेहि असा विद्वान निंद्यच ठरतो. लेखक येथेच थांबत नाहीत. राज्यकर्त्यांसहि ते सरळ विचारतात (पान १६) 'तुम्हाला आम्हांवर राज्य करावयास पाहिजे. राज्य करण्यास परस्परांचें परस्परांस ज्ञान अवश्यक आहे. करितां आम्हीं किंवा तुम्हीं कोणीतरी दुसऱ्याची भाषा शिकली पाहिजे. आम्ही पडलों पुष्कळ, तुम्ही आहां थोडे. तेव्हा स्वल्प श्रमाची गोष्ट म्हणून तुम्हींच आमची भाषा शिकणें योग्य आहे. तुम्हांस आमचें राज्य तेवढें हवें; मग भाषा कां नको?' असा निरुत्तर कोटिक्रम ते अिंग्रजांपुढे मांडितात. असो. या सर्व प्रतिपादनामागे 'शाहणे करूनी सोडावे सकल जन।' हें रामदासोक्त ध्येय रामभाअूंनी आदरिल्याचें स्पष्ट दिसतें. आपला मराठी ज्ञानाचा पाया भक्कम असावा असें त्यांचें आग्रहाचें सांगणें आहे.

**२२ अुपसंहार**— याप्रमाणे प्रस्तावना आणि लेख यांचें परीक्षण यथावकाश केलें आहे. प्रस्तावकांनी रा. गुंजीकरांच्या काळाची माहिती आस्थेने विशद केली आहे. तीवरून व अितर वर्णनावरून रा. गुंजीकरांविषयी विशेष आदर अुत्पन्न होतो. त्यांचे सर्वच विचार अुदार व देशास हितकारक असे आहेत. विद्वानांचें कर्तव्य सांगण्यांत त्यांच्या मनाची तळमळ दिसून येते. ते विद्वानांस म्हणतात— (पान ४३) 'नुसते तुम्ही विद्वान होअून काय अुपयोग? जनतेंत आपल्या ज्ञानाचा प्रसार करणें हेंच तुमचें ध्येय असलें पाहिजे. या प्रसारासाठी तुम्ही मातृभाषाच चांगली आत्मसात् केली पाहिजे. साध्या मातृभाषेंतूनच मांडलेले विचार जनतेच्या मनास पोचतील व तेथें ज्ञान रुजवितील. अर्थात् मराठीचा सशास्त्र, खोल अभ्यास तुम्हीं केलाच पाहिजे.' त्यांची लोकसंग्रहेच्छा पुढील मतांत दिसून येते. कोंकणी भाषेच्या अभिमानी लोकांस ते सांगतात — पान ५२, प्र. पा. २९ ''तुमची मायबोली तुम्ही घरांत अवश्य बोला. पण मराठींतच तिचा समावेश शास्त्रीयदृष्ट्या होत असल्याने, ग्रंथभाषा म्हणून मराठीचा आश्रय करण्यांत तुम्ही कमीपणा मानूं नका.'' राजकीय, सामाजिक, आर्थिक अित्यादि अनेक कारणांनी अगोदरच विभागलेल्या आपल्या समाजांत भाषिक कारणांनी आणखी फूट पाडूं पाहणारांनी या म्हणण्याकडे लक्ष द्यावें अशी त्यांस विनंती आहे.

म. सा. प. (१५-२-११)

वरील दोन्ही प्रकारचा बोध घेऊन ते-ते लोक गुंजीकरांच्या ऋणांतून उतराई होतील काय ? येथे परीक्षण संपलें. तरीपण पुढील अेका गोष्टीचा अुलगडा याच लेखांत करणें अवश्य वाटतें.

पान ५८ मध्ये प्रस्तावक म्हणतात— 'आजच्या महाराष्ट्राला गुंजीकरांची विशेष माहिती नसावी याच्या मुळाशीं कृतघ्नता नसावी असेंच मला वाटतें' ह्या म्हणण्यांत सर्वथा वस्तुस्थितीच कथित आहे. मला व्याकरणविषयामध्ये प्राप्त झालेली दृष्टि विशेषतः गुंजीकरांच्याच विविधज्ञानविस्तारांतील लेखांपासून अुद्‌भवली असें माझें स्पष्ट म्हणणें आहे; व हें म्हणणें दहा वर्षांपूर्वीच प्रकाशिलेल्या 'मराठीचें अंतरंगदर्शन' या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत मी प्रविष्ट केलेलें आहे. अर्थात् हें पुस्तक प्रकाशित झालें नसतें तर बहुधा माझी कृतज्ञताबुद्धि मनांतच राहिली असती. माझें म्हणणें हें की गाजावाजा अैकूं येत नाही म्हणून, 'गुंजीकरांविषयीं विद्वानांत आदर नाही' असें कोणीं म्हटल्यास, तें त्याचें म्हणणें भ्रांत होय. खरी कृतज्ञता प्रसंगीं प्रकट झाल्यावांचून राहात नाही.

असो. अेक प्रकारें माझ्या गुरुस्थानीं असलेल्या रामभाअूंचें ऋण अभिप्रायद्वारा अंशतः तरी फेडण्याची संधि हे लेख रा. काशीनाथपंत गुंजीकर यांनी प्रकाशिल्यामुळे मला मिळाली याबद्दल त्यांचे आभार मानून आपला निरोप घेतों.

गो. कृ. मो.

## साहित्यशास्त्र

**मराठीचें साहित्यशास्त्र** (ज्ञानेश्वर ते रामदास)— ले० डॉ. माधव गोपाळ देशमुख, अेम्.अे., पीअेच्.डी.; प्रका० अुत्तमश्लोकमंडळ, अुमरखेड, वऱ्हाड; मूल्य रु.३.

प्रस्तुत ग्रंथांत डॉ. देशमुख यांनी ज्ञानेश्वरांपासून रामदासांपर्यंतच्या कवींच्या काव्याचें आलोचन करून, काव्यशास्त्रविषयक निरनिराळ्या अंगांसंबंधी त्यांचे विखुरलेले अुद्गार अेकत्र करून पुढील निष्कर्ष काढला आहे. 'मराठी संतकवींनी आपल्या काव्यमीमांसेंत 'भक्ति' हें काव्यतत्त्व सर्वंकष ठरवून आपल्या नव्या दृष्टीने संस्कृत साहित्यशास्त्राला अुजळा दिला व सर्वव्यापी भक्तितत्त्वाच्या आधारावर **प्रत्येक बाबतींत** अभिनव अशा विचारसरणीचें व बहुतांशीं स्वतंत्र असें **मराठीचें साहित्यशास्त्र** निर्माण केलें.' हा निष्कर्ष काढण्याआधी आणि त्याकरिता, डॉ. देशमुख यांनी जुन्या मराठी काव्यांचा परिश्रमपूर्वक अभ्यास करून त्यांतील काव्यशास्त्रपर विचारांचें टिपण केलें; जुन्या काव्यशास्त्रपर ग्रंथांचें परिशीलन केलें; आधुनिक मराठी काव्यशास्त्रपर ग्रंथांचा परामर्श घेतला; संस्कृत साहित्यग्रंथांविषयी अिंग्रजींत झालेले ग्रंथ पाहिले; अिंग्रजी टीकाशास्त्रावरील कांही ग्रंथांचाहि परिचय करून घेतला; नंतर संस्कृत काव्यशास्त्राच्या पद्धतीवर काव्यकारण, प्रयोजन, अलंकार, रेखा, भाव, रस अित्यादि विभाग पाडून या सर्वांविषयी जुन्या मराठी कवींस काय म्हणावयाचें आहे तें प्रत्येक वेळीं आधारांचा अुल्लेख करून सांगितलें; व शेवटीं अुपरिनिर्दिष्ट निष्कर्ष काढिला. अुपयुक्त माहिती टिपून जमा करण्यास लागणारी विवेचकता, चिकाटी आणि परिश्रम, ह्या माहितीची योग्य परीक्षा करण्यास लागणारी चिकित्सक दृष्टि, व सारी माहिती सुव्यवस्थितपणें मांडण्याचें कौशल्य या साऱ्या गुणांची साक्ष या ग्रंथांत पटते. डॉक्टरीच्या पदवीस योग्य असा हा ग्रंथ निर्माण केल्याबद्दल लेखकाचें

प्रारंभींच मनःपूर्वक अभिनंदन करावयास हवें. त्यामधील शेवटला निष्कर्ष मात्र असावा तेवढा निर्विवाद नाही असें वाटतें.

कोणत्याहि विषयाला शास्त्र ही पदवी प्राप्त होण्यास (१) **त्याचा विचार सांगोपांग व्हावयास हवा** ही गोष्ट सर्वमान्य होईल असें वाटतें. त्याची व्याप्ति व प्रयोजन, कारणें व साधनें, विभाग व वर्गीकरण, विधिनिषेध अथवा गुणदोषचर्चा व सार्‍यांस अेकत्र आणणारी सयुक्तिक विचारसरणी अित्यादि गोष्टी या विचारांत यावयास हव्या. (२) हें अितकें करावयाचें म्हणजे **सारें जाणिवेने व्हावयास हवें.** अेखाद्या विषयाचा सांगोपांग विचार करून त्या-संबंधी कांही सामान्य नियम आपण सांगत आहोंत अशी जाणीव लेखकाला असल्याविना त्याचें लेखन शास्त्रीय स्वरूपाचें होणार नाही. (३) तसेंच तो शास्त्रविचार अेखाद्या देशाविषयी अथवा भाषेविषयी होत असल्यास त्या शास्त्रांतील **प्रत्येक अंगाविषयी** त्या देशास वा भाषेस कांही **निराळें व स्वतंत्र सांगावयाचें आहे** असें स्पष्ट झाल्याखेरीज त्या देशापुरतें अथवा भाषेपुरतें तें शास्त्र स्वतंत्र आहे असें म्हणतां येणार नाही.

'मराठीच्या साहित्यशास्त्रा'विषयी असें कांही झाल्याचें वस्तुतः दिसत नाही. मराठींत साहित्यशास्त्रावर सहेतुकपणें फारशी रचना कोणीं केलीच नाही. नागेश-विठ्ठलांच्या रसमंजरी व निरंजनमाधव आणि रामजोशी यांचीं वृत्तविषयक पुस्तकें याशिवाय अितर रचना नांव घेण्याजोगीहि झाली नाही. या पुस्तकांनाहि स्वतंत्र अस्तित्व नाही व म्हणून डॉ. देशमुखांनी अेका विठ्ठलाखेरीज अितरांचा अुल्लेखहि केला नाही आणि विठ्ठलाचाहि अुल्लेख करण्यापलीकडे कांही म्हटलें नाही; हें ठीकच झालें. पण मराठींत साहित्यशास्त्रविषयक रचना सहेतुकपणें झाली नाही याची पूर्ण जाणीव असल्याने ग्रंथकारास कवि हेच खरे व अुत्तम टीकाकार अथवा साहित्यज्ञ असतात अशी कांहीशी आग्रहाची व सापवाद भूमिका घ्यावी लागली आहे. कांही कवि चांगले टीकाकार असतील किंवा कांही चांगले टीकाकार कवि असतील (अशीं किती अुदाहरणें सांपडतील तो भाग निराळा), परंतु प्रत्येक चांगला कवि हा चांगला टीकाकार असेल असें म्हणतां येअीलसें वाटत नाही. तथापि ही भूमिकाहि मान्य केली तरी त्यांनी सहेतुकपणें तरी काव्यचर्चा करावयास हवी ना? का अितर लेखनाच्या किंवा विवेचनाच्या ओघांत काही मुद्यांवरील आपलीं मतें त्यांनी जातां जातां प्रकट केलीं असलीं तरी त्याला शास्त्र म्हणावयाचें? हा आग्रहहि आपण सोडून देअूं, व अशा प्रासंगिक मतांतूनच अेकंदर काव्यविचारांवर आपलीं मतें मराठी कवींनी अितकीं विपुलपणें मांडलीं आहेत की त्यांवरून शास्त्रनिष्पत्ति सहज होअूं शकेल' अशी भूमिका स्वीकारूं. पण याहि पद्धतीने सांगो-पांग विचार आला आहे काय? रामदासांनी केलेल्या ढोबळ व विक्षिप्त वर्गीकरणाखेरीज काव्य अथवा कवि यांचे वर्ग अथवा भेद यांचा विचार पूर्वी झाला नाही, तीन चार अलंकारांच्या नांवांखेरीज अलंकारविचार आला नाही, गुणदोषांची चर्चाहि अशीच अत्यंत अल्प. देशमुखांना त्यावर स्वतंत्र प्रकरण लिहावेंसेंहि वाटलें नाही. रीतीबद्दल रेखा हा निराळा शब्द (व लेखकाच्या मताप्रमाणे अधिक चांगला शब्द) वापरण्यापलीकडे रीतिविचार नाही. शब्दार्थविचार नाही. सारांश, साहित्यविषयक बरींच अंगें मराठी कवींकडून दुर्लक्षित झालीं आहेत. हीहि भूमिका सोडून, 'हे विचार गौण आहेत; काव्यकारण, काव्यप्रयोजन अित्यादि अंगें अधिक महत्त्वाचीं व तेवढ्यावरहि कांही चर्चा झाली असली तरीहि काव्यशास्त्र होअूं शकतें' अशी भूमिका घेअूं. पण या बाबतींत तरी कांही मौलिक भेद व विचार असल्याखेरीज 'स्वतंत्र' साहित्यशास्त्र कसें होअूं शकेल? जुने आठ अथवा नअू रस हे मराठी कवींनाहि मान्य होते, त्यांचे आवडते

अष्ट सात्त्विक भाग संस्कृत साहित्यशास्त्रांत आहेतच, वामनाने दहावा म्हणून सांगितलेला भक्तिरस गोस्वामी व मधुसूदनसरस्वती यांनी मान्य केला होताच. काव्यकारणांत प्रतिभा, व्युत्पत्ति व अभ्यास या गोष्टी मराठी कवींनाहि संमत होत्या हें देशमुखांनी दाखविलें आहेच. मराठी कवींनी केलें तें अेवढेंच– काव्यकारणांत भगवत्प्रसादाचा अंतर्भाव व रसांत भक्तिरसाचा अंतर्भाव व त्याला प्राधान्य. अेवढ्याने त्यांनी संस्कृत साहित्यशास्त्राला झुगाळा दिला अथवा बहुतांशीं स्वतंत्र असें साहित्यशास्त्र निर्माण केलें असें होत नाही. हाहि विचार बाजूस टेवला आणि असें म्हटलें की काव्याकडे पाहण्याची त्यांनी अेक नवीन भक्तिरसप्रधान दृष्टि स्वीकारली व यामुळेच स्वतंत्र साहित्यशास्त्र निर्माण झालें असें म्हणण्याचा अधिकार अुत्पन्न झाला. हेंहि कितपत योग्य होअील ? संस्कृतांत क्षेमेन्द्राने औचित्याची अुपपत्ति मांडून ती साऱ्या अंगांना लावून दाखविली, अथवा कुन्तक व आनंदवर्धन यांनी वक्रोक्ति आणि ध्वनि या अुपपत्तींचा स्वीकार करून काव्याचीं विविध अंगें त्यामध्ये बसवून दिलीं. तरी त्यांनी नवीन व स्वतंत्र साहित्यशास्त्र निर्माण केलें असें कोणी म्हणत नाही. असा प्रयत्नहि मराठी कवींकडून झाला नाही, कारण सहेतुकपणें त्यांनी या बाबतींत कांहीच केलें नाही.

दुसरी गोष्ट अशी की संस्कृत टीकाकारांची दृष्टि काव्याकरिता काव्यविचार हीच होती. मराठीची ही दृष्टीच नव्हती. काव्य अथवा साहित्य हें भक्तिसुखाकरितां आहे म्हणजे साध्य नसून साधन आहे अशी त्यांची दृष्टि. कोणत्याहि शास्त्राकडे केवळ तन्निष्ठबुद्धीने न पाहतां तें दुसऱ्या कशाचें तरी साधन या बुद्धीने त्याकडे पाहिल्याबरोबर त्याचें स्वतंत्र असें शास्त्र निर्माण झालें असें कसें म्हणतां येअील ? रसायनशास्त्रविषयक पुष्कळ अुल्लेख जुन्या मराठी काव्यांत सांपडतात. ज्ञानेश्वरींतील अशा वचनांचा संग्रह 'ज्ञानेश्वरदर्शनां'तील अेका लेखांत झाला आहे. हे अुल्लेख अेकत्र करून मराठी संतांचे रसायनशास्त्रविषयक विचार वा माहिती आपल्यास कळेल. पण त्यांचें असें रसायनशास्त्र निष्पन्न होअील असें वाटत नाही. अगदी अीश्वरभक्तीचें साधन म्हणून अुपयोग केला तरीहि स्वतंत्र असें रसायनशास्त्र होणार नाही. साहित्यशास्त्राची गोष्ट थोडी निराळी असली तरी मुख्य सिद्धान्त बदलणार नाही. सारांश, अेखादा रस कमी अधिक केल्याने, किंवा अेका रसाला दुसऱ्याच्या डोक्यावर बसविल्याने किंवा साहित्यावर साहित्येतर प्रयोजन लादल्याने स्वतंत्र असें साहित्यशास्त्र निर्माण झालें असें म्हणणें वस्तुस्थितीचा विपर्यास करणें होय.

अेका दृष्टीने संस्कृत काव्यशास्त्र न पाहतांच प्रस्तुत विचार झाला असता तर बरें झालें असतें असें वाटतें. कारण आज असें झालें आहे की संस्कृतमधील अंगोपांगांचें, परिभाषेचें, किंवा कल्पनांचें प्रतिबिंब मराठीमध्ये किती पडलें आहे याचाच विचार प्राधान्याने यांत आला आहे. मराठीचें स्वतंत्र साहित्यशास्त्र निष्पन्न होतें असें ज्याला म्हणावयाचें आहे त्याने संस्कृतमधील विचार मराठींत आला आहे हें ठिकठिकाणीं दाखविण्याचा प्रयत्न करण्याचें कारण नाही. यामुळे लेखकाच्या हेतूला बाधच आणण्यास मदत झाली आहे. पुढील वचनें पाहावीत :— (१) 'यांपैकी बहुतेक काव्यमूलक गोष्टींचा तुकारामांनी वरील अभंगांत समावेश केला आहे (पृ.२४५); (२) त्यांनी संस्कृत साहित्यविषयक परिभाषा विपुलतेने वापरली आहे व वरील अुताऱ्यांतहि रसाच्या अनुषंगानेच भावाचें वर्णन केलें आहे त्या अर्थी मम्मटप्रणीत व ज्ञानेश्वर-प्रणीत भावसंज्ञेंतील संकेत अेकच असणें अगदी संभवनीय आहे (पृ.२७७); (३) रामदासांनी नवू ह्या रससंख्येस मान्यता दिलेली दिसते (पृ.२६३); (४) अभिनवगुप्ताने हें जें रसलक्षण दिलें आहे तेंच ज्ञानेश्वरांनाहि..., अभिप्रेत दिसत नाही काय ? (पृ.२५४); (५) महाभारतांत शांतरस

मुख्य आहे असें आनंदवर्धनाचें मत संस्कृत साहित्यशास्त्रांत प्रसिद्ध आहे. त्याची ज्ञानेश्वरांनी वरील ओवींत यथायोग्य दखल घेतली आहे (पृ. २४९); (६) ज्ञानेश्वरांच्या सिद्धप्रज्ञेवरून दंडीने दिलेल्या 'नैसर्गिक प्रतिभा' या काव्यकारणाची आठवण होते; (७) अलंकार या संज्ञेने ज्ञानेश्वरांना 'काव्याची शोभा वाढविणारा धर्म' (दण्डी) हाच अर्थ अुदिष्ट दिसतो (पृ १५१) हीं व अशीं अनेक स्थळें असा निष्कर्ष दर्शवितात की संस्कृत साहित्यशास्त्रांतलाच बराचसा भाग मराठींत आला आहे. वाचकाची अशी भावना होणें हें लेखकाच्या मूळ सिद्धान्तास बाधकच होतें.

मराठीच्या कैवाराने डॉ. देशमुख यांनी संस्कृत साहित्यशास्त्राचा विचार करीत असतां अगदी क्वचित् कां होओीना मूळांतील कल्पनेचा विपर्यास केलेला दिसतो. ते म्हणतातः— काव्यप्रकाशकारांनी काव्यप्रयोजनांत यशाला प्रमुख स्थान देअून ठेवलें आहे (पृ. १०५). आनंदाला 'सकलप्रयोजनमौलिभूत' असें स्पष्ट म्हणून मम्मटाने आपलें मत निःसंदिग्धपणें मांडलें असतां केवळ कारिकेंत यशाचा अुल्लेख प्रथम आला म्हणून त्याला प्रमुख स्थान दिलें असें म्हणणें योग्य होणार नाही. संस्कृत लेखकांच्या रीतीच्या कल्पनेंत लेखकाचें व्यक्तित्व समाविष्ट होत नसून ती केवळ बाह्यांगाची मांडणी होय असें देशमुखांनी म्हटलें (पृ. १७७–१७९) आहे तेंहि बरोबर वाटत नाही. मार्ग म्हणजे रीति ही 'प्रतिकविस्थित' आहे असें दण्डी म्हणतो, तेव्हा ती व्यक्तित्वदर्शक आहे असें त्यास अभिप्रेत नाही काय ? रीतींत अर्थगुणांचा विचार करतांना, अर्थगत माधुर्य आणि अग्राम्यता यांचा विचार करितांना, व गुणांची चर्चा करितांना द्रुति, दीप्ति अित्यादि मनोधर्मांचा संबद्ध रसांबरोबर अुल्लेख करितांना रीति ही केवळ बाह्यांगाची मांडणी करणारी आहे असें त्यांना वाटत नसावेंसें वाटतें. रेखेची कल्पना चांगली असेल; पण रीतीचीहि तीपेक्षा कमी असावी असें वाटत नाही. क्वचित् आधारभूत अुल्लेखांचे अर्थ करितांना शक्य त्यापेक्षा अधिक अर्थ घेण्याचा प्रयत्न दिसतो. अुदाहरणार्थ, 'तेथ अभिप्राअोचि अभिप्रायाते विये' या ज्ञानेश्वरवचनांत 'वक्त्याच्या मनांतील अभिप्रायापासूनच श्रोत्यांच्या मनांत अभिप्राय अुत्पन्न होतो' असा अर्थ डॉ. देशमुख घेतात. पण अितका अर्थ-संक्रांतीचा भाव येथे नसावासें वाटतें. अेका अभिप्रायांतून म्हणजे अर्थांतून आणखी पुढील अर्थ निघतात, त्याकरिता बोल (शब्द) लागतातच असें नाही असें ज्ञानेश्वरांस म्हणावयाचें आहे असें दिसतें. हृदयसंवाद याचा अर्थ देशमुखांनी घेतला त्याप्रमाणे वक्त्याकडून श्रोत्यामध्ये व्हावयाचें अर्थसंक्रमण हा साहित्यांतील मानसप्रक्रियेचा भाग येथे नसावा. संवाद याचा अर्थ Response अेवढाच असून वादीसंवादी या जोडींतील संवाद अभिप्रेत आहे. श्रोत्यांचें अवधान ज्ञानेश्वर मागत आहेत, व अवधान अथवा तन्मूलक संवाद (Response) असला की वक्त्याला स्फुरण चढतें, व तें नसलें व श्रोता दुचिता म्हणजे लक्ष न देणारा अथवा दुसरीकडे लक्ष असलेला असला तर 'मांडिला रस हि वितुळे' म्हणजे नाहीसा होतो असें त्यांना म्हणावयाचें आहे. 'काठिणहृदयी श्रोत्याचें चित्तहि द्रवून जातें' असा त्याचा अर्थ नाही. अधूनमधून घडलेलीं अशीं अुदाहरणें व संस्कृत साहित्यशास्त्रीय परिभाषेंतला कोणताहि शब्द आला की तो साहित्यशास्त्रीय अर्थाने योजला गेला असावा अशी प्राथमिक वृत्ति ठेवल्याने. निःसंदिग्धरीत्या न वाटलें तरी त्या शब्दांतून कांही ध्वनि तरी साहित्यशास्त्रास अनुकूल असा निघेल असें मानण्याकडे त्यांची प्रवृत्ति होते. रस, भाव, अलंकार अित्यादि शब्दांच्या बाबतींत तसें कांही वेळां झालें असावेंसें वाटतें.

साहित्यचर्चेत Fallacy of happy exercise नांवाचा अेक प्रकार घडलेला अनेक

वेळां आढळतो. आपण ज्या विषयासंबंधी परिश्रम करीत आहोंत त्याची योग्यता अत्यंत मोठी आहे अशी भावना त्यामुळे होते. सामराज, नागेश, निरंजनमाधव अित्यादि कवींच्या बाबतींत असा प्रकार झाला आहे हें साहित्यज्ञांस माहीत आहेच. तसेंच या विषयाच्या बाबतींत कांहींसें झालें आहे. असें झालें की केवळ सत्यकथनाची दृष्टि सुटून वकिलीला प्रारंभ होतो. मराठी संतांची साहित्यशास्त्रीय वकिली मात्र डॉ. देशमुखांनी सुंदर केली आहे यांत शंका नाही.

रा. श्री. जो.

## चित्रकला

**१ रेखा-चित्रें—** ले० श्री. श्री. ना. कुलकर्णी; प्रका० किर्लोस्कर प्रेस, किर्लोस्करवाडी (सातारा); मूल्य रु. ३.

**२ स्त्री आणि सौन्दर्य—** ले० श्री. य. ग. वझे; प्रका० श्री. ल. ना. चापेकर, आर्यसंस्कृति मुद्रणालय, टिळक रस्ता, पुणें २; मूल्य रु. १॥.

चित्रकलेवरील मराठींतील कांही थोड्यां ग्रंथांपैकी 'रेखाचित्रें' हा ग्रंथ अेक अभिनंदनीय प्रयत्न आहे. हें अभिनंदन हा ग्रंथ थोड्यांतील अेक म्हणून नव्हे तर थोड्यांपैकी चांगला म्हणून करावेसें वाटतें.

किर्लोस्कर मासिकांतून हा ग्रंथ पूर्वीच लेखमालेच्या रूपाने प्रसिद्ध झालेला होता आणि त्यामुळे तो सर्वांस परिचितहि झालेला होता. लेखमालेच्या स्वरूपांत अगोदर प्रसिद्ध झाल्यामुळे ग्रंथाच्या सूत्रांवांत तुटकपणा मात्र आलेला नाही हें विशेष आहे. या विषयाचे पारिभाषिक शब्द अजून रूढ झालेले नाहीत. परंतु याहि अडचणींतून श्री. कुलकर्णी यांच्या यशस्वी आणि ओघवती भाषेने मार्ग काढला आहे.

मात्र प्रथमच कला (म्हणजे त्यामागील कुसर craft ?) सर्वत्रांस अगदी सहजसुलभ असल्याची जी ग्वाही लेखकाने दिली आहे ती वाचून 'पत्राने शिक्षण घेअून दोन महिन्यांत चित्रकार व्हा' अशा तऱ्हेच्या बाजारी जाहिरातबाजीची आठवण झाल्याशिवाय राहत नाही. वास्तविक कला आणि कुसर या दोहोंचीहि जोड यशस्वी चित्रकारास हवी, आणि म्हणून जरी नुसती कुसर कमीजास्त प्रमाणांत सर्वांस साध्य असली तरी कलेचा नैसर्गिक भाग त्याच्या जोडीस नसल्यास मात्र सर्वच चित्रकार होअूं शकणार नाहीत. साधनसामुग्रीचा योग्य अुपयोग शिकवितां येअील हें खरें, पण त्यामागील कलाविचार हा मात्र अुपजतच असावयास पाहिजे. कौशल्याने रेघा मारणें त्या कौशल्याबद्दल कौतुक अुत्पन्न करील, पण जर त्यामध्ये नुसत्या कौशल्याशिवाय कलाविष्काराचा प्रयत्न असेल तरच तें चित्र संपूर्णतया होअील. थोडक्यांत चित्र हें खरें साध्य आहे आणि त्याच्या निर्मितीला आवश्यक असणाऱ्या गोष्टी हीं निव्वळ साधनें आहेत. आणि या दृष्टीने पाहतांना या ग्रंथांत चित्रांतील कलेपेक्षा कुसरीलाच प्रधान साध्य ठरविल्यासारखें वाटलें. हा कुसरीचा भाग मात्र श्री. कुलकर्णी यांनी अुत्तम रीतीने सांगितला आहे, आणि त्याच्या जोडीस स्वचित्रित अुदाहरणांनी सुस्पष्ट केला आहे. स्वतः यशस्वी चित्रकार असल्यामुळे या तांत्रिक कुसरीचा भाग त्यांच्या अनुभवाची व ज्ञानाची अुत्तम ओळख करून देअूं शकतो. पण याचप्रमाणे जर त्यांनी चित्र कशास म्हणावें, अुत्कृष्ट रेखाचित्रांत कोणते गुण हवेत, या व अितर तात्त्विक प्रश्नांचा अूहापोह केला असता तर या ग्रंथाची अुपयुक्तता जास्त वाढली असती.

लेखकानें कांहीं अगोदरच कुप्रसिद्धि पावलेल्या अशा श्लीलाश्लीलतेच्या वादाचा संबंध येणाऱ्या अनावृत शरीरचित्रणाबद्दल, लोकमत न दुखविण्याकरितां आपल्या मतांना मुरड घातल्यासारखी वाटते. अुदाहरणार्थ, त्यांनी शरीरचित्रणाची आवश्यकता नसल्याचा दिलेला निर्वाळा. वास्तविक आवृत शरीरापेक्षा अनावृत शरीराचें चित्रण सोपें असतें. जगांतील नामवंत चित्रविद्यालयांतून प्रथम अनावृत शरीरचित्रणच शिकविण्याची पद्धत आहे, आणि शिवाय अनुभवानेंहि अनावृत शरीरचित्रण सोपें असल्याचें पटूं शकेल. शरीरचित्रण करितांना अर्थातच अितर विचारांपेक्षा सौंदर्य व कलाविचार हींच महत्त्वाचीं आहेत. असें शरीरचित्रण प्रचलित कल्पनांप्रमाणें विकृत व अनैतिक वाटतें, म्हणून त्यावर मतप्रदर्शन केल्यास ग्रंथ अुगीचच टीकेस पात्र होअील अशा भीतीनें तर लेखकानें हा मार्ग स्वीकारला नाहीं ना असा पुसट विचार येअून जातो. किंवा शरीरचित्रण हा अनंत कलाप्रकारांपैकीं अेक आहे आणि कदाचित् लेखकाला त्याविषयीं अितकी सहानुभूति नसेल.

स्वतःच्या बहुमोल चित्रांच्या जोडीस अितर पाश्चात्य व पौर्वात्य कलावंतांच्या रेखा-चित्रांचे नमुने देतां आले असते तर लेखनांतील अनेक मुद्यांना मदत झाली असती आणि ग्रंथाची अुपयुक्तताहि वाढली असती. परंतु असलेल्या अनेक बंधनांतूनहि लेखकानें आपला विषय लोकांच्यापुढे आणून विचारी वाङ्मयांत भर टाकली आहे आणि त्यांच्या आगामी लेखनाबद्दल निश्चित अपेक्षा अुत्पन्न केली आहे.

श्री. य. ग. वझे लेखक तर आहेतच पण व्यासंगी हौशी चित्रकारहि आहेत. आणि म्हणून, स्वतःचे सौंदर्यविचार मांडण्याची चित्रकाराची नेहेमीची अडचण त्यांना वाटत नाहीं. असे सौंदर्यविचार चित्रकार आपल्या माध्यमाच्या द्वारेंच प्रकट करतो; कारण अितर माध्यमें सामान्यैकरून त्याच्या आटोक्याबाहेरचीं असतात. कलावंताच्या व्यक्तिनिष्ठ दृष्टिकोणापलीकडे जाअून वस्तुनिष्ठ दृष्टिकोणांतून कलाव्यापारांचें निरीक्षण करून त्याची मौलिकता ठरविणें याकरितां मर्मज्ञ लेखकांची जरूरी आहे. श्री. वझे यांनी अशाच रीतीनें अेका नवीन व व्यावहारिक परंतु कलाप्रश्नाची चर्चा करण्याचा प्रयत्न 'स्त्री आणि सौंदर्य' या ग्रंथांत केला आहे. सौंदर्यचर्चा तत्त्वज्ञ आणि कलावंत या दोघांच्याहि कक्षेंत येते. आणि या दोघांच्याहि दृष्टिकोणांतून स्त्री आणि सौंदर्याच्या प्रचलित कल्पनांच्या ग्राह्याग्राह्यतेबद्दल शास्त्रीय अुपपत्ति लावण्याचा प्रयत्न केल्याची लेखकानें ग्वाही दिली आहे.

प्रो वा. म. जोशी यांच्यासारख्या तत्त्वज्ञानें आपल्या अभिप्रायांत या गूढ अशा स्त्रीसौंदर्याच्या निर्णायक मापनाबद्दल साशंकताच दर्शविली आहे आणि अशा या गूढ आणि व्यक्ति-निष्ठ विषयावर शास्त्रीय म्हणजे वस्तुनिष्ठ चर्चा तात्त्विक आणि कलात्मक अशा दोन्ही दृष्टिकोणांतून करण्याचा हा प्रयत्न आहे. लेखनाच्या जोडीस लेखकानें स्वतःचीं चित्रें दिलेलीं आहेत, आणि त्यामुळे पुष्कळ मुद्यांचें विवरण सोपें झालें आहे. लेखकाच्या त्या व्यासंगाची त्यामुळे ओळख पटते. पण चित्रें व लेखन यांचा अन्योन्यसंबंध याहूनहि जास्त निगडित केला असता तर त्यांचें अस्तित्व कांहीं ठिकाणीं निवळ शोभा म्हणून राहिलें नसतें.

ग्रंथाची सुरुवात शास्त्रीय भूमिकेवरून झाली आहे. स्त्रीविषयक विचार अगदी जीव-शास्त्राच्या सुरुवातीपासून झाला आहे. पण त्याचा पुढील व महत्त्वाच्या सौंदर्यविषयाशीं सहजगामी संबंध वाटत नाहीं. स्त्रीसौंदर्याच्या मागे लैंगिक किंवा अितर मानसिक आकर्षणें नसतात असें नाहीं पण अशा शास्त्रीय चर्चेत त्यांचा विचार दुय्यमच असावयास पाहिजे. पण

ग्रंथाचा जास्त भाग त्यावरच खर्च झालेला आहे. "पूर्व आणि पश्चिम" या विभागांतील विवेचनाचा मुख्य सूत्राशीं संबंध कळत नाही. अजिबात निराळ्या स्वतंत्र निबंधाचें त्याचें स्वरूप आहे, आणि त्यामुळे सूत्रौघांत खंड पडल्यासारखा वाटतो हें खास. अशाच विवेचनांत जास्त भाग खर्च झाल्यामुळे अुरलेल्या भागांत घाअीघाअीने व निवळ व्यक्तिनिष्ठ दृष्टिकोणाने युक्त असें लिखाण झालें आहे. व्यावहारिक जरूरीमुळेच लेखकाचें लक्ष या विषयाकडे वेधलें गेलें आणि म्हणून शास्त्रीय अशा विवेचनाबरोबर त्यांत लागलीच अत्यंत व्यावहारिक व व्यक्तिनिष्ठ अशीं स्वतःचीं मतें आलेलीं आहेत. आणि वस्तुनिष्ठ चर्चा करण्याच्या शास्त्रीय भूमिकेवरून कांही प्रसंगीं व्यावहारिक सूचना करण्याच्या भूमिकेवर लेखकाचें अधःपतन झालें आहे. अुदाहरणच द्यावयाचें तर शेवटला वेशभूषेचा भाग पाहावा. त्यांत नवीन प्रघातावरील लेखकाचीं मतें— सर्वमान्य असलीं तरी— निवळ व्यक्तिनिष्ठ असल्यामुळे शास्त्रीय असतीलच अशी खात्री नाही. सौंदर्यचर्चेचा भाग या व्यक्तिनिष्ठ कोणांतूनच चर्चिला आहे. प्रमाणांची चर्चा करितांना चेहेरा व शरीर यांचें अेकमेकांशीं असलेलें अेक मान्य प्रमाण घेतल्यास तेंच सर्व जगभर लागू पडेल व त्या मापनाप्रमाणे जगांतील स्त्रीसौंदर्याची प्रतवारी करतां येअील या लेखकाच्या मताचा खरेपणा विवाद्य आहे. कारण ग्रीक स्त्रियांची अुंची किंवा रंग हीं नसूनहि जावा किंवा बाली स्त्रीसौंदर्य पहिल्यापेक्षा कमी आहे हें पटत नाही. महाराष्ट्रीय स्त्रियांच्या अुंचीचें व चेहेऱ्याचें सरासरी प्रमाण काढतांना ज्या अनेक स्त्रियांचीं मापें घेतलीं त्यांपैकी किती तरी या सर्वमान्य ७॥ पटींच्या मस्तकमापनांत बसूं शकतील? परंतु त्या आकर्षक असल्याची खात्री लेखकाने दिली आहे. आणि यावरून शेवटीं हा सौंदर्यप्रश्न निवळ व्यक्तिनिष्ठ मापनानेच सोडवितां येअील कीं काय असें वाटूं लागतें. आणि पुस्तक वाचूनहि अेक अपुरेपणा आणि असमाधान वाटतें.

वस्तुतः हा ग्रंथ यापेक्षाहि मोठा आणि अभ्यासपूर्ण होअूं शकेल. आहे या स्थितींत तो अेका नव्या व व्यावहारिक कलाप्रश्नाची चर्चा व शास्त्रीय परीक्षा करण्याचा अेका व्यक्तीचा प्रयत्न आहे. तो संपूर्ण सफल झाला नाही तरीसुद्धा नवीन मार्गदर्शन या दृष्टीने त्याचें महत्त्व आहे, आणि त्याबद्दल लेखकाचें अभिनंदन व्हावयास पाहिजे. त्यांनी हा नवीन प्रकार रूढ केला आणि या व्यावहारिक प्रश्नाकडे लोकांचें लक्ष वेधलें आहे. त्यांच्याकडून व्यासंगयुक्त अशा आगामी लेखनाची अपेक्षा करण्यांतच त्यांचें योग्य अभिनंदन केल्यासारखें होअील.

**ज. द. गों.**

## चरित्र

**राधाकृष्णन्** (चरित्र व तत्त्वज्ञान)— ले० व प्रका० श्री. दा. न. शिखरे, अग्रणी मुद्रणालय, ६२३/२६ सदाशिव, पुणें २; मूल्य आ. ८.

अग्रणीचे संपादक श्री. शिखरे यांनी हिंदुधर्मासंबंधी गौरवपर असें अेक पुस्तक बऱ्याच वर्षांपूर्वी लिहिलें आहे व त्याच प्रकारचें आणखीहि लेखन करण्याचा त्यांचा संकल्प आहे. दरम्यान त्यांनी विख्यात पंडित आणि तत्त्ववेत्ते 'सर सर्वपल्ली राधाकृष्णन्' यांच्यासंबंधी हें लहानसें (पृ. ६८) पुस्तक प्रसिद्ध केलें आहे.

रा. शिखरे यांस हिंदुधर्माप्रमाणेच हिंदुधर्माचे राधाकृष्णन्सारखे आधुनिक पुढारी यांजविषयीहि प्रेमादर वाटतो. या आदरभावनेचें स्थूल स्वरूप म्हणजे "तापत्रयपीडित अशा

आधुनिक जगाचें विमोचन हिंदुधर्मच करूं शकेल'' आणि ''शंकासहस्रांनी व्यथित अशा आधुनिक मनाला पटेलसें हिंदुधर्माचें स्वरूप राधाकृष्णन् हेच सांगूं शकतील'' या दोन सूत्रांत बसवितां येईल. हिंदुधर्माकडे आदराने आणि आस्थेने बघणारांच्या नजरेस शिवाजी-गुरुगोविंद, विवेकानंद-दयानंद, टागोर-राधाकृष्णन् यांसारख्या वेगवेगळ्या पुढाऱ्यांच्या कामगिऱ्या पडतील. शिवाजी, गुरुगोविंद, सावरकर यांचें कार्य हिंदूंना लढाऊ बनविण्याचें होय. दयानंदांनी दुर्बळ करणाऱ्या हरअेक रूढींना धडाडीने तिलांजली दिली. विवेकानंद, त्याच वैचारिक सबलतेचा अुपदेश करून शिवाय अद्वैतसिद्धान्तासारख्या प्राणभूत भागाची सुशिक्षित भारतास व जगतास जाणीव करून देते झाले. टागोर-राधाकृष्णन् यांनी हिंदुधर्मातील अुदार व अुदात्त तत्त्वांची श्रेष्ठता आपल्या मोहक अिंग्रजीने रंगवून पाश्चात्य सुशिक्षितांस मोहून सोडलें. शिखरे लिहितात, ''स्वामी विवेकानंदांनंतर हिंदुधर्माची पताका खांद्यावर घेअून जगाची वारी करणारे राधाकृष्णन् हेच अेकटे आहेत. हिंदुस्थानची कीर्ति दिगंत पसरविणारे या शतकांतील तीन महापुरुष म्हणजे म. गांधी, डॉ. टागोर व प्रा. राधाकृष्णन् हे होत.''

हिंदुधर्मांचा अभिमान बाळगणारास आणि हिंदुधर्म आधुनिक काळांत जागतिक कामगिरी करणार अशी आशा धरणारास हिंदुधर्माची वाढती कीर्ति आणि जागतिक संस्कृतीवरील वाढती आपत्ति यासंबंधी स्पष्ट कल्पना हवी. राधाकृष्णन्-टागोर यांच्या सुंदर अिंग्रजी लेखांचा व व्याख्यानांचा विपुल प्रसार म्हणजे हिंदुधर्माचा प्रसार नव्हे. टागोर, राधाकृष्णन् यांसारखे प्रतिभावन्त हिंदु लेखक त्रिखंडांत गाजले म्हणजे आपल्या अंगावर मूठभर मांस चढणें साहजिक आहे. पण प्रत्यक्ष फलप्राप्तीचा प्रश्न कोणीं अुपस्थित केल्यास हिंदुधर्मांच्या आजच्या रोगावर अशा मोहक लिखाणामुळे कांही अुपाययोजना होते असें आढळणार नाही. तसेंच ज्या 'पाश्चात्य' संस्कृतींतील 'लग्नापासून तो लढाअी'पर्यंत यच्चयावत् दूषित आचारांवर खुसखशीत टीका करून राधाकृष्णन् यांनी 'हास्याची खसखस पिकविली' त्या पाश्चात्य संस्कृतीलाहि त्यांनी कांही नवीन औषधयोजना सुचविली असें दिसत नाही. जी आध्यात्मिकता खिस्ताने शिकविली व जी आध्यात्मिकता टॉल्स्टॉय व रोमाँ रोलाँ यानी सुंदर आधुनिक वाङ्मयकृतींच्या माध्यमाने अेवढ्या कौशल्याने मांडली तिच्याहून वेगळें असें राधाकृष्णन् अगर टागोर यांस कांहीच सांगावयाचें नाही. गतायुष्यांतील घडामोडी मनकवडेपणाने सांगणारा ज्योतिषी आणि अेखाद्या विकारांतील भावना बरोबर रीतीने सांगणारा डॉक्टर यांच्या सान्निध्यांत दुर्बल स्थितींत रोग्यास जें समाधान लाभतें तेंच पाश्चात्यांस या भारतीय डॉक्टरद्वयाकडून लाभत असावें. परंतु हें क्षणिक मानसिक समाधान म्हणजे अुपाययोजना नव्हे. या दृष्टीने पाहतां हिंदु तत्त्ववेत्त्यांची कीर्ति आणि हिंदुधर्माची खरी कार्यक्षमता यातील अंतर ओळखलें पाहिजे. तसेंच टागोर, राधाकृष्णन् यांजसारखे हिंदुधर्माचे व पाश्चात्य धर्माचें सुंदर वर्णन करणारे साहित्यिक आणि गांधींसारखे तो धर्म प्रत्यक्ष कृतीच्या कसोटीला लावणारे सुधारक यांतीलहि अंतर ओळखणें जरूर आहे. लंडन टाअिम्सने राधाकृष्णन् हे आत्मिक शुचितेंत गांधींहूनहि कदाचित् श्रेष्ठ ठरतील असें म्हटल्याचें शिखरे यांनी नमूद केलें आहे. लंडन टाअिम्समधील सदर परीक्षणलेखक कोण आहे हें माहीत नाही. तरी तो कोणी युरोपीय असावा हें अुघड आहे. कारण आध्यात्मिक श्रेष्ठकनिष्ठभाव ठरविण्यांत हिंदु लेखक अेवढी गल्लत कधींच करणार नाही!

युरोपियनांनी आपल्या अिंग्रजी नैपुण्याची स्तुति करणें, जेथे आपणांस पूर्वी येअुं देखील देत नसत तेथे मनाने येअुं देणें वगैरे मापांनी राष्ट्राची किंवा धर्माची प्रगति मोजणें आता

आपण सोडून दिलें पाहिजे. आपल्या प्रत्यक्ष गरजा व अुणीवा ओळखून त्यांचें निवारण किती झालें हें आपण पाहिलें पाहिजे.

हिंदूंच्या तत्त्वज्ञानाचें अत्यंत सुंदर असें आधुनिक परिभाषेंत विशदीकरण करणारा पंडित आणि सनातन व सुपरिचित अशा अुदात्त तत्त्वांची हरप्रसंगीं अुजळणी करणारा जन्मसिद्ध वक्ता या नात्याने मात्र राधाकृष्णन् यांची महती मोठी आहे. त्यांची अगाध विद्वत्ता, त्यांचें अमोघ वक्तृत्व आणि त्यांचें निर्दोष व मोहक अिंग्रजी यांचा परिचय शिखरे यांच्या या रसाळ परिचयग्रंथाने निःसंशय होअील. पुस्तक वाचीत असतां तें याहूनहि अधिक विस्तृत असतें तरी चाललें असतें अशा आवडीनेच वाचक तें अथपासून अितिपर्यंत वाचतील यांत शंका नाही. शिखरे यांनी शेवटीं राधाकृष्णन् यांच्या प्रमुख ग्रंथांचा परिचय अेका परिशिष्टाच्या द्वारें अुत्कृष्टपणें करून दिला आहे ही गोष्ट विशेष नमूद करण्यासारखी आहे.

श्री. शिखरे यांची भाषा पुष्कळ ठिकाणीं खांडेकरी वळणाची व अलंकारयुक्त अशी आहे. त्यामुळे पुस्तक तात्त्विक विषयावरील असूनहि आकर्षक होअील. तथापि **'संधारक', 'प्रांतिक श्रेणी', 'अुप-प्राध्यापक'** यांसारखे शब्द आवर्जून घालण्याच्या धोरणामुळे सौंदर्य किंवा सुबोधता यांतून कांहीच वाढिलसें वाटत नाही. मधेच **'अर्थवादा'**सारखा अेखादाच शब्द मूळ शास्त्रीय अर्थाने वापरलेला दिसतो.

तसेंच 'अेम्.अे. परीक्षेचें शिखर त्यांनी **त्याच मानाने** (पहिल्या वर्गांत येअून अित्यर्थः !, गांठलें' यासारखीं वाक्यें भाषाशुद्धीची (आमच्या व्याख्येप्रमाणे) हानि करतात. तसेंच 'हमाल **आपापसाचा खून करण्यास** प्रवृत्त होतात' हें मराठी नव्हे. येथे अेकमेकांचा खून असें म्हटलें पाहिजे. 'अुपप्राध्यापक'सारखे भाषांतरी शब्द बनवणें म्हणजे भाषाशुद्धि या सावरकरी व्याख्येमुळे शिखरे यांचें खऱ्या मराठी वळणाकडे दुर्लक्ष होत असावें.

रा. शिखरे हे जिज्ञासू, व्यासंगी व तत्त्वप्रेमी लेखक आहेत. त्यांच्या हातून अशा विषयावर अधिकाधिक रचना झाल्यास ती मराठी वाचकास निःसंशय प्रिय होअील. सदरहू पुस्तक शाळाकॉलेजांच्या मराठी विभागांत जरूर संग्रहित केलें जावें.

**श्री. के. क्षी.**

## प्रवासवर्णन

**हिमालयांत—** ले० ना. गो. चापेकर; प्रका० श्री. ल. ना. चापेकर; आर्यसंस्कृति मुद्रणालय, टिळक रस्ता, पुणें २; मूल्य रु. २।.

'हिमालयांत' हें रा. सा. ना. गो. चापेकर यांनी नुकतेंच प्रसिद्ध केलेलें 'प्रवासपुस्तक' आहे. अेकशेतीन पृष्ठांच्या या पुस्तकांत १९३९ च्या मे-जूनमध्ये केलेला केदार-बदरीचा प्रवास, १९४१ च्या मार्चमधील नेपाळचा प्रवास व त्याच सालच्या मे महिन्यांतील गंगोत्री-जमनोत्रीचा प्रवास अशा तीन प्रवासांचा वृत्तान्त आहे. सर्वसामान्य लोक या प्रवासाला 'यात्रा' असेंच म्हणतात. परंतु रा. सा. चापेकर हे कटाक्षाने यात्रा व प्रवास यांत भेद करणारे आहेत. यांच्या मतें देवाचें दर्शन हेंच यात्रेकरूचें ध्येय व अंतिम साध्य असतें. आणि प्रवासी हा जनराहटीचें निरीक्षण करण्याकरिता व सृष्टिसौंदर्याचा आनंद लुटण्याकरिता घराबाहेर पडतो. (रा. द. ग. कुलकर्णी यांच्या 'केदार आणि नारायण' या पुस्तकाला चापेकरांचा आशीर्वाद, पृ. १-२). 'यात्रेकरू' व 'प्रवासी' या शब्दांचे हे अर्थ ठीक आहेत. परंतु प्रवासाला जाणाऱ्या

लोकांत यात्रेकरू व प्रवासी यांचें मिश्रणच आढळतें. रावसाहेब चापेकरांच्या या पुस्तकाच्या प्रस्तावनेचाच पहिला परिच्छेद त्यांची यात्रानुकूल भावनाच दर्शवितो.

रा. सा. चापेकरांनी या आपल्या भेदाचा ज्या अर्थी कटाक्षाने अुल्लेख केला आहे त्या अर्थी पूर्वीचीं यात्रावर्णनें अगदी असमाधानकारक आहेत असें त्यांना म्हणावयाचें असावें असें कोणास वाटेल. वास्तविक तसें त्यांनी स्पष्टपणें आपल्या स्वतःच्या पुस्तकांत कोठेच म्हटलें नसलें तरी अुपर्युक्त कुलकर्णी यांच्या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत 'प्रवासग्रंथ मराठींत लिहिण्याचा पहिला मान रा. कुलकर्णी यांनी मिळविला आहे असें मला वाटतें' असें जें विधान केलें आहे त्यावरून या तर्काला बळकटी येते. मराठींतील प्रवासवर्णनांचा व यात्रावर्णनांचा अेकंदर पसारा नजरेखाली घातला तर हें विधान खरें वाटत नाही. यात्रेकरू आपल्या यात्रेचें वर्णन लेखरूपाने करण्यास सज्ज होतांनाच त्याच्यांतला चापेकरांच्या अर्थानेहि 'प्रवासी' बहुधा जागा झालेला असतो. आणि त्याचें पुस्तक समाधानकारक झालें नसेल तर 'पहिला मान मिळविणारे' श्री. कुलकर्णी आणि रा. सा. चापेकर यांच्या मार्गांत आलेल्या अडचणींचाच त्यालाहि अडथळा झालेला असतो असेंच आढळेल. रा. सा. चापेकर ज्या प्रवासग्रंथांची अपेक्षा करतात ते ग्रंथ दीर्घकालीन निवासानंतर निर्माण होत असतात. आणि चापेकरांच्यासारख्या धावत्या प्रवासानंतरहि निष्पन्न झालेल्या मराठी ग्रंथांकडे दृष्टिक्षेप केला तरी सहजच प्रो. गो. चिं. भाटे, श्री. रा. दा. रामेकर (बदरी केदार), आणि विशेषतः श्री. संपतराव गायकवाड (भरपूर माहितीचें 'नेपाळचा प्रवास') अित्यादि लेखकांचीं नांवें नजरेसमोर अुभीं राहतात. असो.

नानासाहेबांनीच म्हटल्याप्रमाणे 'सअीबाअी(दुसरे बाजीराव यांची विधवा)संबंधीची अभिनव माहिती' या पुस्तकांत आलेली आहे. तीसंबंधी शहानिशा करण्यास अजून पुष्कळ साधनें मिळालीं पाहिजेत. परंतु तेवढें अेकच या पुस्तकाचें वैशिष्ट्य नाही. तर यांत तिन्ही प्रवासांचे खुलासेवार नकाशे, चाळीस छायाचित्रें आणि नानासाहेबांच्या दंडकाप्रमाणे ग्रथित केलेली शक्य तितकी व्यवस्थित आणि विषयवार परिशिष्टांत विभागलेली देशस्थिति व समाजस्थितिनिदर्शक माहिती दिलेली आहे. या माहितीपैकीं कांही अन्यत्र (मराठी पुस्तकांत देखील) अुपलब्ध असली तथापि नानासाहेबांच्या विशिष्ट प्रकारच्या सूचक विवेचनामुळे त्यांचीं लोकस्थितिनिदर्शक टिपणें, पण त्यांतल्या त्यांत गंगोत्री परिशिष्ट ३ व केदार-बदरी परिशिष्ट २ हीं अुद्बोधक झालीं आहेत. विशेषतः पृ. १०० वर हिंदुस्थानांत निरनिराळ्या ठिकाणीं म्हटले जाणारे संकल्प अेकत्र करण्याची त्यांनी मांडलेली कल्पना म्हणजे लेखकाच्या विशिष्ट दृष्टिकोनाचें अनुकरणीय प्रात्यक्षिकच होय.

अितक्या परिश्रमाने प्रसिद्ध केलेल्या या पुस्तकांत अेखादी छोटीशी सूची असती, पूर्वप्रसिद्ध यात्राप्रवासवर्णनांचा अुल्लेख असता, नेपाळांतील सत्तावनीसंबंधी व नाना गदरी यांच्यासंबंधी दिलेल्या माहितींतील खंडनमंडनादि मजकुरांत प्रत्यक्षाप्रत्यक्ष आणलेल्या ग्रंथ-पुस्तकांचे कसोशीने संदर्भ दिले असते, तर परिणतप्रज्ञ नानासाहेबांचें हें डोंडेपुष्प केवळ दीर्घकालीन व्यासंगी माणसाच्या अभ्यासपद्धतीचा आदर्श म्हणूनच नव्हे तर अशा प्रकारच्या प्रकाशनाचाहि निर्दोष आदर्श म्हणून दाखविणें मुळीच कठिण गेलें नसतें.

दि. वि. का.

## बालवाङ्मय

**१ मराठी मेघदूतकथा**— ले० श्री. नी. शं. नवरे, प्रका० श्री. के. भि. ढवळे, समर्थ सदन, मुंबअी ४; मूल्य आ.८.

**२ वेदांतील गोष्टी** (भाग दुसरा)— ले० श्री. वि. कृ. श्रोत्रिय, प्रका० श्री. के.भि. ढवळे, समर्थ सदन, मुंबअी ४; मूल्य आ.८.

शेक्सपिअरचीं नाटकें गद्यांत आणणाऱ्या लँबपेक्षाहि श्री. नवरे ह्यांचा प्रयत्न मराठी वाचकांना अधिक प्रशंसनीय वाटेल ह्यांत शंका नाही. कारण लँबने सर्व लोकांना समजणाऱ्या अेकाच भाषेंतील पद्य गद्यांत आणलें अेवढेंच; नवरे ह्यांनी संस्कृत भाषेंतील काव्य मराठी गद्यांत आणलें आहे. अेका भाषेंतील काव्यमय विचार दुसऱ्या भाषेंत नेणें हें अतिशय अवघड काम आहे. त्यांत कालिदासासारख्या कवीची कृति संस्कृत भाषेच्या मानानें अप्रगल्भ अशा मराठींत प्रकट करणें जवळ जवळ दुःसाध्य आहे असें म्हणतां येअील. असें हें दुर्घट व जड काम श्री. नवरे ह्यांनी अंगीकारलें व बऱ्याच यशस्वी रीतीने पार पाडलें ह्याबद्दल ते अभिनंदनास पात्र आहेत.

'मराठी मेघदूता'ची भाषा मनोज्ञ आहे; मुलांना व स्त्रियांना वाचण्याची व रसग्रहणाची चटक लावणारी आहे. ह्या पुस्तकावर अभिप्राय देतांना हीच गोष्ट महत्त्वाची असते. श्री. नवरे ह्यांचें हें भाषांतर नाही. त्यामुळे मुळाला मोडतोडीची बाधा झाली असली तरी मराठीकरण आकर्षक व श्लील बनलें आहे.

संशोधनाची कसोटी अशा पुस्तकास लावणें योग्य होणार नाही. नाही तर नकाशांत अलका नगरी व अितर स्थलें व नद्या ह्यांच्या अभावावर टीका करतां आली असती. त्याचप्रमाणे स्त्रियांचीं चित्रें देतांना हिमालयांतील स्त्रियांचा पेहराव कसा असतो ह्याचा विचार व्हावयास पाहिजे होता असें म्हणतां आलें असतें. असो. हें पुस्तक वाचल्यावर अेका अशिक्षित स्त्रीने म्हटलें की, आम्हां प्राकृत जनांवर श्री.नवरे ह्यांनी अुपकार करून टेविले आहेत. हीच त्यांच्या पुस्तकाची शिफारस होय.

**ना. गो. चा.**

'वेदांतील गोष्टी' या पुस्तकांतील कथा ऋग्वेदादि संहिता, ब्राह्मणें, आरण्यकें व अुपनिषदें ह्यांवर आधारलेल्या असून श्री. श्रोत्रिय यांनी त्या वाङ्मयीन दृष्टीने लिहिलेल्या आहेत. सर्वच कथा अगदी आटपशीर आहेत; त्यांत वर्णनाचा पाल्हाळ मुदलींच नाही. गोष्ट सांगणें ही अेक कला आहे आणि श्री. श्रोत्रिय यांना ती चांगली साधली आहे, याची प्रतीति पदोपदीं आल्या-वांचून राहत नाही. मुळांतील कांही गोष्टींमधील तथाकथित अश्लील भागाला लेखकाने कुशल-तेने बगल दिली आहे. पण त्यामुळे कोठेहि रसभंग झाल्यासारखें वाटत नाही.

बालमन हें अद्‌भुत कथांमध्ये तल्लीन होतेंच, पण ह्या कथा प्रौढांनाहि अनेक दृष्टींनी वाचनीय वाटतील. गोष्टींना आकर्षक अशीं नांवें दिलेलीं आहेत. अुदा० 'आभाळ काय शिक-वितें ?' 'माणसांचे देव झाले !', 'कानामागून आला, तिखट झाला', 'गाढवांनी शर्यत जिंकली', 'तो व ती'; 'अिंद्राची भेदनीति' ही कथा वाचतांना सांप्रतच्या युद्धांतील 'पंचमस्तंभा'चें (Fifth Column) स्मरण होतें. कांही कथा गमतीच्या आहेत, कांही गंभीर आहेत; कांही बोधपर आहेत. या सर्वच कथा मुलांचें मनोरंजन करून संशोधक व प्रौढ मनाला विचाराचें खाद्य पुरवितील यांत संशय नाही. या मुद्यांचा श्री. ना. गो. चापेकर यांनी प्रस्तावनेंत अूहापोह केला आहे.

श्री. श्रोत्रिय यांना अेकच सूचना करावीशी वाटते ती ही की, पुढील आवृत्तींत त्यांनी प्रत्येक गोष्टीच्या शेवटीं किंवा टीपेंत मुळाचा आधार द्यावा.

गोष्टींचीं पुस्तकें आकर्षक करण्यांत श्री. ढवळे ह्यांनी अुच्चाङ्क गांठला आहे. ह्या पुस्तकांत प्रसिद्ध चित्रकार श्री. दलाल ह्यांनी काढलेलीं सुंदर चित्रें दिलेलीं आहेत.

नी. शं. न.

## लघुकथा

**१ समुद्रमंथन—** (पुष्प १ लें) प्रका० श्री. रा. ग. जोग, दिलरुबा प्रकाशन, दादर, मुंबअी १४; मूल्य रु. १।.

**२ संगम—** ले० श्याम गोऱ्हे; प्रका० शं. ज. नाअीक, अुदयसाहित्य प्रकाशन, ९६ गंज पेठ, पुणें २; मूल्य रु. १.

**३ कागदी बदाम—** (कथासंग्रह) ले० श्री. स. अ. शुक्ल; प्रका० श्री. कृ. ना. सापळे, जुडेक्स बिल्डिंग, त्रिभुवन रोड, मुंबअी ४; मूल्य रु. १।.

**४ नवें भारुड—** ले० प्रो. चिं. वि. जोशी; प्रका० देशमुख आणि कं०, १९१ शनिवार, पुणें २; मूल्य रु. १॥।

'साभार परत' येणाऱ्या लघुकथांचा संग्रह ज्याप्रमाणे श्री. य. गो. जोशी यांनी प्रसिद्ध केला त्याचप्रमाणे 'दिलरुबा प्रकाशन' संस्थेनेहि 'समुद्रमंथन' हा 'साभार परत' आलेल्या कांही नवोदित लेखकांच्या लघुकथांचा संग्रह प्रसिद्ध केला आहे. 'साभार-परती'च्या समुद्रमंथनांतून हातीं आलेलीं चवदा रत्नें संपादकमंडळाने वाचकांच्यापुढे ठेवलीं आहेत. पैकी चवदावें रत्नच विशेष लक्षांत राहण्यासारखें आहे.

प्रस्तुत कथांतील 'देव-दगड कीं खडक', 'योग्य निवड' व 'अरविंद' या तीन कथा सोडल्या तर बाकीच्या सर्व कथा विवाहपूर्व किंवा विवाहोत्तर प्रेमावर आधारलेल्या आहेत. प्रेम ही कांही जीवनांतील अेकमेव गोष्ट नव्हे. त्याव्यतिरिक्त जीवनांतील अितर अनुभवांचा पडसाद ललितवाङ्मयांत अैकूं अिच्छिणाऱ्या वाचकांची मात्र या संग्रहांतील कथांनी थोडीशी निराशा झाल्याविना राहणार नाही.

'देव-दगड कीं खडक' ही या संग्रहांतील अेक चांगल्यापैकी लघुतम कथा आहे. ही कथा नू. म. विद्यालयाच्या मासिकांतून घेतली आहे. विद्यार्थिदशेंतील या कथेवरून लेखकाच्या पुढील कथावाङ्मयाबद्दल भरवसा वाटतो. 'कालप्रवाह' हें अेक सुशिक्षित पांढरपेशा तरुण मनाचें स्वप्न आहे. 'तिची मुलगी' अतिरंजित आहे. समाजावर केवळ सूड घेण्याकरिता म्हणून वेश्याव्यवसायाला सुरुवात करणाऱ्या तरुणी कितीशा असतील याबद्दल दाट शंका वाटते. 'अपूर्णा' देखील अपवादात्मक आहे. रॉबर्ट ब्राअुनिंग व मिसेस ब्राअुनिंग यांचें चरित्र आणि त्यांच्याच जीवितावर आधारलेलें 'बॅरेट्स ऑफ् विंपल स्ट्रीट' यावरून अपूर्ण शरीराकडे दुर्लक्ष करणारे आणि मनाच्या पूर्णत्वाला जास्त महत्त्व देअून अपूर्णेशीं विवाह करणारे अगदीच सांपडणार नाहीत असें नाही. परंतु मनाची ही तयारी होण्याला जीवनाचें विशिष्ट तत्त्वज्ञान, ध्येयनिष्ठा, अुदात्तता अित्यादींचें पाठबळ लागतें. परंतु त्यांचा लेशहि 'अपूर्णे'च्या चंद्रकांतांत आढळत नाही. त्याचा त्याग नकली आणि तकलुपी वाटतो तो त्यामुळे.

कथाविषयाच्या बाबतींत जरी अनुभूति अगर सहानुभूति यांच्या अभावामुळे वाचकांचा विरस होत असला तरी भाषा आणि संवाद यांत मात्र लेखकांनी आपली प्रगति खास दाखविलेली

आहे. प्रो. न. र. फाटक यांची या कथासंग्रहाला मार्मिक प्रस्तावना आहे हें अेक या संग्रहाचें वैशिष्ट्य आहे.

नवोदित लेखकांनी आपल्या आवांक्याबाहेरच्या अशा कोणत्याहि विषयांवर गोष्टी लिहिल्या तर काय घडतें याचें आणखी अेक अुदाहरण म्हणून श्री. शाम गोऱ्हे यांच्या 'संगम' या कथासंग्रहांतील कांही गोष्टींकडे बोट दाखवितां येअील. 'अर्थाचा खरा अर्थ', 'संगम' या कथांत विवाहित स्त्रीनें नोकरी करणें अिष्ट कीं अनिष्ट हा विषय असून लेखकाने निदानहि सूचित केलें आहे. प्रेम, विवाह, घटस्फोट असल्या विषयांअैवजीं लेखकाने आपल्या सभोंवतींच्या शालेय वातावरणांतील किंवा घरगुती जीवनांतील विषय निवडले असते तर याहून सरस कथा त्याला लिहितां आल्या असत्या. प्रसिद्धीची हौस आणि त्या हौसेला पोषक अशी प्रकाशनाची सुलभ अनुकूलता या गोष्टीहि नवोदित लेखकांच्या प्रगतीच्या आड येतात. परिष्करणाने आहेत त्याच गोष्टी देखील सुधारतां आल्या असत्या. श्री. श्याम गोऱ्हे यांची चिकाटी आणि लेखनाची हौस यांमुळे त्यांच्या पुढील लेखनांत वरील प्रकारची सुधारणा घडेल अशी आशा वाटते.

अेखादी गोष्ट वाचकाच्या मनावर जास्त परिणामकारकतेने बिंबविण्याच्या प्रयत्नांत अति-रंजकतेचा दोष लेखकाच्या पदरीं पडण्याचा संभव असतो. 'समुद्रमंथनां'तील 'तिची मुलगी' या कथेंत जसा हा दोष आढळतो तद्वत् श्री. स. अ. शुक्लांच्या 'कागदी बदाम' या संग्रहांतील 'वैजनाथ'लाहि हाच दोष चिकटलेला आहे. प्रणयिनीच्या आहारीं जाअून ज्या जन्मदात्याच्या पैशावर प्रेमाचे खेळ खेळतां येतात त्याच जन्मदात्याबद्दल कॉलेजकुमारांत बेगुमानपणा अगदीच आढळत नाही असें नाही; परंतु श्री. शुक्लांचा वैजनाथ आपल्या वडिलांना ज्या प्रकाराने वागवतो तो प्रकार शक्य कोटीं-तला वाटत नाही. बेंड्यांच्या 'वेडीं'त गांवढळ कपड्यांत आलेल्या वडिलांना थेट अेकदम आंत आणूं नकोस असें सांगणारा अेक कॉलेजकुमार दाखविलेला आहे. केवळ 'अिंप्रेशन'च्या मागे लागणाऱ्यांची मजल अितपत फार तर जाअूं शकेल. परंतु 'वैजनाथ' हा वडिलांचें चंबूगवाळें आपल्या हाताने आपल्या खोलीबाहेर टाकून त्यांना खोलींतून हुसकतो. अितकेंच नव्हे तर वडील हयातहि नाहीत असेंहि त्याने सांगितलेलें असतें. या थराला गेलेले कॉलेजकुमार शुक्लांना कोठे आणि किती आढळले कोण जाणे! मातृप्रेमाच्या अुदात्ततेंत आणि निःस्वार्थ-तेंतहि श्री. शुक्ल हे अेका टोकाला जाअून लिहितात असें वाटतें. संस्थानिकाच्या थाटांत राहणारा मुलगा आमच्याजवळ येअून राहा अशी आपल्या आअीची परोपरीने विनवणी करून देखील त्याची 'म्हातारी' आअी भाजी विकून पोट भरते आणि आपण त्याची आअी असल्याचें जगापासून लपवून ठेवते. 'आअी' ही कथा मात्र हृद्य आहे. सदा तोंड वाजविणाऱ्या आणि जगाच्या दृष्टीने वेड्यासारखें वागणाऱ्या म्हातारीच्या अंतःकरणांतील अतृप्त मातृप्रेम फार हळुवार हाताने रंगविलें आहे. 'शेठ ! अेक सिंगल–' ही लघुकथा प्रस्तुत संग्रहांतील चांगल्या-पैकीं म्हणून दाखवितां येअील. याचकवृत्तीच्या लोचट आणि ढोंगी संभावितांपेक्षा सरळ सरळ पोटाकरिता भीक मागणारे भिकारी परवडले. 'शेठ ! अेक सिंगल चहा पाजतां का ?' असें ठराविक लाचार आवाजांत विचारणारा भिकारी आणि रेडिओ अुसना मागण्यापासून अुतरत अुतरत शेवटीं 'आता निदान अेक सिंगल चहा तरी द्याच आम्हांला' असें अगदी रुबाबांत आणि जणू काय हक्काने मागणारा वाअीकर यांच्यांतील फरक परिणामकारकतेने रंगविला आहे. मात्र संभाषणांतून मधूनच आढळणाऱ्या ठराविक साच्याच्या व्याख्यानात्मक परिच्छेदांनी अडखळल्यासारखें होतें. श्री. शुक्लांच्या कथांची बैठक हेतुपूर्ण असते हेंहि अेक त्याचें कारण असावें. त्यांच्या अितर कथांप्रमाणे प्रस्तुत कथांची भाषाहि ओघवती आणि साधी घरगुती

आहे. त्यामुळे प्रस्तुत संग्रहाला दिलेलें 'कागदी बदाम' हें नांव सार्थ वाटतें. टरफल फोडण्याचा त्रास फारसा न जाणवतां आंतील 'बदाम' खातां येतात.

चालू जमान्यांतील लघुकथांतून ऐतिहासिक कथा क्वचितच वाचावयास मिळतात; परंतु प्रो. चिं. वि. जोशी यांचें 'नवें भारूड' याला अपवाद आहे असें म्हणावयास पाहिजे. 'नवें भारूड' या त्यांच्या नव्या कथासंग्रहांतील 'आद्य कलावंत' हें प्रहसन आपणाला प्रागैतिहासिक काळांत नेतें, तर 'धर्मदायाद' आणि 'क्षमा' या कथा बुद्धकालीन वातावरण निर्माण करतात. कोणत्याहि नव्या कल्पनेच्या अुत्पादकांची गणना मायेफिरूंत करून सनातन समाज त्यांची विल्हेवाट कशी लावतो आणि फिरून त्यांच्याच कल्पकतेचीं फळें स्वतःच कशीं निर्लज्जपणें चाखतो हें 'आद्य कलावंत' या प्रहसनांत मोठ्या परिणामकारकतेने दाखविलें आहे. आद्य कवि, आद्य चित्रकार, आद्य पाकशास्त्रज्ञ आणि नर्तिका यांचीं अुदाहरणें घेअून समाजाचा केलेला अुपहास प्रो. जोशी यांच्या नेहमीच्या अुपहासात्मक विनोदाला साजेसाच आहे. 'धर्मदायाद' आणि 'क्षमा' या कथा या दृष्टीने जरी श्रेष्ठ दर्जाच्या नसल्या तरी त्यांतील बुद्धकालीन वातावरणाच्या नावीन्याने त्या वाचनीय वाटतात. व्यक्तींचीं आणि स्थलांचीं नांवें, त्यांचीं वर्णनें, त्यांच्या भावना, त्यांचे वाक्प्रयोग अित्यादींच्या साहाय्याने प्रो. जोशी वाचकांना थेट बुद्धकालांत नेअून अुभे करतात. 'पिरली' हीहि कथा दक्षिण हिंदुस्थानच्या अितिहासांतील आहे. ब्राह्मणशूद्र-विवाह हा या कथेचा विषय आहे. ब्राह्मण पिता आणि शूद्र माता अशा संकरापासून झालेली प्रजा आपापल्या क्षेत्रांत कर्तबगार निघाली आहे. ऐतिहासिक काळांतली कथा असूनहि आजच्या पुरोगामी वाङ्मयांत ती सहज शोभून जाअील. वर अुल्लेखिलेल्या कथांखेरीज बाकीच्या कथा मात्र विसाव्या शतकांतील आहेत. 'द्विविध दर्शन' 'चिमणराव स्टेट गेस्ट'ची आठवण करून देतें. प्रो. जोशी हे केवळ कलेकरतां कथा लिहिणारे नाहीत किंवा जीवन आणि कला यांची सांगड घालण्याचीहि त्यांची अिच्छा कोठे ऐकिवांत नाही; परंतु समाजाचें बारकाअीने अवलोकन करून त्यांतील विषमता, ढोंग अित्यादींचा आपल्या अुपहासअुपरोधगर्भ लेखणीने समाचार घेणाऱ्यांपैकी ते अेक विनोदी लेखक आहेत. प्रस्तुत संग्रहांत त्यांचें नेहमीचें विनोदी वातावरण आढळत नाही; परंतु 'अस्पृश्य' आणि 'बालकलावंत' यांत सामाजिक अन्याय आणि स्वार्थी वृत्ति यांचा त्यांनी समाचार घेतलेलाच आहे. 'माझें सुखस्वप्न' यांतील अुपरोधहि परिणामकारक आहे. 'अेका विद्यार्थ्याची रोजनिशी' या संग्रहात घातली नसती तर बरें झालें असतें. प्रो. जोशी यांचा पहिला प्रसिद्ध झालेला लेख म्हणूनच त्याला महत्त्व दिलेलें दिसतें. बाकी प्रस्तुत संग्रहाचें नांवच मुळी 'नवें भारूड' असें असल्याने प्रहसन, रोजनिशी, अित्यादि त्यांत सामावयास हरकत नाही. वेळीं अवेळीं माणुसकीच्या गप्पा मारणाऱ्याने शेवटची 'माणुसकी' ही गोष्ट अवश्य वाचावी. 'ग्रंथपाळ' ही गोष्ट आणि त्यावर आधारलेलें मुखपृष्ठावरील व्यंगचित्रहि सुंदर आहे. विनोदी कथांबरोबर गंभीर स्वरूपाच्या कथा देखील प्रो. जोशी परिणामकारकतेने लिहूं शकतात याचें थोडेसें प्रत्यंतर प्रस्तुत संग्रहांत पाहावयास मिळतें.

गं. ब. ग्रा.

## कादंबरी

**१ कोकणचा पोर**— ले० श्री. न. चिं. केळकर; प्रका० श्री. ग. वि. पटवर्धन, ९ अिस्माअील बिल्डिंग, फोर्ट, मुंबअी; मूल्य रु. १॥।.

**२ नागकन्या**— ले० श्री. ग. त्र्यं. माडखोलकर; प्रका० देशमुख आणि कं०; १९१ शनिवार पेठ, पुणें २; मूल्य रु. २.

३ **पारिजातकाचीं फुलें**— लें० श्री. वि. वा. हडप; प्रका० आदर्श वाङ्मय प्रकाशन, सातारा; मूल्य रु. २.

४ **आघाडीवर**— लें० श्री. व्यं. रा. खंडाळीकर; प्रका० श्री. गो. वा. कुलकर्णी, महाराष्ट्र ग्रंथ भांडार, कोल्हापूर; मूल्य रु. १॥.

५ **तात्या**— लें० श्री. ना. धों. ताम्हणकर; प्रका० देशमुख आणि कं., पुणें २; मूल्य रु. २.

६ **महापूर**— लें० श्री. वि. द. चिंदरकर; प्रका० श्री. कृ. ना. सापळे, रामकृष्ण प्रकाशन मंडळ, त्रिभुवन रोड, मुंबअी ४; मूल्य रु. १॥.

७ **आअी**— लें० श्री. वि. वा. हडप; प्रका० आदर्श वाङ्मय प्रकाशन, सातारा; मूल्य रु. २.

व्यासंग आणि अनुभव यांचा ललितवाङ्मयांत संयोग झाला तर तो किती नितान्त-रम्य असतो हें पाहावयाचें असेल तर श्री. तात्यासाहेब केळकर यांची 'कोकणचा पोर' ही कादंबरी वाचावी. कोकणचें प्रेम, दर्यावर्दी लोकांचें कौतुक आणि स्वावलंबनाच्या सामर्थ्यावरील दृढ विश्वास या तीन भावना 'प्रकट' करण्याच्या हेतूने त्यांनी ही कादंबरी लिहिल्याचें प्रस्तावनेंत सांगितलें आहे. प्रत्यक्ष कादंबरी अेखाद्या 'देशस्था'ने वाचली तरी त्यालासुद्धा कोकणचें प्रेम वाटूं लागेल अितकें या कादंबरींतील वातावरण आकर्षक झालें आहे. कोकणकिनाऱ्यावर आढळणाऱ्या प्रत्येक लहानमोठ्या लाटेबरोबर लेखकाचें मन संवादीपणाने आंदोलत आहे हें पानोपानीं दिसतें. नुसतें 'कोकणस्थ' होअून कोकणाशीं अितकें समरस होतां येणार नाही. सूक्ष्म अवलोकनाने, दृढ परिचयानेच अितकी समरसता येअूं शकते. ती समरसता या कादंबरींत चांगली प्रकट झाली आहे. दर्यावर्दी जीवनाविषयी त्यांना अतिशय कौतुक वाटतें हें आपल्या नायकाचें (कोकणच्या पोराचें) 'कुणक्या'चें त्यांनी जें कौतुक सर्व कादंबरीभर केलें आहे त्यावरून दिसतें. दैवाची सर्वत्र मेहेरबानी असलेल्या कुणक्याबद्दल कोणासहि कौतुक वाटेल. पराक्रमापासून तों प्रेमापर्यंत त्याची सारखी चलती आणि बढती होत आहे. लेखकांची या कोकणच्या पोरावर अितकी माया आहे की, त्याच्या जीवनांत कोठेहि संदेह, संभ्रम, निराशा, झगडा अित्यादि गोष्टी त्यांनी अुत्पन्न होअूं दिल्याच नाहीत ! लेखकांच्या दर्यावर्दी जीवनाविषयीच्या कौतुकाचें अस्सल स्वरूप कादंबरीच्या अैतिहासिक पार्श्वभूमींत आहे. अैतिहासिक कादंबरीच्या दालनांत या कादंबरीने अेक वैशिष्ट्य स्थापन केलें आहे. आंग्ऱ्यांची राजवट कोकणकिनाऱ्यावर अैन भरांत असतांना जी वस्तुस्थिति होती ती कथानकाची पार्श्वभूमि आहे. नुसत्या ग्रांथिक अभ्यासाने अैतिहासिक अचूकपणा मिळवून निर्मिलेली अैतिहासिक वातावरणाची पार्श्वभूमि आणि या कादंबरींतील अैतिहासिक पार्श्वभूमि यांत फार मोठें अंतर आहे. या कादंबरीच्या लेखकाचें मन त्या वातावरणाशीं स्वभावतःच समरस झाल्यानें ह्या पार्श्वभूमीला अैतिहासिक रुक्षपणा न येतां अगदी वर्तमानकालीन ताजेपणा आला आहे. आज आपण कोकणांत गेलों तरी आपल्याला पृ. ५६-५७ वर वर्णन केलेल्या कान्होजीच्या परिवाराचें, वैभवाचें दर्शन होअील असें वाटूं लागतें. विजयदुर्ग किल्ल्यामोंवतालचें ३०० वर्षांपूर्वीचें वातावरण वाचकाच्या मनावर साक्षात् रंगविण्याचें कौशल्य या कादंबरींत लेखकांनी दाखविलें आहे. यांत त्यांचा अितिहासाचा व्यासंग व विषयाचा जिव्हाळा हीं दोन्ही प्रत्ययास येतात. फिरंग्यांचे कावे, त्यांच्या धूर्तपणाच्या हालचाली, त्यांना पूर्ण ओळखणाऱ्या आंग्ऱ्याचा दरारा आणि पराक्रमांत, विजयांत नेहमी प्रकट होणारें 'मराठी' औदार्य हीं पृ. १३४ ते १४८ अि०






भागांत पूर्णपणें व्यक्त झालीं आहेत. तें वाचल्यावर व कान्होजीची सावधानता पाहिल्यावर क्षणभर असें मनांत येते की, अितकी जागरूकता, अितकी धडाडी आणि अितका कडवेपणाहि असूनहि शेवटीं फिरंगी वरचढ कसे झाले ? कदाचित् औदार्य आणि आत्मविश्वास यांच्या अतिरेकामुळे सावधानता लोपून गेली असेल !

रचनेच्या दृष्टीने विचार केल्यास या कादंबरीचा प्रकार कांहीसा जुन्या जमान्यांतला वाटेल. लेखक आधी सगळें पाहून आला आहे आणि मग वाचकांना आपल्या भोवती जमवून तो सगळें सांगत आहे असा अेकंदर प्रकार आहे. जणू काय आपण प्रत्यक्षच ती कथा अनुभवीत आहोंत— निदान पाहत आहोंत— असा आभास वाचकाच्या मनांत अुत्पन्न करण्याचें आधुनिक तंत्र या कादंबरींत नाही. आता हें सांगतों, आता तें सांगतों, असें अगदी बाळबोध वळणाचें हें तंत्र आहे. सूचकतेच्या अुपयोगाने वाचकांचा अनुभव जास्त अुत्कट करण्याचा मार्ग न स्वीकारतां वाचकास कांही त्रास न देतां आपलें कार्य करण्याची ही लेखनपद्धती आहे. देशस्थास हें वातावरण नवें असल्याने त्याची अुत्सुकता याहि निवेदनपद्धतींत कायम राहते. कोकणस्थास कदाचित् हें थोडेंसें रूक्ष वाटेल. परंतु अैतिहासिक पार्श्वभूमीच अितकी आकर्षक आणि अुठावदार झाली आहे की, तेथे कोणाचीहि वृत्ति अुत्कंठित झाल्याखेरीज राहणार नाही.

संयम आणि सूचकता हे गुण लेखकांच्या लेखणींत अगदी स्वाभाविकपणें वावरतात. याचें अुदाहरण म्हणजे पृ.८८ वरील नायिकेचें— रतनचें— वर्णन. रसिकता आणि लालसा यांतील अंतर पाहावयाचें असेल तर या कादंबरीचें ८८ वें पान, नंतर त्याच प्रकरणांत वर्णिलेला नायक-नायिकेचा ज्योत्स्नाविहार वाचल्यावर 'नागकन्ये'तील पृ. १३८ वर नागराजाने केलेला ज्योत्स्ना-विहार वाचावा ! वातावरण, पात्रांचे स्वभाव आणि बोलणें आणि हालचाल यांची सुसंगति पाहावयाची असेल तर 'कोकणचा पोर' पाहावा आणि विसंगति किंवा दुष्ट संगति पाहावयाची असेल तर 'नागकन्या' वाचावी !

'नागकन्या' या श्री. माडखोलकर यांच्या कादंबरींत अेक प्रादेशिक वातावरण असल्याचा भास मधून मधून होतो. तापीच्या कांठीं असलेल्या अेका जंगलांतील गोंडवनांत कांही निराळें अपरिचित जग पाहावयास मिळेल असें वाटूं लागतें, परंतु लवकरच हें वाटणें फोल ठरतें. लेखकाने आपणांस वाटमारी करणाऱ्या वाटाड्याप्रमाणे जंगलांत भलतीकडे नेल्याचें आढळून येतें. आजोबाच्या समाधीचें दर्शन घेण्यासाठी आलेल्या अुस्मानिया युनिव्हर्सिटीच्या अुल्लू विद्यार्थ्याबरोबर लेखकाच्याहि मनोवृत्तीचा तो नागलोकींचा नंगा नाच पाहून वाचकास आपण या माणसावर विश्वास ठेवल्याबद्दल स्वतःचा संताप येअूं लागतो ! आपली घोडी आणि ती गोंडवनांतील नागकन्या यांच्याकडे सारख्याच रसिकपणें पाहणारा नायक— रंगा ! त्याच्या कामेच्छेला भरपूर वाव देअूनहि स्वतः निर्विकार राहिल्याची अैट मारणारी ती नायिका— मदिया ! अेकान्त पोहण्याच्या वेळचें जलवस्त्र (?) नेसून रंगा आणि मदिया यांनी केलेल्या जलविहारांतील विविधता वाचल्यावर हें सगळें ज्याला खडान्‌खडा माहीत आहे त्याच्या बुद्धिमत्तेचें कौतुक करावेसें वाटतें ! अेका तरुणीने रंगासारख्या अेखाद्या अुमद्या 'घोड्या'वर अेकदम खूप होणें आणि त्याच्या घट्ट कवेंत, तसले मागील अनुभव आठवीत, त्या नव्या अनुभवाचें स्वैर रसग्रहण करणें, हें सगळें खरें वाटावें म्हणून लेखकाने मदियेला अमेरिकन केलें असावें. अेखाद्या देशी मदिराक्षीला तसला ज्योत्स्नाविहार झेपला नसता ! पाश्चात्य समाजांत तें लोकांच्या अंगवळणीं पडलें असेल. परंतु रंगाची— आपल्या जातभाअीची— अेवढी परवड लेखकाने कां केली तें समजत नाही ! जीवनाची गोडी वाटण्यासाठी, दृष्टिकोन बदलण्यासाठी, ज्याला कामुकतेखेरीज दुसरा

मार्गच नाही तो जीवनांत कायमचा गारद झाला तरी काय बिघडलें मोठें ? रंगानें मदियेची केलेली आराधना ही अेखाद्या विषयलंपटासहि लाजविण्यासारखी आहे. कारण विषय-लंपटास कामपूर्तीसाठी अितकी यातायात करावी लागत नाही ! अेकीकडे मदिरेच्या अर्धनग्न व नंतर नग्न देहाला अनिवारपणें कवेंत घेत असतां मदिया त्याला देशप्रेमाचे पाठ देत असते आणि रंगा स्वतःच देश समजून आपल्या हीनत्वाचें वर्णन करीत असतो. प्रीति हा यौवनाचा धर्म नाही, तो तारुण्यांतला अेक मद आहे, ज्वानीची अेक जोप आहे,' हें रंगाला पृ. ११८ वरच समजल्याचें लेखक सांगतात. मग पृ. १३५ वर ज्वानीचा नंगा नाच कां सुरू झाला? कीं, तो मद, तो जोप, कसा असतो हें वाचकांस खुलासेवार समजणें अतिशय जरूर आहे असें लेखकास वाटलें? मदिया आणि रंगा यांनी आपल्या यौवनाचा आविष्कार कसा करावा हा काय अितका महत्त्वाचा प्रश्न आहे की, तो सोडवितांना लेखकाने तेथे हजर असा-वयासच पाहिजे?

मदियेचे अुद्गार अतिशय मननीय आहेत. लेखकाने आपले विचार त्यांत सांठवले आहेत. परंतु लेखकाने मदियेचें तोंड आपले विचार सांगण्यासाठी अुपयोगांत आणल्याने मदियेबरोबर लेखकाचीहि रंगाने मुस्कटदाबी केली आहे ! रंगाअैवजी दुसरा अेखादा देहानें नि मनानें धडधाकट असा नायक लेखकाने अुत्पन्न केला असता तर मदियेच्या तत्त्वज्ञानाचें सार्थक झालें असतें. परंतु मदिया समोर असतां रंगाचे कान बंदच होत आणि डोळे फक्त अुघडे राहत ! त्यामुळे त्याला मदियेचा असा रंग नि तसा रंग दिसे, हातांना घट्ट स्पर्श कळे, कवेचें काम करतां येअी, परंतु मदियेचे शब्द मात्र अैकूं येत नसत ! असो. अशा नातवाचा तो ज्योत्स्ना-विहार आजोबांच्या दृष्टीस पडला असता तर त्यांनी दुःखावेगाने त्याच डोहांत जलसमाधि घेतली असती !

मापा अैनभरांत आलेली, अवलोकनशक्ति अितकी सूक्ष्मत्व पावलेली, विचारांतहि सामर्थ्य आलेलें अशा वैभवास पोहोचलेले लेखक आता अेकदम नागलोकांत शिरू लागले तर काय करावें ? टाण्यास बोललेले लेखक ते हेच काय ?

अस्पृश्यतानिवारणाच्या प्रश्नाचा कथानकाच्या माध्यमाने विचार करणारी 'पारिजातकाचीं फुलें' ही कादंबरी आहे. अस्पृश्यतेच्या प्रश्नाचा विचार पुष्कळ वेळां धार्मिक बुद्धीने आणि भूतदयेने केला जातो. त्या प्रश्नाच्या मागे कांही समाजशास्त्राचा आधार आहे आणि त्या प्रश्नाकडे शास्त्रीय दृष्टीने पाहिलें पाहिजे अशा हेतूने श्री. हडप यांनी ही कादंबरी लिहिली आहे. या भूमिकेवरून पाहिल्याने अस्पृश्यांचा प्रश्न हा अेखाद्या जातीपुरता, अल्पसंख्याकांपुरता मर्यादित नसून समाजांत अस्पृश्यता निरनिराळ्या स्वरूपांत कशी वावरत आहे, हें श्री. हडप यांनी दाखविलें आहे. अस्पृश्यांना आपल्यापासून दूर टेवण्याच्या अट्टाहासाने स्पृश्य आणि अस्पृश्य यांचा परिचय होअूं शकत नाही. परंतु जुन्या पिढीने अुभारलेल्या या कृत्रिम भेदाच्या भिंती निरुपयोगी आणि अनावश्यक ठरल्यामुळे कोसळत आहेत आणि नवी तरुण पिढी अस्पृश्यांशीं प्रत्यक्ष परिचयांत आल्याने माणुसकीच्या भूमिकेवर पूर्वीचे कृत्रिम भेद लोपले आहेत. या दृष्टीने या प्रश्नासाठी जुन्या पिढीचा हृदयपालट करण्याच्या कामीं व्यर्थ श्रम करण्यापेक्षा, नव्या पिढीचींच स्वच्छ अंतःकरणें हातीं घेतलीं तरच समाजांतील विविध भेदाभेद नाहींसे होतील असें लेखकाचें विवेचन आहे.

साम्यवादाविषयीं आकर्षण वाटणाऱ्या तरुण लेखकाची 'आघाडीवर' ही अेक ललितकृती आहे. या कृतीवरून त्यांनी साम्यवादाचा बराच अभ्यास केला आहे असें दिसतें.

त्या अभ्यासानंतर आपल्या समाजाच्या प्रगतीसाठी साम्यवादाचा अुपाय लागू पडेल असें त्यांस वाटलें आणि त्या अुपाययोजनेचें स्वरूप कसें असेल हें त्यांनी अेका कथेच्या द्वारे या कादंबरींत दाखविलें आहे. या देशांतील सामाजिक प्रश्न सोडवितांना देशविशिष्ट अशी कांही परिस्थिति आहे हें लक्ष्यांत घेतलें पाहिजे. तें न करतां साम्यवादाचें तत्त्वज्ञान जसेच्या तसें या समाजांत प्रस्थापित करण्याचा प्रयत्न अयशस्वी झाल्याखेरीज राहणार नाही. साम्यवादी समाजाचें चित्र रेखाटतांना श्री. खंडाळीकर यांनी तें देशविशिष्ट स्वरूप फारसें लक्ष्यांत न घेतल्याने या कादंबरींतील जीवनांत बराचसा स्वप्नाळूपणा माजला आहे. या समाजाचे प्रश्न सोडवितांना निरनिराळ्या मार्गांनी प्रयत्न करणाऱ्यांना कोणत्या अडचणी आल्या व येत आहेत याची श्री. खंडाळीकर यांस जाणीव आहे. त्याच अडचणींतून आपला मार्ग काढण्याचा त्यांनी अेक प्रयत्न केला आहे. आणि 'पांढरा रंग, पांढरें निशाण' हें त्या प्रयत्नाचें प्रतीक आहे. समाजांतील जातिभेद व वैयक्तिक जीवनांतील कर्तव्यभेद यांचा अेकोपा करण्याचा मार्ग दाखविणारा रंग म्हणजे सर्व रंगांचें मूळ रूप असा पांढरा रंग त्यांनी योजिला आहे. तिरंगी झेंडा हाहि भेदांस मान्यता देतोच. म्हणून तो त्यांनी नाकारला आहे! रंगापुरतें हें विवेचन शास्त्रशुद्ध असलें तरी समाजांतील विविध वृत्तींचें अेकीकरण करण्यास हा मार्ग कितपत शास्त्रशुद्ध ठरेल हा प्रश्न आहे. या मार्गाचा प्रयोग करण्यासाठी अभ्यासू आणि धडाडीचे असे तरुण पुढे येत आहेत. त्या तरुणांना वश करण्यासाठी कां होअीना तरुणीहि पुढे येत आहेत. आणि प्रसंगीं कौटुंबिक कर्तव्याला नि मायापाशाला लाथाडण्याची तयारी असलेले कार्यकर्ते या मार्गाकडे निघाले आहेत, हें या कादंबरींतील चित्रण स्फूर्तिदायक आहे. दलितवर्गाच्या परिस्थितीचें प्रत्यक्ष दर्शन झाल्यामुळे तरुणांचा दृष्टिकोन बदलल्याचें लेखकाने चांगलें दाखविलें आहे. परंतु अितकी पूर्वतयारी झाल्यावर त्यांना मार्गदर्शन करावयाचें कार्य अतिशय अवघड होतें. त्या ठिकाणीं लेखकाने आपल्या पात्रांच्या लायकी-नालायकीचा फारसा विचार करतां, परिस्थितीतील संभाव्यतेची फिकीर न करतां त्यांना कळसूत्री बाहुलीप्रमाणे नाचवलें आणि लोळवलें आहे. श्री. खंडाळीकर यांनी प्रत्यक्ष वस्तुस्थितींतील संभवनीयतेचा जास्त अभ्यास केल्यास त्यांचे, चालू समाजाचें साम्यवादी भवितव्य रंगविण्याचे प्रयत्न यशस्वी होतील अशी या कादंबरीवरून खात्री वाटते.

श्री. ना. धों. ताम्हनकरांनी लाल दिव्यासारखें अुपयोगी पडणारें चरित्र म्हणून 'तात्या' हें पुस्तक लिहिलें आहे. नीच मनुष्याला बुद्धीचें थोडेंसें साहाय्य असलें तर तो कायदेशीर जगांतहि किती सुरक्षित राहूं शकतो याचें तात्या हें अुदाहरण आहे. आरंभीं आरंभीं तात्या हा अेक घुम्या आणि विचित्र तर्कशास्त्राने चालणारा माणूस आहे असें वाटतें. त्याच्या तर्कशास्त्राचें वैचित्र्य वाचकास नीट दिसावें यासाठी लेखकाने योजलेली निवेदनपद्धती अद्भुत कथेसारखी आहे. तात्याविषयीच्या कांही गोष्टींवरून तो अेखाद्या विशिष्ट प्रसंगीं अमक्या तऱ्हेने वागेल अशी वाचकाची अपेक्षा अुत्पन्न होते. परंतु त्याचें वागणें त्या अपेक्षेच्या अगदी विरुद्ध असतें. असें कसें झालें असें अेक आश्चर्य अुत्पन्न होतें आणि मग लेखक त्या वागण्याची हकीगत सांगून आश्चर्य दूर करतात. तात्यासारख्या कमालीच्या व्यवहारी व स्वार्थी माणसाचें वागणें सामान्यतः अितरांस अनपेक्षित असतें. लोकांच्या अपेक्षेला धक्का देणें हेंच तात्याचें कौशल्य! श्री. ताम्हनकरांनी तात्याच्या वागण्यांतलें अेक अेक तत्त्व अुलगडतांना अतिशय कौशल्य दाखविलें आहे. तात्याच्या वयाबरोबर त्याचा दुष्टपणा वाढत गेला. त्याने दोन बायका करणें, तिसरीच्या नादाने त्यांचा छळ करणें, पैशावर डल्ला मारणें, बुवाबाजी करणें

अित्यादि प्रताप त्याने केले; आणि ते सर्व यशस्वीपणें! त्याच्या प्रतापाला बळी पडणाऱ्या माणसांच्या हालअपेष्टांचें वर्णन वाचतांना तात्यासारख्या माणसांचा बंदोबस्त कसा करावा असा विचार वाचकाच्या मनांत सारखा घोळत राहावा हें लेखकाचें कौशल्य आहे आणि पुस्तकाच्या शेवटीं या असह्य होत चाललेल्या प्रश्नाचें अुत्तर दिलें आहे की, तात्यासारखीं माणसें आपल्या समाजव्यवस्थेंतील दोषांवर जगत असतात. ते दोष हेच त्यांचें संरक्षण. समाजाची न्यायबुद्धि अेकांगी आहे आणि अन्यायाची जाणीव निर्जीव झाली आहे. त्यामुळे तात्यासारखे समाज-कंटक हे राजरोसपणें मिरवत असतात हा विचार वाचकाच्या मनावर बिंबावा असा लेखकाचा हेतु आहे. तो प्रत्यक्ष तत्त्वप्रतिपादन न करतां कथानकांतील सूचकतेने बराचसा साधला आहे. परंतु प्रसंगांची गर्दी थोडी कमी झाली तर सूचकतेस जास्त वाव मिळेल असें वाटतें. तात्याच्या अुत्तरार्धाच्या वेळीं श्री. ताम्हनकर याचा विचार करतील अशी आशा आहे. तसेंच कथनपद्धतींत अुलटापालट करून आश्चर्य अुत्पन्न करण्याच्या प्रयोगावर त्यांनी थोडा कमी भर द्यावयास हवा. त्या युक्तीचा परिचय झाल्यावर मग तें आश्चर्य नाहीसें होतें आणि त्या कथनपद्ध-तीचा कंटाळा येतो. 'दाजी' आणि 'गोट्या' यांच्यापेक्षाहि 'तात्या' या पुस्तकांत जास्त आकर्षक-पणा आहे; कारण कृत्रिमता कमी आहे. भाषेची परिणामकारकता अलंकारादिकांवांचूनहि प्रत्य-यास येते. कारण जे प्रसंग वाचकास कळण्यासाठी भाषेचा अुपयोग केला आहे ते प्रसंग अनु-भवास तत्काळ जुळणारे असे आहेत. त्यांना भाषेचा फारसा वशिला लागत नाही.

कोकणच्या जीवनाचें अेक दर्शनीय शब्दचित्र 'महापूर' या कथेंत श्री. वि. द. चिंदरकर यांनी रेखाटलें आहे. भाषेचा साधेपणा व रचनेची सरलता हे श्री. चिंदरकरांच्या लेखनपद्धतीचे परिणामकारक विशेष आहेत. अनुभवाचें पाठबळ असल्यावर त्या अनुभवाचें चित्रण आपोआप आकर्षक होतें हें या कथेवरून पटतें. खेडेगांवांतल्या समाजांत भांडवलशाहीचे स्वैराचार किती अनिर्बंधपणें चालतात आणि जगण्याचीं साधनें अगदी मर्यादित असल्याने खेड्यांतील जनता त्या जुलुमांपुढे कशी अगतिक होते हें लेखकाने अनेक प्रसंगांनी स्पष्ट केलें आहे. परंतु नुसतें अेवढेंच दाखवणें हा लेखकाचा हेतु नाही. यांतून सुटण्याच्या मार्गाची कांही चर्चा व्हावी हा त्यांचा हेतु आहे. खेडेगांवांतील मूठभर लोकांतहि पक्षोपपक्ष असतात. परंतु जमीनदारांच्या वाढत्या अरेरावीची झळ सगळ्यांना लागू लागली की त्या अरेरावीच्या जुलमाच्या महापुरांत ते पक्षोपपक्ष नाहीसे होतात. अेक सामुदायिक प्रतिकारशक्ति त्या अरेरावींतूनच जन्माला येते. या प्रतिकारशक्तीचा, त्या जागृतीचा, अुपयोग करून घेण्याचा बरोबर मार्ग कोणता? ग्रामोद्धाराच्या मार्गाने अेक अेक खेडें जागृत करावयाचा अेक मार्ग आणि शहरांतून जमलेल्या सामर्थ्याच्या साहाय्याने खेड्यांतील अरेरावीचा अेकदम नायनाट करणें हा दुसरा मार्ग! प्रत्येकास अन्यायाची जाणीव होअून जागृति येअीपर्यंत किती काळ लोटेल? त्यापेक्षा कांही निवडक लोकांनीच पुढे येअून अरेरावीवर हल्ला चढवावा हें जास्त चांगलें. अशा विचारांतून सामाजिक वैचारिक जागृतीच्या लांबलचक मार्गापेक्षा राजकीय स्वातंत्र्याचा मार्ग जास्त जवळचा आहे असा विचार लेखकाने पसंत केला आहे. कारण जागृति आणि स्फूर्ति अुत्पन्न करण्याचे आजपर्यंत पुष्कळ प्रयोग झाले. त्या मानाने प्रत्यक्ष फळ मात्र फारसें मिळालें नाही. तेंव्हा सत्ता हाच मार्ग अुरला आहे. सत्ता मिळाली तर सगळ्यांना बुडवूं पाहणाऱ्या अज्ञान नि अरेरावीच्या महापुरांतून समाज वांचवतां येअील असें लेखकाचें मत आहे. कादंबरींतील धडाडीच्या तरुणा-करवीं त्यांनी हें मत परिणामकारक रीतीने प्रतिपादिलें आहे.

गॉर्कीच्या 'मदर' या जगप्रसिद्ध कादंबरीची मराठी वाचकांना ओळख होण्याची

ही संधि श्री. वि.वा.हडप यांच्या 'आअी'ने दिल्याबद्दल त्यांचे आभार मानले पाहिजेत. रशियाचें पुनरुज्जीवन ज्या चळवळीने केलें त्या चळवळीचें जिवंत चित्र अनेक दृष्टींनी अतिशय अुद्बोधक आहे. गॉर्की हा स्वतः त्या काळाशीं समरस झाला होता. त्यामुळे त्याच्या वाङ्मयांत, विशेषतः मदर या कादंबरींत, त्या काळाचें हृदयस्पर्शी प्रतिबिंब पडलें आहे. श्री. हडप हे तत्त्वज्ञानाने त्या चळवळीशीं समरस झालेले दिसतात असें या रूपांतरावरून वाटतें. मोवतालच्या परिस्थितीच्या दडपणाने रशियांतील तरुण हळूहळू जागृत होअूं लागले होते आणि प्रतिक्रियेची स्फूर्ति आणि शक्ति त्यांच्यांत अुत्पन्न झाली. दिव्यावर दिवा लावावा तशीं अंतःकरणें अेकमेकांच्या प्रकाशाने अुजळूं लागलीं आणि हळूहळू मजूरवर्गांतील तरुण प्रतिकाराचें हत्यार पाजळूं लागले. मदारी हा त्या तरुण कामगारांच्या जागृतीचा प्रतिनिधि आहे. जुलुम, कुजबुजत कुरकुरत रुदन करणाऱ्यांचा आवाज चढूं लागला आणि प्रतिकाराचे निरनिराळे प्रकार सुरू झाले. प्रतिकाराच्या भयंकर प्रायश्चित्ताची पूर्ण कल्पना असूनहि कार्यकर्ते डगमगले नाहीत. वैयक्तिक जीवनांतलीं दुःखें, अन्याय यांना बाजूस लोटून राष्ट्रीय पुनरुज्जीवनाच्या कार्यांत तरुण आणि तरुणी सामील झालीं. आपल्या कार्यावर त्यांची अेवढी अचल श्रद्धा बसली की, मोवतालच्या अरेरावीला प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष साहाय्य करणारे आपले बाप, पति, पुत्र असले तरी त्यांचा त्यांनी त्याग केला. तरुण पिढीच्या या जागृतीच्या काळांत अेक वृद्ध स्त्री— मदारीची आअी रमाबाअी— जागी झाली. वैयक्तिक जीवनांतील वैवाहिक जुलुमाखाली मृतवत् झालेलें तिचें मन जिवंत झालें आणि आपलें पूर्वीचें सर्व जीवन विसरून ती आपल्या मुलाच्या कार्याचा संदेश पोहोचविण्याचें काम करण्यास सिद्ध झाली. सर्व तरुण कार्यकर्त्यांविषयी तिला अपूर्व प्रेम वाटूं लागलें आणि ती सर्वांची आअी झाली. नवऱ्याने अनन्वित छळ केल्याने जीवनास कंटाळून मृत्यूची वाट पाहात बसलेली रमा या चैतन्यमय वातावरणांत सर्व तरुण कार्यकर्त्यांची 'आअी' म्हणून पुन्हा जिवंतपणें जगूं लागली. कार्याच्या जाणिवेने तिने आपल्या वैयक्तिक मायामोहाचा त्याग केला हें चित्र अतिशय परिणामकारक आहे.

कादंबरी वाचीत असतां सर्व राष्ट्राला पुनर्जन्म देणारें कार्य व कार्यकर्ते यांचें अस्सल स्वरूप आपल्या डोळ्यांसमोर अुभें राहतें.

श्री. हडप यांनी मराठी वाचकांच्या सोअीसाठी वातावरणाचें मराठीकरण करण्याचा प्रयत्न केला तो मात्र अयशस्वी झाला आहे. नुसतीं नावें बदलून रशियन वातावरणाचें हिंदीकरण करणें शक्य नाही. कारण त्या दोन वातावरणांत नुसता नांवापुरताच फरक नाही. हिंदुस्तानच्या वातावरणांत मदारी आणि रमा यांचे जन्महि अद्याप झाले नाहीत; मग त्यांचें कार्य तर दूरच राहो. तसेंच भाषेच्या बाबतींतहि झालें आहे. अिंग्रजीच्या सासुरवासाने लेखकाची मराठी लेखणी फारच जाचावली आहे. Mother च्या तोंडचें तत्त्वज्ञान हें रमाबाअीच्या तोंडीं अत्यंत विसंगत वाटतें. हिंदी समाजांतील निरक्षर स्त्रियांत अशी 'रमा' दिसण्याचे दिवस किती दूर आहेत कोणास ठाअूक ? श्री. हडप यांनी मराठी वाचकांच्या सोअीसाठी म्हणून केलेले फरक फारसे यशस्वी ठरले नाहीत असें मोठ्या खेदाने म्हणावें लागतें; परंतु अेवढी रुखरुख सोडल्यास सामर्थ्यवान् कलाकृति कशी असते हें कळण्याचें अेक साधन मराठी वाचकांस अुपलब्ध करून दिल्याबद्दल त्यांचे आभार मानणें जरूर आहे. त्यांनी 'आअीचीं लेकरें' लिहावयास घेतलीं आहेत. त्या सत्पुत्रांचा परिचय मराठी वाचकांस लवकरच होअील अशी आशा आहे.

गं. भा. नि.

# महाराष्ट्र-साहित्य-परिषद्

## १९४१ चें अितिवृत्त

वर्षारंभीं पटावर सभासदांची संख्या ९५२ होती. या वर्षांत ६ हितचिंतक, २७ तहहयात व ६१ साधारण असे अेकूण ९४ नवीन सभासद झाले. याशिवाय वर्गबदलीने हितचिंतक व तहहयात सभासद यांच्या संख्येंत अनुक्रमे १ व १३ याप्रमाणे वाढ झाली. मृत्यूमुळे १ तहहयात व ६ साधारण असे पुढील ७ सभासद गळलेः— प्रा. ग.ग. पेंडसे (तहहयात), श्री. वि. कृ. देशपांडे, प्रा. वा. गो. अूर्ध्वरेषे, प्रा. र. श्री. जोगळेकर, श्री. रा. गो. कानडे, श्री. सरदार ना. य. मिरीकर, श्री. ल. गं. काळे.

राजीनाम्यामुळे व वर्गणी बाकी थकल्यामुळे १०६ साधारण सभासदांचीं नांवें पटावरून काढून टाकावीं लागलीं. वर्षाच्या शेवटीं सभासदांची संख्या खालीलप्रमाणे आहे:— अुपकर्ते १, आश्रयदाते ३, साहाय्यक १, हितचिंतक १७, तहहयात १७१ व साधारण ७४०; अेकूण ९३३.

३ नवीन संस्था संलग्न करण्यांत आल्या असून आता पटावर असलेल्या संलग्न संस्थांची संख्या २६ ही आहे.

**आर्थिक परिस्थिति—** हिशेबांत दाखविलेली शिल्लक रु. ७६६-५-४ आहे. या व्यतिरिक्त कागद खरेदीसाठी आगाअू दिलेली रक्कम व अितर येणें यांची अेकूण रक्कम रु. ७४४ मरते. त्याचप्रमाणे अिमारतीसाठी आलेल्या देणग्यांची रक्कम रु. ९५०, पैठणकर पारितोषिकाची रक्कम रु. १०० व कारकुनाचा प्रॉव्हिडंट फंड रु. १७७-४-६ यांचा समावेश हिशेबी शिलकींत झाला असल्याने निव्वळ शिल्लक रु. २८३-०-१० ही आहे.

**देणगी—** अिमारत निधीसाठी मुंबअी अिलाख्याचे लॉर्ड बिशप साहेब यांजकडून रु. ५० ची देणगी आली. या देणगीबद्दल परिषद् त्यांची ऋणी आहे.

**संमेलन—** साहित्य सेवामंडळ, सोलापूर या संलग्न संस्थेकडून ता. १२, १३ व १४ अेप्रिल या दिवशीं श्री. वि. स. खांडेकर यांच्या अध्यक्षतेखाली सोलापूर येथे महाराष्ट्र साहित्य संमेलनाचें २५ वें अधिवेशन भरविण्यांत आलें.

**परीक्षा—** अुमेदवारांच्या सोयीसाठी परीक्षा डिसेंबर महिन्यांत घेण्यांत आल्या. प्राज्ञ परीक्षेसाठी ७७ व विशारद परीक्षेसाठी १४ याप्रमाणे अुमेदवारांचे अर्ज आले होते. परंतु प्राज्ञ व विशारद या परीक्षांस अुपस्थितांची संख्या अनुक्रमे ६४ व १२ याप्रमाणे होती. मुंबअी, पुणें व नागपूर या कायमच्या केंद्रांखेरीज अिंदूर, सांगली व हैद्राबाद येथेहि यंदा केंद्रें ठेवण्यांत आलीं होतीं. पुण्यास गांधी ट्रेनिंग कॉलेज, व नू. म. विद्यालय हायस्कूल येथे परीक्षार्थी अुमेदवारांसाठी नियमितपणें शिक्षणाची व्यवस्था झाली होती. परीक्षक व केंद्राधिकारी यांनी केलेल्या विनावेतन साहाय्याबद्दल परिषद् त्यांची ऋणी आहे.

**सभा—** कार्यकारी मंडळाच्या ९, नियामक मंडळाच्या २, साधारण १ व विशेष साधारण १ याप्रमाणे यावर्षी सभा झाल्या.

**पत्रिका—** परीक्षणाचें सदर विस्तारून विविध विषयांचीं सदरें देण्याच्या अुपक्रमानंतर यंदाच्या वर्षी पत्रिकेच्या अंकांतून संपादक श्री. के. नारायण काळे यांनी वार्षिक साहित्य समालोचन देण्याचा नवीन अुपक्रम सुरू केला. त्यांनी व त्यांच्या सहकाऱ्यांनी केलेल्या परिश्रमांबद्दल परिषद् त्यांची ऋणी आहे.

**समित्या—** परिभाषाचर्चामंडळाचे अुत्साही कार्यवाह श्री. त्र्यं. गो. ढवळे यांच्या

परिश्रमांमुळे या मंडळाच्या सभा नियमितपणें भरविण्यांत आल्या. व्याकरण समितीचे कार्यवाह डॉ. वा. गो. परांजपे यांनी समितीची पुनर्घटना करून तिचें काम अधिक नेटाने चालविण्याची व्यवस्था केली. या दोन्ही समित्यांचे वार्षिक वृत्तान्त या अितिवृत्ताची पुरवणी म्हणून वेगळे प्रसिद्ध करण्यांत येत आहेत.

अितर—परीक्षा समितीचें काम वाढल्यामुळे तिचे स्वतंत्र कार्यवाह म्हणून प्रा. वा. दा. गोखले यांची नेमणूक करण्यांत आली. कारणपरत्वें नेमण्यांत आलेल्या अनेक अुपसमित्यांच्या बैठकी वेळोवेळीं भरविण्यांत आल्या.

डेक्कन कॉलेज कौन्सिलच्या घटनेसंबंधाच्या सरकारी ठरावांत महाराष्ट्र विद्यापीठाच्या स्थापनेसंबंधी व्यक्त करण्यांत आलेल्या सरकारी धोरणाचा निषेध करण्याकरिता फेब्रुवारी महिन्यांत गोखले स्मारक मंदिरांत सर रघुनाथराव परांजपे यांच्या अध्यक्षतेखाली सभा भरविण्यांत आली. सभेंत झालेला निषेधपर ठराव अिलाखाधिपति व अितर अधिकारी यांच्याकडे पाठविण्यांत आला. शिक्षण सल्लागारांकडे पाठविण्यांत आलेल्या शिष्टमंडळांत परिषदेतर्फे श्री. तात्यासाहेब केळकर यांची योजना करण्यांत आली. त्याचप्रमाणे या प्रश्नाविषयी सविस्तर चर्चा, विचारविनिमय व अुपाययोजना व्हावी म्हणून पुण्यांतील ४८ संस्थांस आपापले प्रतिनिधि पाठविण्यास विनंती करण्यांत आली.

मे महिन्यांत पुण्यांत मराठी अध्ययन-अध्यापन परिषद् भरली असतां पुण्याबाहेरील अनेक शिक्षकांस परिषदेच्या कामाची माहिती व्हावी या अुद्देशाने कार्यालयांत रसपानाच्या निमित्ताने निमंत्रण केल्यावरून सुमारे ७५ प्रतिनिधि कार्यालयांत आले होते.

अुन्हाळ्याच्या सुट्टींत पुण्यांत येणाऱ्या अितर गांवच्या पाहुण्यांचा परिषदेच्या सदस्यांशीं परिचय व्हावा म्हणून प्रतिवर्षीप्रमाणे निमंत्रण करण्यांत आलें. यावेळीं सुमारे १२५ मंडळी अुपस्थित होअून परिषदेच्या कार्यास सहायक अशी चर्चा झाली.

---

## व्याकरणसमितीचें सन १९४१ चें अितिवृत्त

**समितीची पुनर्घटनाः**– अितिवृत्ताच्या वर्षी मुख्य काम समितीच्या पुनर्घटनेचें झालें. पूर्वीची समिति महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या विद्यमानें भरलेल्या व्याकरणपरिषदेने नेमिली होती. तिच्यांतील पुष्कळ सभासद अुपस्थित राहूं शकत नव्हते. ज्या ठरावाने व्याकरणसमिति नेमिली त्या ठरावांत तिच्या वार्षिक निवडणुकीविषयीं तरतूद नव्हती आणि अशाकरितां समितीने व्याकरणपरिषदेची शेषाधिकारी संस्था ह्या नात्याने साहित्यपरिषदेला असें कळविलें की ह्या आणि ह्यांसारख्या समित्यांची व्यवस्थित घटना करणें अवश्य आहे. याविषयीं अखेर साहित्यपरिषदेच्या कार्यकारी मंडळाने २४ ऑगस्ट १९४१ रोजीं जे पोटनियम केले ते पत्रिकेच्या अंकांत छापले आहेत. त्याप्रमाणे समितीने नवीन सभासद केले आणि चर्चासभा आणि निर्णयसभा अशा दोन तऱ्हेच्या सभा चालू केल्या. चर्चासभांमध्ये निर्णयसभांची पूर्वतयारी करावयाची असा ह्या दोन सभांत मुख्य भेद आहे आणि त्यामुळे लांबच्या सभासदांशीं विचारविनिमय करणें शक्य झालें आहे.

**निवडणुकी.** चालू सालाकरिता श्री. गो. कृ. मोडक यांस अध्यक्ष म्हणून आणि श्री. वा. गो. परांजपे यांस कार्यवाह म्हणून नेमिलें.

**चर्चासभा.** चालू सालीं ८ व २० फेब्रु., ९ मार्च, १३ व २७ जुलअी, ३ ऑगस्ट,

७, १४ आणि २८ सेप्टें., ५ ऑक्टोबर, ९ नोव्हें. आणि ७ आणि २१ डिसेंबर अशा दिवशीं अेकंदर १३ चर्चासभा झाल्या.

**निर्णय सभा.** निर्णय सभा ऑक्टोबर-नोव्हेंबर महिन्यांत घेण्याचा मानस होता पण परगांवच्या सभासदांच्यापैकी बऱ्याचशा लोकांना येणें अशक्य आहे असें त्यांनी कळविल्यामुळे चालू सालीं निर्णयसभा झाली नाही.

**सभासद.** समितीचे पूर्वीचे सभासद आणि मागाहून स्वीकृत मिळून २२ सभासद आहेत. त्यांचीं नांवें:—

(१) वे. शा. सं. श्री. रंगाचार्य रड्डी, (२) प्रा. कृ. पां. कुलकर्णी, (३) डॉ. प. ल. वैद्य, (४) डॉ. वा. गो. परांजपे, (५) प्रा. श्री. म. माटे, (६) श्री. य. ग. फफे, (७) श्री. गो. कृ. मोडक, (८) श्री. रा. दा. देसाअी, (९) नी. शं. नवरे, (१०) श्री. य. रा. दाते, (११) श्री. चिं. ग. कर्वे, (१२) श्री. ना. गो. चापेकर, (१३) डॉ. शं. दा. पेंडसे, (१४) प्रा. गो. प. पटवर्धन, (१५) श्री. बा. मा. खुपेरकर, (१६) प्रा. वा. भा. पाठक, (१७) श्री. वि. ह. निजसुरे; (१८) प्रा. रा. श्री. जोग, (१९) श्री. गो. ग. निजसुरे, (२०) श्री. अ. बा. रसाळ, (२१) डॉ. कत्रे, (२२) श्री. ह. ना. नेने.

**यंदाचें काम.** चालू सालीं मागील तीन वर्षांतील चर्चेचा सारांश तयार करून तो पत्रिकेच्या ५८ व्या अंकांत प्रसिद्ध केला. ह्या सारांशाच्या व्यतिरिक्त जुलअी महिन्यापर्यंत दुसरें काम म्हणजे पुनर्घटनेचेंच झालें. २७ जुलअीपासून पुनः चर्चेचें काम सुरू झालें. ता. २७ जुलअी रोजीं व्याकरणक्षेत्राचा विचार करून तूर्त अैतिहासिक व्याकरणाचा विचार करावयाचा नाही असें ठरविलें. ३ ऑगस्टपासून पुढे ७ डिसेंबरपर्यंत मराठींतील वर्णांविषयी चर्चा झाली. ता. २८ डिसेंबर रोजीं मराठी वाक्यरचनेविषयी विचार झाला. ह्या चर्चा मुख्यत्वें निर्णयसभांपुढे निर्णयासाठी विषय मांडण्याकरिता असल्यामुळे त्यांचा पत्रिकेंत व्यवस्थित निष्कर्ष देणें युक्त होअील असें समजून या चर्चाविषयांच्या अुपन्यासकांकडून किंवा विरोधकांकडून या विषयांवर स्वतंत्र निबंध पत्रिकेंत छापण्याचा विचार आहे.

**वा. गो. परांजपे**, कार्यवाह

---

## परिभाषाचर्चामंडळाचें १९४१ चें अितिवृत्त

अहवालाच्या वर्षी चर्चामंडळाच्या १७ बैठकी झाल्या. त्यांची विषयवारी अशी:— अनुवंशता ६, कागदनिर्मिति ४, गर्भविज्ञान ३, वैश्वकिरण १, रसायन १, अंतरिक्षसंचार १, वर्णजातिविषयक परिभाषा १.

यांपैकी पहिल्या तीन विषयांची म्हणजे अनुवंशता, कागदनिर्मिति आणि गर्भविज्ञानविषयक परिभाषा चर्चेअंतीं पूर्ण तयार झालेली असून ती यथावकाश प्रसिद्ध व्हावयाची आहे.

मागील अहवालांत अुल्लेखिलेली 'औद्भिदशास्त्र-बाह्यरूप विचार' विषयक परिभाषा आता प्रसिद्ध झालेली आहे. कलनशास्त्र (calculus) विषयक परिभाषा आता प्रसिद्ध व्हावयाची आहे.

या वर्षी हिंदुस्थान सरकारच्या मध्यवर्ती शैक्षणिक सल्लागारमंडळाने परिभाषाविषयक प्रश्नांचा विचार करण्यासाठी नेमलेल्या समितीच्या शिफारसी आणि सल्लागारमंडळाचे निर्णय प्रसिद्ध झाले. त्यांच्या अनुषंगाने चालू असलेल्या कार्याचा अुल्लेख 'पत्रिके'च्या गेल्या अंकीं आलेलाच आहे.

**त्र्यं. गो. ढवळे**, कार्यवाह

# महाराष्ट्र-साहित्य-परिषद्

## जमाखर्च १९४१

### जमा

| रक्कम | तपशील | |
|---|---|---|
| ११३०५–९–० | मागील शिल्लक | |
| १५१८–८–० | साधारण सभासद वर्गणी– | |
| | १९४१ची | १४९७-८-० |
| | १९४२ची | २१-०-० |
| | | १५१८-८-० |
| ६१–८–० | पत्रिका वर्गणी— | |
| | १९४१ची | ५२-८-० |
| | १९४२ची | ९-०-० |
| | | ६१-८-० |
| ९१–०–० | संलग्न संस्था वर्गणी | |
| ८३–८–३ | ग्रंथ | |
| २६–०–० | किरकोळ | |
| | परिभाषा च. मं. | १-०-० |
| | किरकोळ | २५-०-० |
| | | २५-०-० |
| १००–०–० | रत्नागिरी संमेलन देणगी | |
| ९३६–८–४ | व्याज | |
| | ट्रस्टी | ७५०-०-० |
| | खजिनदार. | १६-८-४ |
| | अिचलकरंजी ट्रस्ट | १७०-०-० |
| | | ९३६-८-४ |
| ५०–०–० | अिमारतानिधि देणगी | |
| ८८–०–० | जाहिरात | |
| ५५३–८–९ | परीक्षा | |
| १४८१५–२–४ | अेकूण | |

### खर्च

| रक्कम | तपशील | |
|---|---|---|
| ९४२–१४–३ | कचेरी खर्च | |
| | पगार | ६१९-१३-९ |
| | प्रॉव्हि.फं. | ३६- ४-६ |
| | मुअीमाडें | १५- ०-० |
| | म्युनि. कर | ३१-१३-० |
| | वीज. | १५- ०-६ |
| | टपाल | ११७- ०-० |
| | लिखाअी | ३- २-० |
| | किर.छपाई | ५८-१०-० |
| | सादिल | ४६- २-६ |
| | | ९४२-१४ ३ |
| २०८६–१४–६ | पत्रिका खर्च | |
| | छपाअी | १८०१- ८-६ |
| | टपाल | २८५- ६-० |
| | | २०८६-१४-६ |
| ८–१०–० | परिभाषा परिषद् | |
| ५४– ९–६ | संमेलन खर्च | |
| ११५– ०–० | शाखासभेस द्यावयाची रक्कम | |
| | मध्यप्रांत शा.स. | ३० |
| | द.स.शा.स. | ८५ |
| | | ११५ |
| ८०–१३–० | प्रवास, प्रचार | |
| २०–१५–० | अुपसमित्या | |
| १६२–१५–० | परीक्षा खर्च | |
| ५२–१४–९ | किरकोळ | |
| ८५– ७–६ | संमेलन ठराव अमल बजा. | |
| ११२०४–०–१० | शिल्लक पुढील सा.करिता | |
| १४८१५– २–४ | अेकूण | |

(सही) र. लु. जोशी, चिटणीस

म. सा. प. (१५-२-१४)

अनुक्रमणिका

# महाराष्ट्र-साहित्य-परिषद्

## ताळेबंद १९४१

| देणें | | येणें | |
|---|---|---|---|
| ११२०४-०-१० | शिल्लक | ७८६६- ८-६ | अिमारत |
| १००-०- ० | पैठणकर पारितोषिक | ६१६- ०-९ | सामान |
| १७७-४- ६ | कारकून प्रॉ. फंड | १३६०- ७-३ | ट्रस्टी (तहह्यात वर्गणी) |
| | | १२७-१५-६ | ,, (अिमारत देणगी) |
| | | ७००- ०-० | आर्यसंस्कृति मुद्रणालय अनामत |
| | | २०- ०-० | डॉ. अ. ना. माल्रेराव |
| | | २१- ०-० | द. सं. शाखा सभा |
| | | ३- ०-० | किरकोळ येणें |
| | | ७१८- ४-३ | खजिनदार (बँक) |
| | | ५-१५-४ | चिटणीस (बँक) |
| | | ४२- १-९ | चिटणीस रोख व पोस्टाचीं तिकिटें |
| ११४८१-५- ४ | अेकूण | ११४८१- ५-४ | अेकूण |

(सही) र. लु. जोशी, चिटणीस

### हिशेबतपासनिसांचा शेरा

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे पुणें कचेरीचे ता. ३१-१२-१९४१ अखेर पुऱ्या होणाऱ्या वर्षाचे हिशेब मीं तपासले. हिशेब चांगल्या तऱ्हेने ठेविलेले आहेत. मला पाहिजे असलेली माहिती व खुलासे मला मिळाले. सदरहू जमाखर्च परिषदेच्या पुणें कचेरीच्या येण्यादेण्याची व जमाखर्चाची वस्तुस्थिति दाखवीत आहेत.

(सही) म. वि. गोखले
हिशेबतपासनीस, २७-४-४२

## महाराष्ट्र-साहित्य-परिषद्

### अंदाजपत्रकाशीं जमाखर्चाचा पडताळा (१९४१)

| अुत्पन्न | अंदाजपत्रका-प्रमाणे | प्रत्यक्ष | अंतर | खर्चबाब | अंदाजपत्रका-प्रमाणे | प्रत्यक्ष | अंतर |
|---|---|---|---|---|---|---|---|
| व्याज (ट्रस्टींकडून) | ७५० | ७५० | ० | कचेरीखर्च | ९६० | ९४२ | − १८ |
| व्याज (अिचलकरंजी ट्रस्टकडून) | १२० | १७० | + ५० | पत्रिकाखर्च | २००० | २०८६ | + ८६ |
| साधारण समासद वर्गणी | १९०० | १५१८ | −३८२ | संमेलनखर्च | ५० | ५४ | + ४ |
| पत्रिका वर्गणी | ७५ | ६१ | − १४ | शाखा सभा | १०० | ११५ | + १५ |
| संलग्न संस्था वर्गणी | ६६ | ९२ | + २६ | प्रवास, प्रचार | १५० | ८० | − ८० |
| ग्रंथविक्री | ५० | ८३ | + ३३ | अुपसमित्या | २५ | २० | − ५ |
| किरकोळ | ० | २६ | + २६ | परीक्षा | १७५ | १६२ | − १३ |
| परीक्षाशुल्क अित्यादि | ४०० | ५५३ | +१५३ | सामान | ५० | ११ | − ३९ |
| रत्नागिरी संमेलन देणगी | ० | १०० | +१०० | किरकोळ | ७५ | ५१ | − २४ |
| जाहिराती | १५० | ८८ | − ६२ | ठराव अंमलबजावणी | ० | ८५ | + ८५ |
| | | | | संमेलन परिषद् अितिहास | ३५० | ० | −३५० |
| | | | | परिभाषा परिषद् | ० | ८ | + ८ |

# परिषद्वार्ता



[ चिटणिसांकडून ]

कार्यकारी मंडळ— कार्यकारी मंडळाच्या ता. २२ फेब्रुवारी, १३ अेप्रिल व १० मे याप्रमाणे तीन सभा घेण्यांत आल्या.

ता. २२ फेब्रुवारीच्या सभेंत कार्यकारीमंडळातर्फे नियामक मंडळाच्या विचारासाठी मांडावयाचा अहवाल, अंदाजपत्रक, १९४१ चे हिशेब वगैरे गोष्टींचा विचार झाला. अहवाला-शिवाय सर्वांस मान्यता देण्यांत आली.

प्रि. ज. र. घारपुरे यांची तिसरे ट्रस्टी म्हणून नेमणूक करण्यांत आली.

पुण्यास भरणाऱ्या द्वितीय संस्कृत साहित्य संमेलनास परिषदेतर्फे श्री. य. रा. दाते यांस प्रतिनिधि म्हणून नेमस्त केलें.

'पुणें नगर वाचन मंदिर' ही संस्था परिषदेशी संलग्न करून घेण्यांत आली.

ता. १३ अेप्रिलच्या सभेंत खालीलप्रमाणे दुखवटयाचा ठराव करण्यांत आला:—

"श्री. जगन्नाथ अेकनाथ नरवणे या अुत्साही व प्रेमळ साहित्यिकाच्या अकाली निधनामुळे कार्यकारी मंडळास अत्यंत खेद वाटत आहे. त्यांनी 'दैवाचे खेळ', 'अीश्वरी लीला', 'कृष्णसर्प', 'स्नेहबंधन', अित्यादि कादंबऱ्या व 'मातृसंदेश', 'गुणगौरव' अित्यादि नाटिका लिहून मराठी वाङ्मयाची सेवा केली आहे. हातीं घेतलेलें काम तडीस पोहचविण्यास लागणारी कार्यक्षमता व व्यवस्थितपणा हे गुण त्यांच्या ठायीं अुत्कृष्टपणें वसत होते. त्यांच्या मृत्यूमुळे त्यांच्या कुटुंबियांस व मित्रवर्गास होणाऱ्या दुःखांत कार्यकारी मंडळ सहभागी आहे."

ता. १० मे दिवशीं भरलेल्या सभेंत खालील दुखवट्याचा ठराव करण्यांत आला:—

"तीन तपें ज्ञानेश्वरीचा व्यासंग आणि प्रवचन करणारे, रा. केशवराव देशमुख सोमवार ता. २७ अेप्रिल रोजीं कालवश झाले हें अैकून म. सा. परिषदेच्या कार्यकारी मंडळास अत्यन्त दुःख होत आहे. स्वभावांतील प्रेमळपणामुळे आणि वाणीच्या रसाळपणामुळे श्रोत्यांचीं मनें प्रसन्न करणारे, आंग्लविद्याविभूषित असून धर्मनिष्ठा कायम ठेवणारे, सात्त्विकवृत्तीचे, स्वदेशीचे सक्रिय पुरस्कर्ते, रसिक, वाङ्मयभक्त अित्यादि नात्यांनी कै. देशमुख महाराष्ट्रास परिचित होते. त्यांच्या मृत्यूमुळे त्यांच्या आप्तेष्टांना होणाऱ्या दुःखामध्ये म. सा. प. चें कार्य-कारी मंडळ समभागी आहे.

पैठणकर पारितोषिकार्थ 'मराठीचें साहित्यशास्त्र' हा अेकच ग्रंथ परिषदेकडे आला. हा ग्रंथ पारितोषिकार्ह असल्याची परीक्षणसमितीने शिफारस केल्यावरून या ग्रंथास हें पारितोषिक देण्याचें ठरविण्यांत आलें.

अनुक्रमणिका

**संलग्न संस्था**— नियमाप्रमाणे मुंबअी मराठी साहित्य संघ, करवीर नगर वाचन मंदिर, कोल्हापूर व महाराष्ट्र नाट्य मंदिर, नाशिक, या तीनच संलग्न संस्थांचे वार्षिक वृत्तांत कार्यालयांत आले आहेत. अितर संलग्न संस्थांचे वृत्तांत लवकरच येतील अशी अपेक्षा आहे.

**संमेलन**— युद्धजन्य परिस्थितीमुळे नाशकास भरण्यांत येणारें आगामी संमेलन प्रतिवर्षाप्रमाणे अीस्टरच्या सुटींत भरविणें अशक्य झाल्याने तें दिवाळीच्या सुटींत भरविण्याचें संमेलन कार्यकर्त्यांनी ठरविलें आहे. स्वागत मंडळ अस्तित्वांत आणण्याचा प्रयत्न चालू आहे व संमेलनाच्या अधिवेशनास बहुधा कार्तिक शु॥ ४ स आरंभ होअील अशी अपेक्षा आहे.

परिषदेच्या सभासदांनी नाशिक संमेलनाच्या अधिवेशनाकरिता अध्यक्षपदासाठी यंदा १० नांवें सुचविलीं, त्यांपैकीं चौघांचा नकार आल्यामुळे ६ नांवें नियामक मंडळाच्या सदस्यांकडे मतासाठी पाठविण्यांत आलीं आहेत.

**परीक्षा**— १९४१ मध्ये घेतलेल्या विशारद परीक्षेंत खालील अुमेदवार यशस्वी झाले:—

मुंबअी केंद्र— मालतीबाअी परचुरे, पुणें केंद्र— सिंधु मोरेश्वर आपटे, श्री. श्रीपाद रघुनाथ भिडे. अिंदूर केंद्र— अेकनाथ सदाशिव गंधे (दुसरी कक्षा). सांगली केंद्र— राघवेंद्र श्रीनिवास नाडपुरोहित.

खालच्या दर्जाच्या परीक्षा ठेवण्याविषयी सूचना आल्यावरून याविषयी परीक्षासमितीने अितर शिक्षणतज्ज्ञांशीं विचारविनिमय करून "प्रथमा" व "प्रवेश" या परीक्षांची योजना आंखली.

या योजनेस कार्यकारी मंडळाची मान्यता मिळाली असून अेकंदर परीक्षांचे नियम व अभ्यासक्रम पुढील अंकांत प्रसिद्ध करण्यांत येतील

**अितर**—

ता. १४, १५ फेब्रुवारी व ता. ६, ७ मे या दिवशीं व्याकरण समितीच्या निर्णयसभा भरविण्यांत आल्या.

महाराष्ट्र विद्यापीठाच्या स्थापनेबाबत चर्चा व विचार विनिमय व्हावा या दृष्टीने पुण्यांतील अेकूण ४८ संस्थांस प्रतिनिधि पाठविण्यास विनंती करण्यांत आली होती. या संस्थांच्या प्रतिनिधींची सभा ता. २५ अेप्रिल दिवशीं भरविण्यांत येअून सरकारनियुक्त समितीने काढलेल्या प्रश्नावलीच्या अनुषंगाने या प्रश्नावर चर्चा झाली. परिषदेकडून या प्रश्नावलीस जीं अुत्तरें जावयाचीं तीं तयार करण्यासाठी कार्यकारी मंडळाने अेक अुपसमिती नेमिली आहे.

कै. डॉ. केतकर यांच्या पांचव्या स्मृतिदिनानिमित्त केतकर स्मारकसमितीच्या वतीने 'हिंदूंच्या कांही चालीरीति' या विषयावर परिषदेच्या कार्यालयांत चर्चा झाली.

हिंदुस्थान सरकारच्या शैक्षणिक सल्लागार मंडळाच्या परिभाषा समितीने परिभाषाविषयक प्रसिद्ध केलेल्या अहवालाचा विचार करतां या प्रकारची अेखादी स्वतंत्र परिभाषा परिषद् मे महिन्यांत भरविण्याचें कार्यकारी मंडळाने ठरविलें असल्याचें वृत्त मागील अंकीं प्रसिद्धिलें होतें; कांही अनपेक्षित कारणामुळे ही परिषद् आता जुलैमध्ये भरवावी असें ठरविण्यांत आलें आहे.

मराठी परिभाषा योजून तर्कशास्त्रविषयक शिक्षणाचा प्रयोग परिषदेच्या यतीने सांगली येथे सांगली संस्थानच्या सहकार्याने करण्यांत आला. या प्रयोगाची सारी योजना प्रा. दे. द. वाडेकर यांची असून त्यांनी ती अत्यंत परिश्रमपूर्वक यशस्वी करून दाखविली.

## नवीन सभासद

तहहयात

श्री. वामन प्रभाकर ओक, ठाणें

साधारणांतून तहहयात

प्रा. मनोहर रामचंद्र पाळंदे, सुरत

प्रा. सखाराम विनायक आपटे, पुणें

साधारण

श्री. दिगंबर विष्णु केळकर, पुणें

श्री. गं. स. दाते, ,,

श्री. कृष्णाजी मोरेश्वर सहस्रबुद्धे, ,,

श्री. वामन अनंत गरुड, ,,

श्री. श्रीकृष्ण चिंतामण मराठे ,,

श्री. श्रीकृष्ण केशव क्षीरसागर, ,,

श्री. शंकर प्रभाकर गोरे, ,,

श्री. गंगाधर लक्ष्मण खांडेकर, पुणें

श्री. ग. भों. तुळपुळे, ,,

प्रा. वामन रामचंद्र नातु, मुंबई

श्री. लक्ष्मण बाबूराव उर्फ राजा केंभावी, विजापूर

श्री. नारायण देवदत्त टिळक, नाशिक

श्री. अशोक देवदत्त टिळक, ,,

श्री. गोविंदराव बर्डे, अमरी

श्री. सीताराम महादेव अभ्यंकर, ठाणें

श्री. माधव विनायक हेगडे, ,,

श्री. परशुराम त्रिंबक सहस्रबुद्धे ,,

श्री. माधव कृष्ण शिंदे, मुंबई

श्री. शंकर अनंत टेंकशे, ,,

श्री. विष्णु डोंगर सरोदे, मस्कावद

श्री. बाळकृष्ण हरि परांजपे, दौंड

श्री. यशवंत त्रिंबक बावळे, मुंबई

---

